

# श्रीमेहेरबाबा

यांचे

# अध्यात्मपर लेख व संदेश

भाग १ ला



अनुवादक :

डॉ. प्रो. चक्रधर धरणीधर देशमुख

एम्. ए., पीएच.डी. (लंडन)

तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक, कि. ए. कॉलेज,

अमरावती

व

सौ. इंदुमती देशमुख, एम्. ए., बी. टी.

# प्रस्तावना

'Meher Baba' मासिकांत व इतरत्र इंग्रजी भाषेमध्ये प्रसिद्ध झालेल्या श्रीसद्गुरु मेहेरबाबांच्या स्फूर्तिप्रद व अध्यात्मपर लेखांपैकी कांही लेखांचे मराठी भाषांतर यापूर्वीच 'अवतार मेहेरबाबा माले' मधील सात पुष्पांमध्ये प्रसिद्ध झाले आहे. उरलेल्या लेखांच्या व संदेशांच्या मराठी भाषांतराचें महत्त्वाचें कार्यहि श्रीगुरुकृपेनेच तडीस गेलें आहे. आम्ही केवळ निमित्तमात्र आहों. मूळच्या इंग्रजी लेखातील क्रम अनुवादामध्ये कित्येक कारणांमुळे ठेवता आला नाही.

हा लेखसंग्रह दोन भागांत प्रसिद्ध होत असून, हा पहिला भाग श्रीसद्गुरु मेहेरबाबाच्या जन्मदिवशींच जनताजनार्दनास सादर समर्पण करण्यांत आम्हांस आनंद वाटतो. श्रीसद्गुरु मेहेरबाबांचे लेख प्रत्यक्ष अनुभूतीवर अधिष्ठित असून, त्यांच्यांत मानवतेस जागृत करण्याचें सामर्थ्य ओतप्रोत भरलेलें असल्यामुळे, त्यांचें श्रेष्ठतम महत्त्व चिरकाल टिकणारें आहे. त्यांचा अनुवाद इतर सर्व भारतीय व जागतिक भाषांमधून व्हावयास पाहिजे.

ह्या लेखसंग्रहाचें प्रकाशन करण्याबद्दल, श्री. आदि के. इराणी, पब्लिकेशन कमिटी, मेहेरबाबा जागतिक आध्यात्मिक केंद्र, अहमदनगर व तो लेखसंग्रह सुबक रीतीने छापून देण्याबद्दल 'महेश्वर प्रेस' अमरावती, यांचे व त्याचप्रमाणे या ईश्वरार्पित कार्याला इतर अनेक प्रकारची मदत करणारे श्री. पु. गो. निजसुरे व इतर सर्व मित्रमंडळी यांचे आम्ही कृतज्ञतापूर्वक आभार मानतों.

अमरावती,
२५ फेब्रुआरी, १९४६

चक्रधर धरणीधर देशमुख
सौ. इंदुमती देशमुख


श्री मेहेरबाबा
ॐ
यांच्या
विश्ववंद्य, बोधप्रद व अध्यात्मपर लेखांचा
आणि
दिव्य व स्फूर्तिदायक संदेशांचा
हा अनुवाद
जनताजनार्दनास
समर्पित असो.
चक्रधर धरणीधर देशमुख
सौ. इंदुमती देशमुख

# अनुक्रमणिका



# शुद्धिपत्रक

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५ | २४ | अनियंत्रिक | अनियंत्रित |
| ३१ | ४ | संस्कारांचा | संस्कारांचे |
| ५७ | १० | उत्स्फूर्त | उत्स्फूर्त |
| ७४ | २४ | परवा | पर्वा |
| १०० | २ | आलेली | झालेली |
| १०४ | १६ | violence | nonviolence |
| १२२ | ११ | अजेय | अचूक |
| १३७ | १४ | आळखले | ओळखले |
| १५७ | ४ | परंतु त्या | परंतु तो त्या |
| १९७ | २ | ईश्वराभूतीनंतर | ईश्वरानुभूतीनंतर |
| २३२ | २ | त्याच | त्याचें |
| २४१ | २२ | ठवलेलेंच | ठरलेलेंच |

टीपः—पृष्ठ १६९ वरील 'अध्यात्मजीवनांतील गूढविद्येचें स्थान (भाग १ ला) गूढ अनुभवांचें महत्त्व' या प्रकरणाचा क्रमांक १८ च्या ऐवजी १९ असावयास पाहिजे होता; व याला अनुसरून पुढील सर्व प्रकरणांचे क्रमांक एका अंकाने अधिक असावयास पाहिजे होते. परंतु अनुक्रमणिकेमध्ये, वाचकांच्या सोयीसाठी, ह्या चुकीच्या दुरुस्तीकरिता पृ. १५१ 'ईश्वरपुरुष (भा. ३ रा) ईश्वरपुरुषाचें कार्य' या तत्पूर्वीच्या प्रकरणाचा निर्देश १७ अ असा केला आहे.

---

# १ : : : ईश्वराचा शोध

बहुतेक लोकाना ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल शंकाहि येत नाही व त्याना त्याच्याबद्दल काही कुतूहलहि नसतें. दुसरे कांही परंपरेच्या प्रभावामुळे कोणत्या ना कोणत्या धर्माचे वा पंथाचे अनुयायी असतात; व हा त्यांचा विश्वास त्यांनी आसपासच्या वातावरणांतून घेतला असतो. काही विधिनियम व समारंभांचें पालन व कांही कट्टर मतांचें अवलंबन करावयास लावण्याइतकीच शक्ति त्यांच्या श्रद्धेमध्ये असते; परंतु त्यांचा जीवनविषयक संपूर्ण दृष्टिकोण अगदी बदलून टाकण्याइतकें सामर्थ्य त्यांच्या श्रद्धेंत नसतें. इतर कांही लोकांची तत्त्वचिंतनाकडे प्रवृत्ती असते; व असे लोक इतरांच्या वाक्यावर विश्वास ठेऊन किंवा स्वतःच्या विचारामुळे ईश्वराचें अस्तित्व मानूं लागतात. त्यांच्याकरिता परमेश्वर म्हणजे जास्तींत जास्त एक बुद्धिनिर्मित कल्पना किंवा गृहीत तत्त्व ( hyrothesis ) असतो. परंतु अशा प्रकारच्या शिथिल विश्वासामुळे ईश्वराचा खरा व कळकळीचा शोध करण्यास कोणीहि प्रवृत्त होत नाही. त्यांना ईश्वराचें प्रत्यक्ष ज्ञान नसतें; व त्यांना ईश्वराबद्दल तळमळ नसते व त्याच्या प्राप्तीकरिता ते प्रयत्नहि करीत नाहीत.

ईश्वरविषयक विश्वासाच्या कोटि.

खरा मुमुक्षु आध्यात्मिक सत्यांच्या ऐकीव ज्ञानावर संतुष्ट रहात नाही. तसेंच अनुमानाने होणाऱ्या ज्ञानानेहि त्याचें समाधान होत नाही. खऱ्या मुमुक्षूस आध्यात्मिक सत्यें हीं रिकामपणीं विचार करण्याची गोष्ट वाटत नाही. तर त्या सत्यांचा स्वीकार अगर त्याग त्याच्या आंतरिक जीवनांत दूरवर परिणाम करणार असतात, म्हणून त्यांच्याविषयी प्रत्यक्ष ज्ञान मिळविण्याचा त्याचा साहजिकच आग्रह असतो. एका ऋषीच्या जीवनावरून हें अधिक स्पष्ट करून सांगता येईल. आध्यात्मिक मार्गावर बऱ्याच प्रगत झालेल्या आपल्या मित्राशीं तो ऋषि एके दिवशी चर्चा करीत होता. ते असे चर्चेत गुंतले असतांना, त्यांचें लक्ष तिकडून नेल्या जाणाऱ्या एका प्रेताकडे गेलें. 'हा शरीराचा अंत आहे, परंतु आत्म्याचा नव्हे' तो मित्र त्या प्रेताकडे पाहून म्हणाला. ऋषीने विचारलें 'तूं आत्मा पाहिला आहेस काय?' मित्राने उत्तर केलें, 'नाही'. शेवटी तो ऋषि आत्म्याविषयी संशयवादीच राहिला. कारण त्यास आत्म्याविषयी स्वानुभवाचें प्रत्यक्ष ज्ञान हवें होतें.

खरा मुमुक्षु आध्यात्मिक सत्याच्या प्रत्यक्ष ज्ञानाची इच्छा करतो.

परंतु मुमुक्षूचें जरी दुसऱ्यापासून मिळालेल्या ज्ञानाने अगर अनुमानाने समाधान होत नसलें, तरी आपल्या अनुभवांत जीं आलेलीं नाहीत, अशीं आध्यात्मिक सत्यें नाहीतच, अगर त्यांचें अस्तित्व असूंच शकणार नाही, असें तो मानीत नाही. दुसऱ्या शब्दांत सांगायचें म्हणजे, आपल्या व्यक्तिगत अनुभवाची मर्यादा तो जाणतो, व आपल्या या मर्यादित अनुभवासच तो जगांतील सर्व संभाव्यतेचें परिमाण मानीत नाही. आपल्या अनुभवक्षेत्राबाहेरच्या सर्व गोष्टींविषयी तो आपलें मन खुलें ठेवतो.

जिज्ञासु आपलें मन खुले ठेवतो.

तो ऐकीव माहितीवर ज्याप्रमाणे विश्वास ठेवीत नाही, तसाच तो त्याबद्दल पूर्ण अविश्वास बाळगण्याचीहि घाई करीत नाही. हें खरें आहे की, पुष्कळ वेळा अनुभवाच्या परिमिततेमुळे कल्पनेचा व्यापार मर्यादित होत असतो; आणि त्यामुळे मनुष्याला आपल्या गतानुभवाच्या ४टप्प्यात न आलेलीं अशीं कांही सत्यें असतील हें शक्य वाटत नाही. परंतु बहुधा त्याच्या आयुष्यांतच असे कांही प्रसंग येतात की, आपल्या कट्टर मतांचें कुंपण तोडून, त्यास बाहेर यावें लागतें व मन खरोखर खुलें करावें लागतें.

हेंच मानसिक अवस्थान्तर उपर्युक्त ऋषीच्या उदाहरणावरून अधिक स्पष्ट होईल. हा ऋषि पूर्वी राजकुमार होता. उपरिनिर्दिष्ट चर्चेच्या प्रसंगानंतर कांही दिवसांनी, तो एकदा घोड्यावर बसून चालला असतांना, त्याच्या विरुद्ध दिशेने पायी येणारा एक मनुष्य त्याला भेटला. घोड्याचा मार्ग अशा तऱ्हेने अडवला गेल्यावर, राजकुमाराने जरा उद्धटपणानेच त्या मनुष्यास स्वतःचा मार्ग मोकळा करण्यास आज्ञा दिली. त्या मनुष्याने तसें करण्यास नकार दिल्यानंतर, राजपुत्र घोड्यावरून उतरला; आणि त्या दोघांनी संभाषणास सुरवात केली. 'तूं कोण आहेस?' त्या पायी चालणाऱ्याने विचारलें. राजकुमाराने उत्तर केलें, 'मी राजकुमार आहें' 'परंतु तूं राजपुत्र आहेस, हें मला माहीत नाही,' असें सांगून तो मनुष्य पुढे म्हणाला, 'तूं राजपुत्र आहेस, हें मला प्रत्यक्षपणे माहीत होईल, तेव्हाच मी तुला राजपुत्र म्हणून कबूल करीन. नाहीतर नाही.' या संभाषणावरून त्या राजपुत्राच्या (ऋषीच्या) मनांत विचार आला की, ज्याप्रमाणे त्या पायी चालणाऱ्या मनुष्यास स्वानुभवावरून तो राजपुत्र आहे हें माहीत नसलें, तरी तो राजपुत्र होताच, त्याचप्रमाणे, आपल्याला स्वानुभवावरून ईश्वर आहे हें माहीत नसलें, तरी

दृष्टान्त.

त्याचें अस्तित्व शक्य आहे. अशा रीतीने त्याचें मन ईश्वराच्या संभाव्य अस्तित्वाविषयी विचार करण्यास खुलें झाल्यामुळे, तो त्या प्रश्नाचा प्रामाणिक विचार करण्याच्या यत्नास जोराने लागला.

**एकतर ईश्वर आहे किंवा तो नाही. जर तो असेल, तर त्याविषयीचा शोध उचितच आहे. परंतु तो नसेल, तरी देखील त्याचा शोध केल्यापासून कांही नुकसान होण्यासारखें नाही.**

सर्वसाधारण मनुष्य ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल उदासीनच असतो.

परंतु साधारणतः मनुष्य एक आनंददायक आणि स्वयंस्फूर्त कार्य या दृष्टीने ईश्वराच्या खऱ्या शोधाकडे वळत नाही; तर ज्या ऐहिक गोष्टींचा त्याला मोह पडतो आणि ज्यांतून त्याला मन काढून घेतां येत नाही, अशा गोष्टींची भ्रामकता त्याला समजून आली म्हणजेच तो ईश्वराचा शोध करण्यास प्रेरित होतो. साधारणतः मनुष्य आपल्या भौतिक जगताच्या कार्यांतच निमग्न राहतो; आणि आपल्या जीवनाच्या विविध सुखदुःखांचा अनुभव घेत असतां त्याला त्याहून अधिक गूढ सत्यांच्या संभाव्य अस्तित्वाची शंकाहि येत नाही. शक्य तितकें इंद्रियसुख मिळविण्याचा व निरनिराळ्या प्रकारचें दुःख टाळण्याचा तो प्रयत्न करीत असतो.

'खावें, प्यावें आणि मजा करावी', हेंच त्याचें तत्त्वज्ञान! परंतु त्याचा सुखाचा शोध अखंडपणे चालू असला, तरी तो दुःखाला अगदीच टाळूं शकत नाही; एवढेंच नव्हे तर त्याला ज्यावेळीं सुख मिळविण्यांत यश येतें, त्याचवेळीं सुखप्राप्तीमध्ये देखील त्याला एकप्रकारची अरुचि उत्पन्न होते.

विचारास प्रवृत्त करणारे प्रसंग.

दैनिक अनुभवचक्रांत भ्रमण करीत असतांना, कित्येक वेळा असा एखादा प्रसंग उद्भवतो की, '**या साऱ्याचा अंतिम हेतु काय?**' असें तो स्वतःला विचारूं लागतो.

असें विचारण्याची वेळ कदाचित् एखाद्या वेळीं ज्या प्रसंगाचा स्वीकार करण्यासाठी त्याची मानसिक तयारी झालेली नसते, असा प्रसंग आला असतांना येईल, किंवा ती कांही खात्रीच्या अपेक्षा सफल न झाल्याने होणाऱ्या मनाच्या गोंधळामुळे येईल, किंवा एखाद्या वेळीं आपली वागण्याची आणि विचार करण्याची ठराविक पद्धति मोडून पुन्हा अगदी नवीन रीतीने व्यवस्थापित करावी लागेल अशा नवीन परिस्थितींत तो पडल्यास, अशी वेळ येईल. परंतु बहुधा मनांतील एखादी तीव्र वासना विफल झाली, म्हणजेच बहुधा 'या साऱ्याचा अंतिम हेतु काय?' असा प्रश्न मनात येतो. अशा तीव्र वासनेच्या तृप्तीचा मार्ग पूर्णपणे अवरुद्ध होऊन तिच्या सफलतेबद्दल यत्किंचितहि आशा करण्यास मुळीच जागा नसेल, तर मनाला जोराचा धक्का बसतो; व ह्या वेळेपावेतों ज्या तऱ्हेचें जीवन त्याने मनांत कोणतीहि शंका न आणतां घालविलें, त्याच प्रकारच्या जीवनाचा पुढेहि अंगिकार करण्यास त्याचें मन तयार होत नाही.

अशा परिस्थितींत मनुष्याचा मनोभंग होऊन, तो अगदींच हताश होऊन जातो; आणि या चित्तक्षोभांत उत्पन्न झालेली प्रचंड शक्ति जर अनिर्बंध आणि अनिर्दिष्ट राहिली, तर तिच्यामुळे मनुष्याच्या मनांत घातक अव्यवस्था ( derangement ) उत्पन्न होऊं शकते; व कधी कधी तर तो आत्महत्या करण्यासहि प्रवृत्त होतो. ज्यांच्या तीव्र नैराश्याला ( desperateness ) अविचाराची जोड आहे, आणि जे विकारांना पूर्ण मोकळे सोडतात, अशांवरच हें संकट येतें. अगतिक व हताश वृत्तीतील अनियंत्रिक शक्तीमुळे विनाशच प्राप्त होणार. परंतु अशाच परिस्थितीमध्ये विचारी मनुष्याच्या

अनियंत्रित व तीव्र हताश स्थिति घातक असते; परंतु तीच वृत्ति ईश्वराकडे झुकली तर विधायक होते.

नैराश्याचा परिणाम निराळा होतो; कारण त्याच्या हताश वृत्तीपासून उत्पन्न झालेल्या शक्तीचें सुबुद्ध (intelligent) आणि सहेतुक नियंत्रण केलें जातें. अशा दिव्य आशाभग्नते (divine desperateness) च्या क्षणीं, मनुष्य जीवनाचें ध्येय शोधण्याचा आणि तें मिळविण्याचा निश्चय करतो; व अशा रीतीने टिकाऊ व स्थायी मूल्यांकरिता खरा शोध सुरू होतो. यापुढे 'या सर्व गोष्टींचें अंतिम ध्येय काय?' हा जळजळीत व अदम्य प्रश्न त्याच्यासमोर उभा राहतो.

यांप्रमाणे, मनुष्य जेव्हा आपलें सारें मन:सामर्थ्य जीवनाचें ध्येय शोधण्यांत केंद्रित करतो, तेव्हाच तो आपल्या आशाभंगात निर्माण झालेल्या शक्तीचा विधायक उपयोग करीत असतो. यापुढे, त्याला जगांतील चंचल वस्तूंमध्ये समाधान वाटेनासें होतें; आणि आतापर्यंत त्यांच्या ग्राह्यतेबद्दल त्याला किंचितहि शंका नव्हती, अशा सामान्य मूल्यांच्या महत्त्वाविषयी तो संशयग्रस्त होतो. कांही झाले तरी सत्याचा शोध करायचा हीच त्याची एकमेव इच्छा असते, आणि सत्याहून यत्किंचितहि विभिन्न अशा दुसऱ्या कोणत्याहि हीनतर वस्तूने त्याचें समाधान होऊं शकत नाही. दिव्यत्वाभिमुख आशाभग्नता (divine desperateness) आध्यात्मिक जागृतीचा प्रारंभ आहे, कारण तिच्यापासूनच ईश्वरानुभूति प्राप्त करण्याच्या आकांक्षेचा उदय होतो. पूर्ण आशाभंग होऊन, सर्व गोष्टींचा फोलपणा त्याच्या प्रत्ययास आला, म्हणजेच तो मायारूपी पडद्याच्या मागे दडून राहिलेल्या अर्थपूर्ण रहस्याचा शोध करण्याकरिता, वाटेल ती जोखीम घेण्यास तयार होतो.

दिव्यत्वाभिमुख आशाभग्नता हा आध्यात्मिक जागृतीचा प्रारंभ होय.

आतापर्यंत साऱ्याच सामान्य गोष्टी त्याचें खरें सांत्वन करण्यास असमर्थ ठरलेल्या असतात; परंतु असें असूनहि जीवन अर्थशून्य व असार आहे असें पूर्णपणे मानायला त्याची आंतरिक प्रज्ञा (inner voice) तयार होत नाही. **अद्यापपर्यंत त्याच्या कक्षेंत न आलेलें असें प्रच्छन्न सत्य जर त्याने गृहीत धरलें नाही, तर त्याने ज्याकरिता या जगांत रहावें व जगावें असें कांहीच राहात नाही.** त्याच्याकरिता दोनच पर्याय असतात–एकतर सिद्धपुरुषांनी ज्याला ईश्वर म्हटलें आहे, अशा प्रच्छन्न आध्यात्मिक सत्याचे अस्तित्व मानणें, किंवा सर्वच कांही अर्थशून्य आहे असें समजणे. दुसऱ्या पर्यायाचा मनुष्याच्या सर्व अंगप्रत्यंगांतून इन्कार होत असतो; आणि म्हणून त्याला पहिल्या पर्यायाचा शोध करण्याशिवाय गत्यंतर नसतें. अशा रीतीने संसारांत हताश झाल्यानंतरच मनुष्य ईश्वराकडे वळतो.

दोनच पर्याय:—एकतर परमेश्वर किंवा कांहीच नाही.

आता ज्या प्रच्छन्न सत्यावर त्याने विश्वास ठेवलेला असतो, त्या सत्याप्रत त्याला सरळ प्रवेश (direct access) न मिळाल्यामुळे तो आपल्या पहिल्या अनुभवानाच त्या **परात्पर गरिमे (significant beyond)** प्रत पोचविण्याची संभाव्य साधनें मानतो; आणि अशा रीतीने आध्यात्मिक मार्गावर प्रकाश मिळण्याकरिता, तो आपल्या नेहमीच्या अनुभवाकडेच परत वळतो. परंतु यामुळे तो आता या अनुभवांकडे नवीन दृष्टिकोणांतून पहातो, आणि त्याचा अर्थहि त्याला निराळा भासतो. **यापुढे तो अनुभव घेतो, इतकेंच नव्हे तर तो त्या अनुभवाचा आध्यात्मिक अर्थहि जाणण्याचा प्रयत्न करतो.** अनुभवाचें स्वरूप काय आहे याचाच

गृहीत ईश्वरत्वाच्या प्रकाशांत अनुभवाचे पुनर्मूल्यमापन.

तो केवळ विचार करीत नाही; तर जीवनांतील प्रच्छन्न ध्येयाप्रतच्या जीवन यात्रेंत त्या अनुभवाचा अर्थ काय आहे, याचाच तो विचार करतो. आणि अशा रीतीने, या नवीन शोधास सुरुवात करण्यापूर्वी, जी प्रज्ञा ( insight ) त्याला येऊं शकली नसती, ती या सर्व अनुभवांच्या मूल्यांच्या विवेकशील पुनर्मापनामुळे प्राप्त होते.

अनुभवमूल्यांच्या पुनर्निश्चितीमुळे ज्ञानवृद्धि होते; आणि आध्यात्मिक ज्ञानांत वेळोवेळीं होणाऱ्या वृद्धीमुळे, जीवनाकडे पहाण्याचा साधारण दृष्टिकोण हटकून बदलत जातोच. म्हणून ईश्वराच्या अगर प्रच्छन्न आध्यात्मिक सत्याच्या बौद्धिक आणि सैद्धान्तिक शोधाचे प्रतिध्वनि त्याच्या व्यावहारिक जीवनांत उमटूं लागतात. आणि त्याचें जीवन म्हणजे नवानुभूत आध्यात्मिक मूल्यांचा प्रयोग बनते.

नवीन प्रज्ञेत मन अनुभूत मूल्यांविषयी प्रयोगशील बनते.

आपल्या जीवनांमध्ये, तो जों जों असे विवेकशील व हेतुपुरस्सर प्रयोग करीत जातो, तों तों त्याला जीवनाचा खरा अर्थ अधिकाधिक समजत जातो, व अशा रीतीने मानसिक दृष्ट्या तो पूर्णपणे बदलत जात असतांना, त्याला जीवनाचें खरें स्वारस्य समजण्याची दृष्टि येत होती, असें त्याला आढळून येतें. जीवनाचें यथार्थ स्वरूप आणि खरें मूल्य यांच्या स्पष्ट आणि प्रशान्त दर्शनामुळे, आपण ज्याच्या शोधासाठी इतका अटोकाट प्रयत्न करीत होतों, तो ईश्वर कांही कोणी प्रच्छन्न किंवा परका नाही, असें साधकाला समजून येतें. तो एखादें गृहीत तत्त्व ( hypothesis ) नसून, स्वतःच सत्य आहे; निर्मळ दृष्टीने पाहिलेली अंतिम सद्वस्तु ( reality ) म्हणजेच ईश्वर आहे, व तो

ईश्वराची प्राप्ति म्हणजे स्वतःच्या आत्म्याप्रत आगमन करणे होय.

स्वतः त्या ईश्वराचाच एक अंश असून त्यामध्ये त्याचें अस्तित्व सम्मिलित आहे, आणि त्याच्याशींच तो वास्तविक पहातां अभिन्न व



[ श्री सद्गुरु मेहेरबाबा ]

एकरूप आहे. अशा तऱ्हेने साधक जरी कांहीतरी नवीन शोधण्यास म्हणून निघतो, तरी त्याला पूर्ववर्ति सद्वस्तूचेंच नवीन ज्ञान प्राप्त होतें. आध्यात्मिक प्रवास म्हणजे कांहीतरी अगदी नवीन ध्येयाप्रत पोचणें, अगर साधक जे पूर्वी नव्हता, तें बनणें नव्हे. तर आध्यात्मिक जागृति म्हणजे साधकाचे स्वतःविषयींचें व जीवनाविषयींचें अज्ञान हळूहळू नाहींसे करणें होय. ईश्वराची प्राप्ति म्हणजे स्वतःच्याच आत्म्याप्रत आगमन करणें होय.

---

## २ : : : प्रेम

जीवन आणि प्रेम हीं परस्परांपासून अविभाज्य आहेत. जेथे जीवन आहे, तेथे प्रेम आहे. अत्यंत प्राथमिक अवस्थामध्येदेखील, जाणीव आपल्या मर्यादांचें अतिक्रमण करून दुसऱ्या रूपांशीं एकता अनुभवण्याचा प्रयत्न करते. जरी प्रत्येक रूप दुसऱ्या रूपाहून भिन्न असतें, तरी तीं सर्व रूपें एकाच जीवनाचीं रूपें असतात; आणि या अप्रकट व अन्तर्गत जीवनैक्यसत्याचा प्रसुप्त भाव एका रूपास दुसऱ्या रूपाबद्दल जें आकर्षण वाटतें, त्यामधून या भ्रममय जगांत देखील व्यक्त होतो.

प्रेम विश्वव्यापि आहे.

सर्व ग्रह आणि तारे ज्या नियमाने बांधले गेले आहेत, तो गुरुत्वाकर्षणाचा नियम देखील एक प्रकारें विश्वाच्या प्रत्येक भागाला व्यापीत असलेल्या प्रेमाचेंच अस्पष्ट प्रतिबिंब आहे. खरें पाहिलें असतां, प्रतिसारक शक्ति ( repulsion ) देखील प्रेमाचीच अभिव्यक्ति आहे, कारण कोणत्या तरी दुसऱ्या वस्तूकडे आकर्षण झाल्यामुळेच वस्तु एकमेकांस विमुख होऊन, एकमेकांपासून प्रतिसारल्या जातात. प्रतिसारक शक्ति आकर्षणाचाच एक निषेधरूप परिणाम आहे. पदार्थांमध्ये असलेली संसक्तिशीलता ( cohesion ) आणि साम्यशीलता ( affinity ) या प्रेमाच्याच स्पष्ट अभिव्यक्ति होत. या अवस्थेंतील

जड जगतांतील प्रेमाचें राज्य.

प्रेमाचें एक विशेष उदाहरण म्हणजे चुंबकाचें लोहाकर्षण हें होय. प्रेमाचे हे सर्व प्रकार सर्वांत खालच्या दर्जाच्या अगदी अविकसित जाणिवेंत दिसून येत असल्यामुळे, सर्वांत कमी प्रतीचे असतात.

पशुयोनीतील प्रेम.

पशुयोनीमध्ये हें प्रेम समोवर्तीच्या पदार्थांकडे निर्दिष्ट होणाऱ्या सचेतन प्रवृत्तीं (conscious impulses) च्या रूपांत अधिक स्पष्ट होतें. हें प्रेम निसर्गप्रेरित (instinctive) असतें; आणि योग्य पदार्थांना स्वाधीन करून इच्छापूर्ती करण्याच्या रूपाने प्रकट होतें. जेव्हा वाघाला हरिणास खाण्याची इच्छा होते, तेव्हा खरोखरच त्याला त्याविषयी प्रेम वाटत असतें. या अवस्थेंत काम-वासना हेंहि एक प्रेमाचेंच दुसरें रूप आहे. या अवस्थेंतील प्रेमाच्या प्रादुर्भवनामध्ये एक गोष्ट मात्र सामान्य असते; आणि ती म्हणजे त्या सर्वांमध्ये आपल्या प्रीतिविषयाच्या द्वारा कोणती तरी निसर्गप्रेरणा किंवा शारीरिक इच्छा तृप्त करून घ्यावयाची असते.

मानवी प्रेमाला एका नवीन तत्त्वाबरोबर-बुद्धीबरोबर जुळणी करून घ्यावी लागते.

सर्व कनिष्ठ कोटींतील प्रेमापेक्षा मानवी प्रेम हें अधिक उच्च प्रकारचें असतें, कारण मनुष्याला पूर्णविकसित जाणीव असते. जरी मानवी प्रेम व उपमानवी (sub-human) प्रेम यांत अखंडता असली, तरी तें मानवी प्रेम उपमानवी प्रेमापासून निराळें असतें, कारण यापुढे त्याचे व्यापार बुद्धिरूपी एका नवीन घटकाच्या साहचर्यांत होतात. कधी कधी मानवी प्रेम बुद्धीपासून विश्लिष्ट (divorced) शक्तीच्या रूपांत दिसतें; आणि बुद्धीशीं समानान्तर राहतें. कधी कधी प्रेम बुद्धीशीं सम्मिश्रित होतें व त्याचा बुद्धीशीं संघर्ष होतो. आणि अखेरीस

बुद्धि आणि प्रेम दोन्ही समभार होऊन त्यांचें एकाच अखंड एकतेंत सायुज्य होतें; व ते दोन्हीहि सुसंवादी पूर्णतेचें एक अंग बनतात.

प्रेम आणि बुद्धि यांचे तीन प्रकारचे मीलन.

अशा रीतीने मानवी प्रेम आणि बुद्धि यांचें तीन प्रकारचें मीलन होऊं शकतें. पहिल्या प्रकारांत, प्रेमाचें क्षेत्र आणि विचारांचें क्षेत्र शक्य तोंवर अलग अलग ठेवलें जातें,–म्हणजे प्रेमाच्या क्षेत्रांत बुद्धीच्या व्यापाराला जवळजवळ पूर्ण मज्जाव असतो, आणि बुद्धीच्या क्षेत्रांत प्रीतीला जवळजवळ पूर्ण बंदी असते. परंतु आत्म्याच्या या दोन अंगांमध्ये पूर्ण पृथकत्व राहूं शकत नाही. परंतु, जेव्हा बुद्धि आणि प्रेम यांचे व्यापार अदलूनबदलून (alternately) चालू असतात आणि दोघांचेंहि प्राधान्य आंदोलनशील असतें, तेव्हा प्रेम बुद्धीने प्रकाशित झालेलें नसतें, आणि बुद्धि प्रेमाने उल्लसित झालेली नसते. दुसऱ्या प्रकारामध्ये, बुद्धि आणि प्रेम यांचे व्यापार एकसमयावच्छेदेंकरून चालू असतात, परंतु ते परस्परांशीं सुसंवादी नसतात. त्यांच्या या संघर्षामुळे गोंधळ उत्पन्न होत असला, तरी बुद्धि आणि प्रेम यांचा खरा समन्वय करणाऱ्या उच्चतर स्थितीचा विकास साधण्याकरिता असा संघर्ष आवश्यकच आहे. तिसऱ्या प्रकारांत, प्रेम आणि बुद्धि यांचा समन्वय ही एक सिद्ध स्थिति होऊन जाते व त्यामुळे प्रेम आणि बुद्धि या दोहों-मध्यें इतकें परिवर्तन घडून येतें की नेहमीच्या सामान्य चेतनेहून श्रेष्ठतर असा एक नवीनच चेतनास्तर (level of consciousness) उद्भूत होतो; व ह्या अवस्थेला अतिचेतना (super consciousness) अगर अतिमानवी जाणीव म्हणतात, तें यथोचितच आहे.

प्रेमाचे विविध गुणभेद.

मानवी प्रेम, असंख्य वासनांनी भरलेल्या आहंकारिक चेतने-( ego-consciousness ) च्या साच्यांत प्रकट होतें. या घटकांच्या विविधतेमुळे प्रेमांत निरनिराळे रंग उत्पन्न होतात. ज्याप्रमाणे चारुदर्शकामध्ये ( kaleidoscope ) आपल्याला साध्या मूल घटकांच्या भिन्न संयोगाने असंख्य आणि नित्य बदलत्या अशा विविधतापूर्ण आकृति दिसतात, त्याचप्रमाणे मनाच्या घटकावयवांच्या नवनवीन संयोगामुळे प्रेमाच्या क्षेत्रांतहि असंख्य गुणभेद (qualitaive variety) दृष्टीस पडतात. आणि ज्याप्रमाणे फुलांच्या रंगांच्या छटांमध्ये अनंत सूक्ष्म प्रकार असतात, त्याचप्रमाणे मानवी प्रेमाचेहि विविध आणि सूक्ष्म भेद आहेत.

प्रेमाच्या निम्नतर श्रेणी.

मानवी प्रेम हें मोह, कामेच्छा, लोभ, क्रोध व मत्सर इत्यादीं सारख्या अवरोधक घटकांनी घेरलेलें असतें. एका अर्थाने, हे अवरोधक घटक म्हणजे निम्नतर ( lower ) प्रेमाचींच रूपें आहेत, किंवा या निम्नतर प्रेमप्रकारांचे अनिवार्य आनुषंगिक परिणाम आहेत. मोह, कामेच्छा आणि लोभ हीं निम्नतर प्रेमाचींच विकृत रूपें म्हणावयास हरकत नाही. मोहामध्ये, मनुष्य भोग्य वस्तूवर आसक्त होतो; कामेच्छेमध्ये, तो त्या वस्तूपासून संवेदनेची लालसा धरतो, आणि लोभामध्ये, तो ती वस्तु स्वाधीन करून घेण्याची इच्छा करतो. निम्नतर प्रेमाच्या या तीन प्रकारांमधील लोभाची प्रवृत्ति मूळ भोग्य वस्तु सोडून ती वस्तु मिळविण्याच्या साधनावर प्रसृत होत जाते. अशा रीतीने, मनुष्य धन, कीर्ति आणि सत्ता यांचा लोभ धरतो, कारण ते सर्व त्याच्या वाञ्छित वस्तुलाभाचीं साधनें होऊं शकतात. जेव्हा या निम्नतर प्रेम प्रकारांना अवरोध होतो, किंवा त्यांच्या अवरोधाची शक्यता उत्पन्न होते, तेव्हा क्रोध आणि मत्सर निर्माण होतात.

निम्नतर प्रेमाचे हे प्रकार पवित्र प्रेमाच्या प्रवाहास रोधक असतात. प्रेमसरिता ही निम्नतर प्रेमाच्या ह्या विकृत आणि बंधनकारक रूपांपासून विमुक्त झाल्याशिवाय कधीहि पूर्णपणे निर्मल आणि स्थिर होऊं शकत नाही. **निम्नतर हें उच्चतराचा शत्रु आहे.** जाणीव जर निम्नतराशीं संबद्ध झाली, तर ती स्वतःच उत्पन्न केलेल्या चाकोरीमध्ये फसते; व तिला त्या चाकोरींतून विमुक्त होऊन, पुढे प्रगत होणें कठीण जातें. अशा रीतीने निम्नतर प्रेमप्रकार हे उच्चतर प्रेमप्रकारांच्या संवर्धनामध्ये अडथळे आणीत राहतात; आणि उच्चतर प्रेमाचा विमुक्त आविष्कार होण्याकरता, निम्नतर प्रेमाचा त्याग करावाच लागतो.

निम्नतर उच्चतराचा शत्रु आहे.

निम्नतर प्रेमाच्या शिंपल्यांतून उच्चतर प्रेमाचा उदय होण्याकरिता प्रेमाला विवेकाची अविरत साथ पाहिजे. म्हणून मोह, कामेच्छा, लोभ आणि क्रोध या अवरोधक घटकांपासून प्रेम निराळें आहे, हें ओळखलें पाहिजे. मोहामध्ये, मनुष्य वस्तूच्या कल्पित आकर्षणाच्या जादूचा निष्क्रिय (passive) बळी असतो; परंतु प्रेमामध्ये मनुष्य प्रीतिविषयाच्या अंगीभूत स्वारस्याचे क्रियाशील (active) होऊन रसस्वादन करतो.

प्रेम व मोह.

प्रेम हें विषयवासनेहूनहि निराळें आहे. विषयवासना इंद्रियांच्या विषयांवर अवलंबून असते, म्हणून तिच्यामुळे आत्म्यावर विषयांचा पगडा बसतो व त्यांत आध्यात्मिक पारतंत्र्य असतें; परंतु प्रेमामुळे आत्म्याच्या नामरूपांत अंतर्भूत असलेल्या सद्वस्तूशींच प्रत्यक्ष संबंध जडतो, व त्यांत मानसिक गुलामगिरी नसते, म्हणून विषयवासना जड (heavy) व प्रेम हलकें (light) भासतें. विषयवासनेंत जीवन संकुचित

प्रेम व विषयवासना.

होतें, तर प्रेमांत विशालतेचा अनुभव येतो. एका माणसावर प्रेम करणें, म्हणजे त्याचें जीवन तुमच्या जीवनांत मिळवून घेणें होय. जणूं काय तुमचे जीवन द्विगुणित होऊन तें आता दोन केंद्रामधे स्पंदमान होतें. तुम्ही अखिल जगतावर प्रेम केलें, तर एका अर्थानें तुमचें जीवन अखिल जगतांत व्यापलेलें राहील. परंतु विषयवासनेमुळे जीवनरूपी समुद्रास ओहोटी लागते, व स्वतःहून निराळ्या समजल्या जाणाऱ्या रूपांवर अवलंबून असण्याचा अनुभव येतो. याप्रमाणे विषयवासनेंत द्वैत व दुःख यांचा परिपोष होतो; परंतु प्रेमांत एकत्व व आनंद यांचा परिपोष होतो. विषयवासनेंत ह्रास असतो, तर प्रेमांत नित्य नवीन दिसणारी विपुलता असते. विषयवासना ही इंद्रियांची तहान आहे, तर प्रेम हे आत्म्याचें प्रकाशन आहे. विषयवासनेंत प्रक्षोभ आहे, तर प्रेमांत शांति आहे. विषयवासनेंत तृप्तीची वासना आहे, तर प्रेमांत तृप्त स्थितीचा अनुभव आहे.

प्रेम आणि लोभ.

प्रेम हें लोभाहूनहि निराळे आहे. लोभ हा त्याच्या सर्व स्थूल आणि सूक्ष्म रूपांमध्ये ग्रहण-लोलुपता (possessiveness) आहे. तो स्थूल गोष्टी आणि व्यक्ति यांच्या ग्रहणाची इच्छा करतो, एवढेंच नव्हे तर कीर्ति आणि सत्ता यांसारख्या अमूर्त आणि सूक्ष्म गोष्टी स्वाधीन करण्याची आकांक्षाहि बाळगतो. प्रेमामध्ये स्वतःच्या वैयक्तिक जीवनांत दुसऱ्या व्यक्तीच्या परिग्रहाचा सवालच नसतो. उलट प्रेमांत स्वतःसाठी कोणतीहि अपेक्षा न ठेवतां, मनुष्यापासून आपल्या प्रीतिविषयाच्या अन्तःकरणास उल्हसित आणि पुनःपरिपूरित करील असा विमुक्त आणि निर्मायक चित्स्रोत उत्पन्न होत असतो. शिवाय एक विरोधाभासपूर्ण सत्य असें आहे की, लोभामध्ये दुसऱ्यास आधीन करून

घेण्याचा प्रयत्न असला, तरी खरें पाहतां मनुष्य स्वतःच त्या दुसऱ्याच्या आधीन होतो; आणि प्रेमामध्ये, मनुष्य दुसऱ्यास आत्मसमर्पण करण्याची इच्छा करीत असला, तरी त्यांत खरोखर प्रीतिविषयाचे प्रेमिकाच्या जीवनामध्येच आध्यात्मिक संमीलन होतें. लोभामध्ये, आत्मा वस्तूवर आपलें प्रभुत्व स्थापन करण्याची इच्छा करतो; परंतु वस्तुतः ती वस्तूच आत्म्यावर आपलें आध्यात्मिक प्रभुत्व प्रस्थापित करते. आणि प्रेमामध्ये आत्मा स्वतःसाठी कांहीं न ठेवतां प्रीतिविषयास पूर्णपणें स्वसमर्पण करतो; परंतु तें करतांनाच, या समर्पणद्वारा, आपला प्रीतिविषय आपल्यांतच समाविष्ट झाला असल्याचें त्यास आढळून येतें.

मोह, कामेच्छा आणि लोभ हे सर्व अध्यात्मिकतेच्या दृष्टीने व्याधीच आहेत. क्रोध आणि मत्सर हीं या व्याधीचीं उग्रता वाढविणारीं बाह्य लक्षणें होत; आणि त्यांमुळे ती व्याधि अधिकच भयंकर होते.

पवित्र प्रेम अनुग्रहद्वारा जागृत होते.

याच्या अगदी उलट, शुध्द प्रेम आध्यात्मिक पूर्णतेची प्रफुल्लता आहे. मानवी प्रेम या बंधनकारक विकारामुळे इतकें ग्रस्त होऊन जातें की अंतःकरणांतून पवित्र प्रेमाचें प्रकटीकरण अशक्य होऊन जातें. म्हणून साधकाच्या अंतःकरणांत अशा पवित्र प्रेमाचा उदय होतो, तेव्हा ती खरोखर एक प्रकारची देणगीच समजली पाहिजे. सद्गुरुच्या अनुग्रहास जबाब म्हणूनच साधकाच्या अंतःकरणांत पवित्र प्रेमाचा उदय होतो. जेव्हा पवित्र प्रेम हें प्रसादरूपाने सद्गुरुकडून साधकास मिळतें, तेव्हा तें सुपीक क्षेत्रभूमींतील बीजाप्रमाणे त्याच्या जाणीवेंत राहतें; आणि योग्य समय येतांच त्या प्रेमाचें रोप वाढीस लागून कालान्तराने त्याचा मोठा वृक्ष बनतो.

साधकाची आध्यात्मिक पूर्वतयारी ही सद्गुरूच्या अनुग्रहावतरणास आवश्यक आहे. ही अनुग्रहासाठी लागणारी आध्यात्मिक तयारी साधकाने आपल्या अंतःकरणांत कांही दिव्य गुणांचा विकास करीपर्यंत पूर्ण होत नाही. जेव्हा मनुष्य दुसऱ्यांच्या पाठीमागे त्यांची निंदा करण्याचें सोडून देतो, आणि त्यांच्या दुर्गुणांपेक्षा सद्गुणांचा अधिक विचार करून व परमसहिष्णुतेचा अवलंब करून स्वतःची हानि होत असतांनाहि दुसऱ्याचें कल्याण चिंतितो, तेव्हाच तो सद्गुरुकृपेस पात्र होतो. या आध्यात्मिक तयारींतील सर्वांत मोठें विघ्न म्हणजे चिंता. परंतु जेव्हा हें चिंतेचें महान् विघ्न भगीरथ प्रयत्नांनी उल्लंघिलें जातें, तेव्हा शिष्याच्या आध्यात्मिक पात्रतेस आवश्यक असलेल्या दैवी गुणांच्या संवर्धनाचा मार्ग सुगम होतो. शिष्याची तयारी पूर्ण होतांच गुरुप्रसादाचें अवतरण होतें. सद्गुरु हा दैवी प्रीतीचा अथांग सागरच असल्याने, आपला अनुग्रह ज्यावर सुफलित होईल अशा आत्म्याची तो वाटच पाहत असतो.

अनुग्रहास पात्र होण्याकरिता आध्यात्मिक पूर्वतयारी.

सद्गुरुप्रसादाने उत्पन्न होणारें प्रेम म्हणजे एक दुर्लभ विशेषाधिकार आहे. आपल्या अपत्याकरिता सर्वस्वदानास आणि मृत्यूचाहि स्वीकार करण्यास तयार होणारी माता, व आपल्या देशासाठी प्राणार्पण करण्यास तयार असणारा हुतात्मा हे दोघेहि अत्यंत थोर आहेत. परंतु सद्गुरूच्या अनुग्रहाने उत्पन्न होणाऱ्या या पवित्र प्रेमाचा आस्वाद त्यांनी घेतलाच असतो असें नाही. एवढेंच नव्हे, तर मोठमोठ्या जटाजूटधारी, आणि पर्वतदऱ्यांतून बसणाऱ्या आणि गाढ समाधींत पूर्णपणें निमग्न असणाऱ्या योग्यांमध्ये देखील हें अमोल प्रेम असतेंच असें नाही.

पवित्र प्रेम दुर्लभ आहे.

इतर कोणत्याहि साधनांपेक्षा सद्‌गुरुकृपेने जागृत झालेलें विमल प्रेम हें साधकाचें अधिक मोलाचें साधन आहे. या प्रेमांत सर्व प्रकारच्या अनुशासनां ( disciplines ) चे गुणविशेष असतात.

पवित्र प्रेम सर्वात उत्तम अनुशासन आहे.

इतकेंच नव्हे, तर साधकास आपल्या ध्येयाप्रत नेण्याकरिता प्रेम हें इतर सर्व अनुशासनांपेक्षा अधिक प्रवीण आणि समर्थ असतें. जेव्हा या प्रेमाचा उदय होतो तेव्हा साधकास एकच इच्छा उरते–आणि ती म्हणजे आपल्या गुरुस्वरूप दैवी प्रियतमाशीं सायुज्य पावणें ही होय. इतर सर्व इच्छांना आपल्या जाणिवेंतून अशा रीतीने काढून टाकल्याने, असीम पावित्र्य प्राप्त होतें. प्रेमाइतकें दुसरें कोणतेंहि साधन साधकास पूर्णपणें पवित्र बनवूं शकत नाही. गुरुस्वरूप ईश्वरी प्रियतमास सर्वस्व अर्पण करण्यास साधक सतत सिद्ध असतो; आणि त्याच्याकरिता कोणताहि त्याग त्यास कठीण वाटत नाही. त्याचे सर्व विचार स्वतःपासून विमुख होऊन, त्याच्या दैवी प्रियतमावर पूर्णपणें केंद्रित होतात. आणि **सततवर्धमान प्रेमाच्या उत्कटतेमुळे साधक मर्यादित ‘ मी ’च्या शृंखला तोडून, आपल्या प्रियतमाशीं एकरूप होतो.** हीच ईश्वरत्व प्रकाशित करणारी प्रेमाची परिपूर्ति आहे.

ईश्वरी प्रेम हें मानवी प्रेमाहून अगदी निराळ्या प्रकारचें आहे. **मानवी प्रेम हें एकाच तत्त्वांतील अनेक रूपांवर असतें. तर ईश्वरी प्रेम हें अनेक रूपांतील एका तत्त्वावर असतें.** मानवी

ईश्वरी प्रेम मानवी प्रेमाहून श्रेष्ठ आहे.

प्रेमांत अनेक प्रकारची विकृति व गुंतागुंत आहे, तर ईश्वरी प्रेमांत विकाररहितत्व व मुक्त स्थिति आहे. **ईश्वरी प्रेमांतील तत्त्वपर व व्यक्तिपर भाग समस्थितींत असतात. परंतु मानवी प्रेमांत यांपैकी कोणत्यातरी एका भागास वैषम्यजनक**

प्राधान्य असतें. मानवी प्रेमांतील व्यक्तिनिष्ठ भागाला प्राधान्य असेल, तेव्हा मनुष्य जीवनाच्या इतर रूपांतील आंतरिक सारपूर्णता (intrinsic worth) जाणूं शकत नाही; आणि कर्तव्य भावनेने प्रेरित होऊन प्रेमांत तत्त्वनिष्ठेचें प्राधान्य असेल, तर ती मनुष्याला शुष्क, कठोर व यंत्रसम बनविते. कर्तव्याची भावना ही मनुष्याला बाह्य नियंत्रणाप्रमाणे वाटते; परंतु ईश्वरी प्रेमांत तो अनिर्बंध स्वतंत्रता व असीम सहजता अनुभवतो. व्यक्तिपर व तत्त्वपर या दोन्हीहि दृष्टींने मानवी प्रेम मर्यादित असतें; परंतु ईश्वरी प्रेमांत हे दोन्हीहि भाग परस्परांत विलीन झालेले असतात; व त्यामुळे ईश्वरी प्रेमाच्या अनुभवांत किंवा आविष्कारांत अनंतता असते.

सर्वोत्कृष्ट कोटीचें मानवी प्रेम देखील वैयक्तिक स्वभावधर्मानें परिमित होत असतें आणि हा वैयक्तिक स्वभाव (individual nature) सातव्या भूमिकेपर्यंत असतोच. परंतु **व्यक्तिमन नष्ट झाल्यावरच दैवी प्रेमाचा उदय होत असल्यामुळे तें व्यक्तिस्वभावाच्या शृंखलांपासून विमुक्त असतें.** मानवी प्रेमांत,

दैवी प्रेमांत प्रियतम आणि प्रेमिक यांचें मिलन होतें.

प्रेमी आणि प्रियतम यांमधील द्वैत कायमच असतें; पण **ईश्वरी प्रेमांत त्या दोघांचें सायुज्य होतें.** या अवस्थेंत साधक द्वैताची सीमा उल्लंघून ईश्वराशीं एकरूप होतो, कारण दैवी प्रेम म्हणजेच ईश्वर होय. **प्रेमी आणि प्रियतम ऐक्य पावतात, तेव्हा तोच अंत असून प्रारंभहि आहे.**

प्रेमासाठीच या सर्व विश्वाची उत्पत्ति झालेली आहे; आणि प्रेमासाठीच तें चाललें आहे. प्रेमी आणि प्रियतम यांच्या भासमान

द्वंद्वाच्या द्वारा ईश्वराला स्वतःच्या दिव्यतेचा जाणीवपूर्वक अनुभव येत असल्यामुळेच ईश्वर या द्वैतपूर्ण व भ्रामक जगतांत उतरतो. प्रेमाचा विकास द्वैतनिष्ठ ओढीवर अवलंबून असून द्वैताच्या आधारानेच तो अधिक वाढतो. प्रेमाची ही क्रीडा चालू रहाण्याकरिता, ईश्वरास नाना आत्म्यांचें भासमान भिन्नत्व धारण करावें लागतें. नाना जीव हीं त्याचींच रूपें असतात; आणि त्यांच्याकरिता तोच दैवी प्रेमिक आणि ईश्वरी प्रियतम या दोहोंचीहि एकाच वेळीं भूमिका घेत असतो. प्रियतम बनून तोच त्यांचा सत्य आणि अंतिम आराध्य होतो; आणि दैवी प्रेमिक बनून तोच त्यांना स्वतःकडे परत ओढून घेणारा उद्धारकर्ता होतो. अशा रीतीने सर्व द्वंद्वात्मक विश्व भासमात्रच असलें तरी हा भास कांही महत्त्वपूर्ण अर्थसिद्धि (significant purpose) साठी उत्पन्न झालेला आहे.

प्रेमासाठीच विश्वाची रचना झाली आहे.

प्रेम हें द्वंद्वात्मक जगांतील ईश्वराच्या एकतेचें प्रतिबिंब आहे. हेंच सृष्टीचें रहस्य आहे. जीवनांत जर प्रेम नसेल तर विश्वांतील सर्व आत्मे परस्परांस बहिर्भूत होतात; आणि अशा प्रेमहीन जगतांतील परस्परांचे सर्व संभाव्य संबंध केवळ वरवरचे, अर्थहीन आणि यंत्रसम बनतात. प्रेमामुळेच व्यक्तिव्यक्तींतील संबंध अर्थपूर्ण होतात; आणि या द्वंद्वयुक्त विश्वांतील घटनांना प्रेमामुळेच अर्थ आणि महत्त्व येतें. परंतु द्वैतमय जगतांत प्रेमामुळेच स्वारस्य उत्पन्न होत असलें, तरी त्या प्रेमांतच द्वैताचा धिक्कारहि चिरकाल अभिप्रेत असतो. प्रेम जसजसें प्रबल होत जातें, तसतसें तें निर्मितिक्षम व क्रियाशील विव्हलता (creative restlessness) उत्पन्न करतें; आणि तें आध्यात्मिक गतिशीलतेला संचालित करणारी प्रमुख शक्ति बनून, जाणिवेमध्ये सत्ताविस्ताराची मूळची एकता (original unity) पुनः प्रस्थापित करते.

प्रेमाची संचालक शक्ति.

---

## ३ : : : खरी शिष्यता

जेव्हा साधक स्वेच्छेने सद्‌गुरूशीं संबद्ध होतो, तेव्हा तो शिष्य बनतो. पण जर हा संबंध केवळ औपचारिक असेल, तर त्याला खरें शिष्यत्व म्हणतां येणार नाही. तोंडीं झालेल्या करारामुळे अगर लेखी करारनाम्यामुळे ज्यांत हक्क आणि जबाबदारी उत्पन्न होते, अशा कायदेशीर संबंधाहून गुरुशिष्यांचें नातें अगदी निराळें असतें. प्रगत साधकाच्या जीवनाचा शिष्यत्व हा एक प्रमुख प्राथमिक स्वभावगुण आहे. कोणत्याहि कृत्रिम उपायांनी तो उत्पन्न होऊं शकत नाही; तर आध्यात्मिक जीवनाच्या मूल आधारभूत नियमांनुसार तें उत्पन्न होतें. सामाजिक जीवनाच्या साच्यांत प्रवाहप्राप्त सहवासामुळे किंवा तात्पुरत्या करारामुळे उत्पन्न होणाऱ्या व्यावहारिक संबंधापेक्षा तो संबंध कितीतरी अधिक महत्त्वाचा असतो. बरेचसे ऐहिक संबंध साधकाच्या कूटस्थ आध्यात्मिक जीवनांत प्रविष्ट होत नाहीत, कारण ते केवळ वरवरचे व महत्त्वशून्य असतात. उदाहरणार्थ, जोंपर्यंत तुम्ही विकत घेतलेल्या मालाची किंमत घेतां, तोंपर्यंत तो माल तुम्ही कोणत्या दुकानदाराकडून घेतां याला फारसें महत्त्व नाही; त्याचप्रमाणे जोंपर्यंत तुम्ही

शिष्यत्व हा एक जिव्हाळ्याचा संबंध आहे.

गन्तव्य स्थानास जाऊन पोहोचतां तोंपर्यंत तुम्ही कोणत्या बोटीनें प्रवास करतां यालाहि फारसें महत्त्व नाही. परंतु अशा प्रकारचे व्यवहार सुद्धा सांस्कारिक संबंध व कर्मनियम यांनीच निश्चित होत असतात; त्या मुळे याहि संबंधांमध्ये मुळीच आध्यात्मिक रहस्य नसतें असें मात्र नाही. परंतु हे संबंध स्वभावतःच वरचेवर व तात्पुरते असल्यामुळे, त्यांची साधकाच्या जीवनास सारपूर्णता व दिशा देण्यास समर्थ असलेल्या शिष्यत्वरूपी मार्मिक संबंधाशीं कोणत्याहि दृष्टीने तुलना होऊं शकत नाही.

गुरुशिष्याचें नातें हा साधकाच्या जीवनांतील अंतर्गत स्थितिविशेषाचा अपरिहार्य परिणाम आहे. हे नातें प्रथमतः प्रेमी व त्याचा ईश्वरी प्रियतम यांमधील संबंध आहे; व आध्यात्मिक दृष्टीने इतर सर्व संबंधांहून अधिक रहस्यपूर्ण आहे.

शिष्यत्वांत अंतर्भूत असलेलें प्रेम अनुपम असते.

प्रेम हेंच शिष्यत्वाचें मर्म आहे; परंतु हें प्रेम साधारण सामाजिक संबंधांत व्यक्त होणाऱ्या निरनिराळ्या प्रकारांच्या प्रेमाहून सर्वश्रेष्ठ व अतुलनीय असतें. ऐहिक प्रेम ही दोन अजागृत ईश्वरत्वाच्या केंद्रांमधील परस्पराविषयक क्रीडा आहे; परंतु शिष्यत्वांतील प्रेम हा अजागृत ( unconscious ) ईश्वराचा जागृत ( conscious ) ईश्वराबद्दल जिव्हाळा आहे. प्रत्येकजण परमात्माच आहे, परंतु कांही लोक ईश्वरत्वाविषयी अचेतन असतात; कांहींना ईश्वरत्वाची आंशिक जागृति असते; व कांही फारच थोडेसे लोक पूर्ण जागृत ईश्वरावस्थेंत असतात. जे स्वतःच्या ईश्वरत्वाबद्दल अचेतन असतात त्यांना परमात्मभावाची यत्किंचित्‌हि कल्पना नसते; त्यांना फक्त देहभाव असतो. ईश्वरानुभूतीचा वारसदार होण्याकरिता, साधकांना

ईश्वरावस्थेंत निरंतर निवास करणाऱ्या सद्गुरूचें प्रीतिपूजन करावें लागतें व त्याचें पथप्रदर्शन स्वीकारावे लागतें.

सद्गुरूच्या हक्काची सर्वश्रेष्ठता.

साधकाचें सद्गुरूवरील प्रेम म्हणजे सद्गुरूच्या साधकावर असलेल्या निरतिशय प्रेमास असलेला जबाब आहे; व हें प्रेम शिष्याच्या अन्य प्रेमांमध्ये सर्वश्रेष्ठ समजलें पाहिजे. सद्गुरु हा अनन्त परमात्म्याचें प्रातिनिधिक मूर्तिमान् स्वरूपच असल्याची जाणीव शिष्याला असते; व त्यामुळे गुरुप्रेम शिष्याच्या जीवनांतील केंद्रीय शक्ति बनते. सद्गुरूच्या व्यक्तिमत्तेस केंद्र बनवून, त्याच्या भोंवती शिष्य आपल्या विचारांचें व आकांक्षाचें ताणेंबाणें विणतो. शिष्याला ज्या कांही अनेक कर्तव्यांची जाणीव असते, त्या सर्वांत सद्गुरुविषयक कर्तव्य निर्विवादपणें सर्वश्रेष्ठ बनतें; व ह्या सर्वश्रेष्ठ हक्काच्या अधिकाराच्या द्वाराच सद्गुरु आध्यात्मिक शक्तिरूपी प्रभापुंजांचा केंद्रबिंदु बनून, स्वतःच्या दिव्य रश्मिराशींच्या विमोचनाने अज्ञानांधकार दूर करतो, व साधकाच्या हृदयांतील दोष नाहीसे करून त्याला सत्यानुभूतीच्या मुक्तजीवनांत प्रविष्ट करतो.

सर्व प्रेम गुरुप्रत पोहोचवितें.

खऱ्या शिष्यत्वाची महत्त्वाकांक्षा ठेवणाऱ्या साधकामध्ये तर्कवितर्कशून्य गुरुप्रेम असलें पाहिजे; व मूलतः तेंच शिष्यत्वाच्या उमेदवारीकरिता अत्यावश्यक आहे. सर्व प्रकारांच्या प्रेमसरिता अखेरीस गुरुप्रेमाच्या महासरितेस मिळून तींत लुप्त होतात. मजनूचें लैलावर प्रेम होतें. त्याचें तिजवरील प्रेम इतकें तीव्र होतें की त्याचें मन सदैव तिच्याबद्दलच्याच विचारांनी भरलेलें असे.

तिच्याबद्दलच्या विचाराशिवाय त्याला खाणें, पिणें किंवा निजणें कांहीच सुचत नव्हतें. दुसऱ्या एखाद्या पुरुषाशीं लग्न केल्याने तिचें हित साधेल अशी त्याची खात्री झाली असती, तर तो त्यालाहि आनंदाने तयार झाला असता; व स्वतःच्या मरणाने तिच्या नवऱ्यास आनंद होईल असें त्याला वाटलें असतें तर त्याने मरणहि पत्करलें असतें. ह्या त्याच्या स्वार्थरहित व खऱ्या प्रेमामुळे, अखेरीस त्याला सद्‌गुरूची प्राप्ति झाली. आपल्या जीवनांतील प्रत्येक क्षणामध्ये त्याने स्वतःस विसरून आपल्या प्रियेचाच विचार केला; व ह्यामुळे त्याच्या प्रेमाचें भौतिक व बौद्धिक पातळीवरून अध्यात्मनिष्ठ प्रेमांत उन्नयन झालें. त्याच्या प्रेमाची आध्यात्मिकता त्याला ईश्वरी प्रियतमाप्रत घेऊन गेली.

सद्‌गुरु हा ईश्वरी प्रियतम असतो; व एकदा सद्‌गुरूची गाठ पडली म्हणजे त्याच्यावर प्रेम करणें हेंच शिष्याचें इतिकर्तव्य असतें; कारण शिष्याचें सद्‌गुरुवर सर्वान्तःकरणयुक्त प्रेम असेल, तर तो अखेरीस त्याच्याशीं निश्चितपणें ऐक्य पावतोच. आपलें प्रेम कोणत्या दर्जाचें आहे, ह्याबद्दल त्याने चिंता करूं नये. स्वतःमध्ये आध्यात्मिक दुर्बलता असली तरी त्याने सद्‌गुरुवर प्रेम करीतच राहावें, व हृदय पूर्णपणें पवित्र होईपर्यंत प्रेमांत खंड पडूं देऊं नये. सद्‌गुरु हा परम पावन असतो; व त्याच्यावर हृदय स्थिर करणें हीच आत्मशुद्धीची सुरुवात आहे. जेव्हा शिष्य गुरूची एकनिष्ठ भक्ति करतो, तेव्हा तो गुरुप्रदत्त दिव्य प्रेमाचा ग्राहक बनतो; व त्यास प्राप्त होणाऱ्या ह्या दैवी प्रेमरूपी अग्नीमध्ये त्याचें सर्व प्रकारचें मनोदौर्बल्य भस्म होतें. परंतु सर्व दुर्बलता जाऊन अनंत व अविचल पावित्र्य संपादन करावयाचें असेल, तर शिष्याने आपलें सर्व जीवन,

प्रेम व शरणागति यांच्या द्वारा शुद्धि.

सद्‌गुरूला मनांत कोणताहि किंतु न ठेवतां व निष्कपटपणें समर्पित केलें पाहिजे. त्याने आपली नानाविध दुर्बलता व सामर्थ्य, आपले सद्‌गुण व दुर्गुण, पाप व पुण्य गुरूला अर्पण करावेत; व ह्या अर्पणविधीमध्ये 'जर तर' किंवा 'किंतु परंतु' नको. त्याची शरणागति इतकी पूर्ण पाहिजे की त्याच्या मनात गुप्त स्वार्थपर इच्छेच्या छायेलाहि वाव मिळूं नये.

श्रद्धेची महति.

शिष्याची सद्‌गुरूवर अचल श्रद्धा असेल, तरच त्याला पूर्ण शरणागति व तर्कवितर्कशून्य प्रेम साध्य होतें. गुरूवर श्रद्धा नसेल, तर तें खरें शिष्यत्वच नव्हे. मनुष्य स्वतःस मनुष्य म्हणून जाणतो, तेव्हा श्रद्धेचा प्रश्न नसतो, त्याचप्रमाणे ईश्वरानुभूतीनंतरहि श्रद्धेचा प्रश्नच उद्‌भवत नाही. परंतु अनुभूति होईपर्यंत, गुरूवरील श्रद्धाच, शिष्याचें पथप्रदर्शन करणारा प्रकाश असतो. अशी श्रद्धा जहाजाच्या सुकाणूप्रमाणे असते. ईश्वरानुभूति होईपर्यंत श्रद्धेला प्रत्यक्ष अनुभव अप्राप्य असला, तरी श्रद्धेला अंध मानणें चूक आहे, कारण घोर अज्ञानापेक्षा तिचें दृष्टीशीं अधिक साम्य आहे. इंग्रजी भाषेमध्ये सर्व धर्मांना 'Faiths' असें अकारण म्हणत नाहीत. साधकाच्या जीवनास श्रध्दा अत्यावश्यक आहे. श्रद्धा नानाविध रूपांत व्यक्त होते; परंतु मानसिक दृष्टीने ती जशीच्या तशी एकैच असून, तिचे स्वतंत्र व उल्लेखनीय प्रकार करिता येत नाहीत. श्रद्धेमधील भेद हे सर्व अंशभेद आहेत. श्रद्धा जिवंत व दृढ असते; किंवा ती त्राणशून्य व दुर्बल असते. त्राणशून्य व दुर्बल श्रद्धा मनुष्यास फार तर विधिनियमांचें पालन करावयास प्रवृत्त करील. परंतु जिवंत व दृढ श्रद्धा साधकाला धर्मांच्या बहिरंगापलीकडे नेते; व वरील साल फेकून आंतील अध्यात्मजीवनरूपी बीज मिळविण्याकरिता ती साधकास

मदत करते. जेव्हा सद्गुरूवर श्रद्धा बसते, तेव्हा ती स्वतःच्या अंतिम अधिष्ठानाचा आश्रय घेते व परासीमा गाठते.

शिष्याला स्वतःला सद्गुरूच्या ईश्वरत्वाचा जो अनुभव असतो, त्या अनुभवावर त्याची श्रद्धा अढळपणें अधिष्ठित राहिली पाहिजे. थोड्याशा वाऱ्याच्या झुळुकेबरोबर इतस्ततः वाहवत जाणाऱ्या गवताच्या काडीप्रमाणे न बनतां तुफान वादळांतहि अचल राहणाऱ्या पर्वताप्रमाणे तो स्थिरमति राहिला पाहिजे. गुरूवरील खऱ्या श्रद्धेचें मर्म कल्याणच्या गोष्टीवरून स्पष्ट होईल. कल्याण हा शिवाजीस समकालीन असणाऱ्या पूर्ण सद्गुरु रामदासस्वामींचा शिष्य होता. गुरूचें सर्व शिष्यांवर अपवादरहित प्रेम असतें; परंतु कांही शिष्य त्याला विशेषतः प्रिय असूं शकतात. ह्याला दृष्टान्त म्हणजे मनुष्याचें आपल्या देहाच्या सर्वच भागावर प्रेम असतें, पण बोटांपेक्षा त्याला आपले डोळे अधिक प्रिय असतात. रामदासस्वामींना पुष्कळ शिष्य होते; परंतु त्या सर्वांमध्ये कल्याणवर त्यांची मर्जी अधिक होती. कल्याण हा सर्व शिष्यांहून अधिक प्रिय कां आहे, हें दुसऱ्या शिष्यांना बरोबर समजेना.

कल्याणची गोष्ट.

एकदा रामदासस्वामींनी शिष्यांच्या भक्तीची कसोटी पाहिली. त्यांनी सर्व शिष्यांना जवळ बोलावून मरणोन्मुख आजारीपणाचें सोंग केलें. त्यांनी आपल्या गुडघ्याला एक आंबा पट्ट्यांनी अशा रीतीने बांधला की तो मोठ्या गळूप्रमाणे दिसूं लागला. रामदासस्वामींनी ही सूज शिष्यांना दाखविली व तो एक दूषित गळू असून, कोणी तरी त्यांतील विषारी पू चोखून घेण्यास तयार झाल्याशिवाय आपण जिवंत राहण्याचा मुळीच संभव नाही, असें सांगितलें; व त्याबरोबरच

त्यांनी सर्व शिष्यांना हेंहि स्पष्ट केलें की जो कोणी त्या गळूंतील विषारी पू चोखील, तो तत्काल मरण पावेल. नंतर स्वतःचा प्राण अर्पण करून त्यांतील विष चोखण्यास कोणी शिष्य तयार आहे काय, असें त्यांनी शिष्यगणास विचारलें. हें आमंत्रण मिळाल्यावर बाकीचे सर्व शिष्य कांकूं करूं लागले; परंतु कल्याण एकदम उठला व गळूं चोखूं लागला. आपण चोखीत असलेला विषारी पू नसून, तो अत्यंत मधुर आम्ररस आहे, हें पाहून कल्याणला फार आश्चर्य वाटलें. शिवाय रामदासस्वामींनी त्याची आत्मदानपर प्रेम व अचल श्रद्धा असल्याबद्दल यथोचित प्रशंसाहि केली. आपल्या प्रियतमाच्या सुखाकरिता मरणाचाहि स्वीकार करण्यास तयार असणें, यालाच खरें प्रेम म्हणतात. कल्याणसारखी संदेहरहित श्रद्धा, अचल प्रेम व अव्यभिचारी एकानिष्ठता गुरुकृपेनेच प्राप्त होतात.

सेवेच्या द्वारा सद्गुरूची आंतरिक प्राप्ति होते.

सद्गुरूबद्दल अव्यभिचारी निष्ठा ही शिष्याचें जीवनक्षेत्र कोणत्याहि दृष्टीने संकुचित करीत नाही. **सद्गुरूची सेवा म्हणजे सर्व भूतांच्या ठायीं असलेल्या स्वतःच्याच अंतरात्म्याची सेवा असते.** सद्गुरूची जाणीव सर्वव्यापक असून, तो सर्वांचें आध्यात्मिक हित इच्छितो. अखिल जीवनाची सेवा असणाऱ्या गुरुकार्यांत भाग घेणें म्हणजेच सद्गुरूची सेवा करणें होय. गुरुकार्यांत भाग घेण्याकरिता शिष्याला जगाशीं संबंधहि ठेवावा लागेल; परंतु या प्रकारें नियत कार्यास अनुसरून, तो जगांत वावरत असला, तरी त्याचा अनंत सत्तारूप सद्गुरूशीं आंतरिक संबंध राहतो. म्हणून **गुरुकार्यांत भाग घेतल्यामुळे शिष्य सद्गुरूच्या अधिक सन्निध जातो, व त्याच्या जाणिवेचाच एक अंगभूत भाग**

होतो. सद्गुरूची सेवा करणें हा त्याची आंतरिक प्राप्ति करण्याचा ( realising ) शीघ्रतम मार्ग आहे.

गुरुकार्यात सहभागी होणे.

शिष्याने केलेली गुरुसेवा गुरूच्या जागतिक कार्याशीं संबद्ध असतेच; परंतु त्याबरोबरच, ती सेवा शिष्यास स्वतःच्या आध्यात्मिक ध्येयाच्या अधिक सन्निध नेणारें फलदायि साधन बनतें. शिष्याची सेवातत्परता स्वयंस्फूर्त, हार्दिक, निरपेक्ष व बिनशर्त असेल, तर त्याला त्या सेवेमुळे इतर कोणत्याहि साधनांपेक्षा अधिक आध्यात्मिक फायदा होईल. गुरूची सेवा करतांना देह व मन यांना दिव्यांतून जावें लागलें, तरी शिष्याला त्यांत आनंदच वाटतो. त्रास व गैरसोय सहन करून सेवातत्पर असणें ही शिष्याच्या भक्तीची कसोटी आहे. ही सेवा जितकी कष्टप्रद असेल तितकी ती सच्छिष्यास अधिक स्वीकरणीय वाटते, व तो निष्ठायुक्त गुरुसेवेकरिता शारीरिक व मानसिक दुःखाचा स्वेच्छेनेच अंगीकार करीत असल्यामुळे, तो आध्यात्मिक तृप्तीचा निरतिशय आनंद लुटतो.

मिथ्या अंतर्विरोध.

सद्गुरु व त्याच्यांत मूर्तरूप होणारें तत्त्व यांचें यथार्थ ज्ञान झालें म्हणजे सद्गुरुविषयी बिनशर्त एकनिष्ठता शक्य होते. सद्गुरूचें पद व त्याचें कार्य याबद्दलचें शिष्याचें ज्ञान अपुरें असेल तर तो, स्वतःमधील उच्चतर अंतरात्म्यांत व सद्गुरूमध्ये मिथ्या अंतर्विरोध ( false antithesis ) उत्पन्न करण्याचा संभव असतो; व यामुळे त्याच्या मनांत दुसरीं न्यायोचित वाटणारीं कर्तव्यें व सद्गुरुप्रतचीं कर्तव्यें यांमध्ये कृत्रिम व काल्पनिक संघर्ष होतो. परंतु प्रथमपासूनच शिष्याने हें जाणून असावें की शिष्याच्याच अंतरात्म्याची अनुभूति शिष्याला व्हावी हा

गुरूचा हेतु असतो, व खरें पाहतां, सद्गुरु हा शिष्यांतील अंतर्गत शिवात्म्याचाच प्रतिनिधि असून, एकमेव सत्यस्वरूप सर्वभूतान्तर्गत आत्मदेवाहून भिन्न नसतो. तेव्हा, गुरुनिष्ठा ही आत्मदेवावरील निष्ठेचें एक दुसरें रूप आहे. याचा अर्थ असा नव्हे की आत्मदेवावरील औपचारिक निष्ठा गुरुनिष्ठेचें कार्य यथोचित रीतीने करूं शकेल. ईश्वरानुभूति होईपर्यंत शिष्याला स्वतःमधील आत्मदेवाचें यथार्थ दर्शन होऊं शकत नाही; व बहुधा त्याला जें स्वतःचें कर्तव्य वाटतें, तें त्याच्या आत्मदेवामध्ये व चेतना-क्षेत्रामध्ये कपटाने प्रविष्ट होणाऱ्या संस्कारांचें प्रोत्साहन मात्र असतें. परंतु सद्गुरु हा आत्मदेवाशीं एकरूप असल्यामुळे त्याच्या मूल्यनिर्धारणा ( valuation ) मध्ये चूक होऊं शकत नाही.

संघर्षाचे प्रसंग.

तेव्हा शिष्याने नेहमी स्वतःची आन्तारिक प्रेरणा गुरुप्रदत्त आज्ञेच्या किंवा कसोटीच्या आधाराने नीट तपासावी; व या दोहोंत संघर्ष झाल्यास त्याने स्वतःच्या विचारांत कुठे चूक आहे की काय याचें पुनर्निरीक्षण करावें. बहुधा थोड्याशा निरीक्षणाने विचार पुरा केल्यास, शिष्याला त्याच्या आत्मदेवाच्या प्रेरणेमध्ये व सद्गुरूच्या आज्ञेमध्ये मूलभूत समस्वरता ( basic harmony ) असल्याचें आढळून येईल. परंतु क्वचित् प्रसंगीं तो त्या दोहोंत मेळ घालूं शकला नाही, तर स्वतःस अंतरात्म्याची प्रेरणा तरी बरोबर समजली नाही, किंवा सद्गुरूच्या आज्ञेचा खरा अर्थ तरी समजला नाही असें त्याने निश्चित जाणावें. अशा वेळीं बहुधा शिष्याने वाटेल तें झालें तरी स्वतःच्या आंतारिक प्रेरणेसच अनुसरावें, अशी सद्गुरूचीच इच्छा असते. कधी कधी श्रेष्ठतर जीवनांत शिष्याने प्रविष्ट व्हावें म्हणून सद्गुरु त्याला कांही सूचना देतो; बहुधा अशाच प्रसंगीं शिष्याला स्वतःची प्रवृत्ति

व गुरुप्रदत्त सूचना यांच्यांत तात्पुरता विरोध भासतो. परंतु बहुधा ज्याकरिता शिष्याची आगाऊ तयारी केलेली नाही, अशा सूचनाच सद्‌गुरु करीत नाही.

सद्‌गुरु पूर्णपणें स्वार्थरहित असून, शिष्याची जाणीव व त्याचा अंतर्गत आत्मदेव या दोहोंमध्ये असलेल्या आवरणांना दूर करण्याकरिता तो सत्त्वशील राहतो. तेव्हा गुरुनिष्ठा व आत्मदेवावरील निष्ठा ह्या दोहोंत खरा विरोधच असूं शकत नाही. वस्तुतः आपलें अनुसंधान पूर्ण केल्यावर शिष्याला असें आढळून येतें की **सद्‌गुरु हा स्वतःमधील आत्मदेवाचेंच दुसरें रूप आहे.** असीम निरपेक्षता व अविच्छिन्न ईश्वरत्व यांनी सद्‌गुरु इतका परिपूर्ण असतो की त्याला स्वतःकरिता असें कांहीच अभिलषणीय नसतें; व शिष्याच्या बाबतींत त्याने श्रेष्ठतम सत्याच्या प्रकाशांत स्वतःची पुनर्घटना करावी इतकेंच त्याचें उद्दिष्ट असतें. **शिष्य बनणें म्हणजे आध्यात्मिक ध्येयाचा पथ चालू लागणें.** शिष्यत्वाचा हाच खरा अर्थ होय.

शिष्यत्वाचा खरा अर्थ.



*

*

# ४ : : आत्मसाक्षात्काराप्रत आगमन

लहान अर्भकाचें शरीर नैसर्गिक रीत्याच हळूहळू वाढत जाऊन प्रौढ होतें; त्याचप्रमाणे योग्य वेळ आली म्हणजे मनुष्याची आत्मसाक्षात्काराच्या बाजूची प्रगति स्वभावतःच होते. स्थूल शरीराची वाढ नैसर्गिक नियमांनी होते; व आत्मसाक्षात्काराप्रत प्रगति, चेतनापरिवर्तन व चेतनामुक्ति यासंबंधीच्या आध्यात्मिक नियमांनुसार होते. अर्भकाचें स्थूल शरीर अगदी क्रमशःच वाढतें; व त्याची संवर्धनाची क्रिया दृष्टीला अगोचर असते; पथप्रविष्ट साधकाच्या बाबतींतहि हेंच खरें आहे. आपलें शरीर कसें वाढतें हें मुलाला कळत नाही; साधकाला आपण आपल्या आध्यात्मिक ध्येयाप्रत कसे प्रगत होतो, हें कळून येत नाही. जीवनांतील नानाविध प्रसंगांमध्ये स्वतःच्या वर्तणुकीचें धोरण कसें राहत गेलें, याचीच जाणीव साधकाला असते; परंतु तो आत्मज्ञानाप्रत कोणत्या रीतीने अग्रेसर होत आहे, हें त्याच्या क्वचितच ध्यानांत येतें. परंतु, न कळतच सुखदुःख, हर्षविषाद, यश–अपयश, प्रयत्न व विश्रान्ति, त्याच्या जीवनांतील निर्भ्रान्त दृष्टीचे व संगतियुक्त सुनिश्चया (harmonised will) चे क्षण व त्याचप्रमाणे

आत्मसाक्षात्काराकडील प्रगति बहुधा क्रमिक व अगोचर असते.

बावरलेल्या व संघर्षमय वृत्तीचे क्षण-या सर्वांच्या द्वारा साधक आंतरिक पथ आक्रमण करून, आत्मज्ञानाप्रत हळू-हळू प्रगत होत असतो. हे सर्व त्याने आपल्या विगतजीवनांतून आणलेल्या विविध संस्कारांचा परिणाम आहेत. ज्याप्रमाणे पथिक घनघोर अरण्यांतून आपला मार्ग काढतो, त्याचप्रमाणे साधकहि या संस्कारजालाच्या गुंतागुंतीमधून आत्मज्ञानाप्रत प्रगत होतो.

चेतनेचें सीमाक्षेत्र व तिचे व्यापार.

मानवी चेतनेचे समोरील वस्तूंचें अस्तित्व व स्वरूप दाखविण्याच्या उजेडाशीं बरेंच साम्य आहे. जहाजांत बसलेला मनुष्य पाण्याच्या पृष्ठभागावर वाटेल तेथे इतस्ततः भटकूं शकतो; पण आकाशांत किंवा जमीनीवरील विविध स्थानी त्याची पोहोच नसते; तसेंच ज्या माध्यमा (medium) मधून चेतनारूपी प्रकाश कार्य कारितो, त्याने त्याचें सीमाक्षेत्र निश्चित होतें. परंतु ज्याप्रमाणे पर्वतावरून खाली येणाऱ्या जलप्रवाहांचें पात्र त्या पर्वताच्या आकारप्रकारांनी निश्चित होतें, त्याचप्रमाणे चेतनाप्रकाशाच्या विशिष्ठ कार्याची रूपरेषा संचित संस्कारांनी निश्चित होते.

साधारण मनुष्याला फक्त स्थूल जगाचीच जाणीव असते.

साधारण माणसाच्या जीवनाचें व कार्याचें क्षेत्र स्थूल जगानेच मर्यादित होतें, कारण त्याचा चेतनाप्रकाश स्थूल शरीरावर पडून तद्वाराच कार्य करतो. स्थूल शरीराच्या साधनाशीं संबद्ध असल्यामुळे तो स्थूल जगांतील कोणत्याहि वस्तूचा परिचय करून घेऊं शकतो; परंतु सूक्ष्म किंवा मानसिक वस्तूंना त्याची चेतना स्पर्श करूं शकत नाही. स्थूल जग हेंच साधारण मनुष्याची रंगभूमि असून, त्याचा सर्व आचारविचार त्याच्या कक्षेंतील जडपदार्थांकडेच प्रवृत्त होतो. व या अवधींत त्याचा चेतना-

प्रकाश सूक्ष्मदेह किंवा मनोदेह या माध्यमांतून केंद्रित ( focus ) होत नसल्यामुळे, तो सूक्ष्म व अतिसूक्ष्म सत्ताक्षेत्रां ( spheres of existence ) बद्दल अचेतन राहतो.

या अवस्थेंत आत्म्याला जड जगताची जाणीव असली, तरी त्याला स्वत:च्या स्वरूपाचें पूर्ण अज्ञान असतें. त्याचा चेतनाप्रकाश जड देहाशींच संबद्ध होतो; जड देहच त्याला शक्य असलेल्या सर्व क्रियांचें अधिष्ठान बनतो; व तो जड देहाशींच तादात्म्य पावतो. तो स्वतःला स्वत:च्याच द्वारा जाणत नाही, तर तो स्वतःला जड देहाच्या द्वारा जाणतो. जें जें ज्ञान त्याला जड देहांतून मिळूं शकतें, तें सर्व ज्ञान जड देहच त्याच्या क्रियांचें केंद्र असल्याचें दर्शवितें; व म्हणून, वस्तुतः त्याचें केवळ साधनमात्र असलेला तो जड देहच आपण आहों असें त्याला वाटतें. त्यामुळे आत्मा स्वत:ला पुरुष किंवा स्त्री, तरुण किंवा वृद्ध मानतो व स्वत:वर देहाच्या अवस्था व उपाधि लादतो.

जडदेहभाव.

स्थूल जगाच्या चौकटींत अनेक जन्मचक्रांचा अनुभव घेतल्यावर सुखातिशय व दुःखातिशय इत्यादि द्वंद्वांचे चिरकाल आघात होऊन जड जगाबद्दलचे संस्कार दुर्बल होतात. संस्कार कच्चे पडले, म्हणजे चेतनाप्रकाश जड जगाच्या मोहकतेपासून हळूहळू परावृत्त होतो; व हीच आध्यात्मिक जागृतीची सुरवात समजावी. असें झालें म्हणजे स्थूल संस्कार सूक्ष्म बनतात; व चेतनाव्यापारांचें अधिष्ठान ( base ) जड देहांतून उठून सूक्ष्म देहांत स्थिर होतें. आता चेतनाप्रकाश सूक्ष्म देहावर पडतो, व त्याला माध्यम करून कार्य करतो;परंतु यापुढे तो जड देहांतून मुळीच कार्य करीत

सूक्ष्मदेहभाव.

नाही. म्हणून सर्व जड सृष्टि आत्म्याच्या चेतनेच्या कक्षेंतून बाहेर जाते; व आत्म्याला केवळ सूक्ष्म जगाचीच जाणीव राहते. आता त्याचें जीवन सूक्ष्म सत्ताक्षेत्रांत व्यतीत होतें; सूक्ष्म देहच त्याच्या सर्व क्रियांचें केंद्र बनतो व दिसतो; व आत्मा स्वतःला सूक्ष्म देहच मानतो. परंतु याप्रमाणे आत्मा सूक्ष्मचेतन झाला, तरी तो स्वतःचें खरें स्वरूप जाणत नाहीच, कारण तो स्वतःस स्वतःच्याच द्वारा प्रत्यक्षपणे न जाणतां, सूक्ष्मदेहरूपी साधनाच्या द्वारा जाणतो. परंतु त्याच्या कर्मभूमीचे जडांतून सूक्ष्मक्षेत्रांत झालेलें हें परिवर्तन बरेंच रहस्यपूर्ण ठरतें; कारण, सूक्ष्म क्षेत्रांत जड जगांतील रूढ मानदंड (conventional standard) जाऊन, त्या जागीं सत्यास अधिक जवळ असलेले नवीन मानदंड येतात; आणि नवशक्तींच्या उदयामुळे व आध्यात्मिक स्फूर्तीच्या अधिक अनिर्बंध विमोचनामुळे जीवनाची पद्धत बदलून नवी होते. सूक्ष्म जगांतील जीवन म्हणजे ध्येयापासून दूरच असून, आध्यात्मिक यात्रेंतलि ती एक अस्थायी अवस्था आहे; परंतु लाखो जडचेतन जीवांमध्ये एखादाच सूक्ष्म-चेतन होऊं शकतो.

तपस्येने किंवा योगक्रियांनी सूक्ष्म जगाबद्दलचे संस्कार सुद्धा जीर्ण होतात; व त्यामुळे चेतना अधिक अंतर्मुख होऊन, चेतनाप्रकाश मनोदेहावर पडतो व त्याच्या द्वारा कार्य करतो. चेतनेचा जडसूक्ष्म देहाशीं असलेला संबंध तुटल्यामुळे, चेतनेच्या कक्षें-तून सर्व जडसूक्ष्म सृष्टि बाहेर जाते. आता आत्म्याला मनोविशिष्ट (mental) जगताचीच जाणीव राहते; व या नवीन क्षेत्रांत त्याला गंभीरतर आध्यात्मिक प्रबोध व सत्याचें अधिक स्पष्ट दर्शन शक्य होतें. मनोक्षेत्राच्या या नवीन चौकटीमध्ये, आत्म्याला अविरत स्फूर्ति, गंभीर ज्ञप्ति (insight) व निश्चयात्मक

मनोदेहभाव.

अंतःप्रज्ञा (intuition) यांचा आस्वाद घेतां येतो व त्याचा आध्यात्मिक सत्याशीं प्रत्यक्ष संस्पर्श होतो. परंतु ईश्वराशीं असा प्रत्यक्ष संबंध आला असला, तरी त्याला स्वतःचें ईश्वरत्व प्रतीत होत नाही; कारण तो स्वतःला स्वतःच्याच द्वारा प्रत्यक्षपणें जाणत नाही, तर व्यष्टिमनो ( individual mind ) रूपी साधनाच्या द्वारा जाणतो. तो स्वतःस व्यष्टिमनांतूनच जाणतो, व व्यष्टिमनच आपल्या सर्व क्रियांचें अधिष्ठान असल्याचें पाहतो; व म्हणून **तो स्वतःला व्यष्टिमनच समजतो.** आता आत्मा जडसूक्ष्मक्षेत्रांतील स्थितीपेक्षा परमात्म्याच्या कितीतरी अधिक निकट असतो; परंतु असें असूनहि तो छायामय व भासमान जगतांतच असतो; व मनःक्षेत्रांतील संस्कारांच्या पडद्यामुळे, तो स्वतः परमात्म्याहून भिन्न असल्याचें अनुभवत राहतो. चेतनाप्रकाशाचा व्यापार व्यष्टिमनाने मर्यादित झाला असल्यामुळे, तो आत्म्याचें **वास्तविक व यथार्थ स्वरूप** दाखवूं शकत नाही. परंतु आत्म्याला स्वतःच्या ईश्वरत्वाची अनुभूति झाली नसली, तरी मनोक्षेत्रांतील जीवन सूक्ष्मक्षेत्रांतील जीवनापेक्षा फार अधिक उन्नत असतें; व लाखो सूक्ष्मचेतन जीवांमध्ये एखादाच मनोक्षेत्राशीं संबोधस्पर्श ( conscious contact ) करूं शकतो.

सद्गुरूची आवश्यकता.

साधक केवळ स्वतःच्या प्रयत्नाने दुसऱ्याची मदत न घेतां, मनोक्षेत्रापर्यंत चढूं शकतो. पण, **मनोदेहाचा त्याग, म्हणजे व्यक्तिजीवनाचें विसर्जन करणें होय; व ही अखेरची पण सर्वांत अधिक महत्त्वाची पायरी ईश्वरप्राप्त पूर्ण सद्गुरूच्या साहाय्याशिवाय चढून जाणें अशक्य असते.** लाखो मनःक्षेत्रज्ञ जीवांतून एखादाच स्वतःचा चेतनाप्रकाश व्यष्टिमनापासून परावृत्त करण्यास समर्थ बनतो; व असें चेतनापरावर्तन झालें म्हणजे आत्म्याच्या मनःक्षेत्रांतील

जीवनाशीं संबद्ध असलेले संस्कारशेषहि पूर्णपणें नाहीसे होतात. जेव्हा चेतनाप्रकाश देहत्रयापैकी कोणत्याहि देहांत केंद्रित होत नाही, तेव्हाच तो आत्म्याचें सत्यस्वरूप प्रदर्शित करूं शकतो.

**आता कोणत्याहि साधनाचा अवलंब न करितां, आत्म्याला स्वतःचें प्रत्यक्ष ज्ञान होतें; व तो स्वतःस सीमित देह न समजतां, स्वतःच अद्वितीय, सत्यस्वरूप व अंतरहित परमात्मा असल्याचें जाणतो.** तीनहि देहांचा संबंध पूर्णपणें तुटला, म्हणजेच आत्मजीवनांतील ही महान घटना शक्य होते, व निरनिराळ्या सत्ताक्षेत्रांची जाणीव तद्विशिष्ट देहाशीं संबद्ध असल्यामुळे, आता आत्मा अखिल सृष्टीविषयी अचेतन होतो. आता चेतनाप्रकाश कोणत्याहि बाह्य किंवा परकीय पदार्थावर केंद्रित न होतां आत्मसंस्थ होतो; व आत्मचेतन झाल्यामुळे आता आत्म्याला स्वतःचें ज्ञान झालेलें असतें.

प्रत्यक्ष आत्मज्ञान.

जडसूक्ष्म व मनःक्षेत्रांतून आत्मसाक्षात्काराप्रत प्रगति करीत असतांना, उन्नतिक्रमानुसार जड, सूक्ष्म किंवा मनःस्वरूप देहांशीं स्वतःचें तादात्म्य (identification) असल्याचें मिथ्या आत्मज्ञान (false self-knowledge) टाळतां येत नाही. आत्म्याला स्वचेतन करणें हा सृष्टीचा आदिहेतु आहे. आत्म्याला स्वतःचें खरें ज्ञान (साक्षात्कार) आध्यात्मिक प्रगतीच्या अखेरीसच मिळतें; व मध्यंतरीचे मिथ्या आत्मज्ञानाचे भ्रमपूर्ण प्रकार खऱ्या आत्मसाक्षात्काराचे अस्थायी प्रतिनिधि (temporary substitutes) असतात. हे आत्मसाक्षात्काराप्रत आगमन करण्याच्या मार्गांतील, न टाळतां येणारे व आवश्यक भ्रम

मिथ्या आत्मज्ञानाचे भिन्न प्रकार खऱ्या आत्मसाक्षात्काराचे प्रतिनिधि असतात.

( necessary mistakes ) आहेत. यात्रेच्या सर्व अवधीमध्ये चित्प्रकाश आत्म्यावर न पडतां, परिस्थितींतील वस्तूवर पडतो; व त्यामुळे आत्म्याची ह्या बाह्य वस्तूमध्येच निमग्न होऊन, स्वतःच्या अस्तित्वाविषयी व स्वस्वरूपाविषयी पूर्णपणें अचेतन राहण्याची प्रवृत्ति होते. **पूर्ण व नितांत आत्मविस्मृतीची भयावह शक्यता टाळण्याकरिता, आत्मा देहभावाच्याच द्वारा स्वतःचें प्रतिष्ठापन ( self-affirmation ) करतो. कारण देहच चेतनाप्रकाशाच्या केन्द्रीकरणाचें अधिष्ठान ( focal basis ) असतो.** याप्रमाणे आत्मा स्वतःला स्वतःचा देह मानतो; व इतर आत्म्यांना त्यांचे देह मानतो; व या भ्रमांत स्थापित झालेल्या द्वैतपूर्ण जगांत स्त्रीपुरुषभाव, चढाओढ, मत्सर, परस्परांची भीति व स्वार्थपूर्ण महत्त्वाकांक्षा आढळतात. चिन्हाश्रित किंवा खुणेच्या द्वारा ग्रहण केलेलें आत्मज्ञान ( self-knowledge by means of a **sign** ) हें गोंधळ, गुंतागुंत व बंधन यांना कारणीभूत होतें.

कवि जामीने एका दोह्यामध्ये उल्लेखिलेली कोहळ्याची गोष्ट अशा प्रकारच्या गोंधळाचें सुंदर उदाहरण आहे. एकदा एक विस्मरणशील मनुष्य होता; व विसरभोळेपणाच्या बाबतींत त्याच्या तोडीचा दुसरा कोणीहि नव्हता. त्याला एक बुद्धिमान् व विश्वासु मित्र होता; व निदान स्वतःचें तरी स्मरण ठेवण्यांत त्या विसरभोळ्याला मदत करण्याची त्या मित्राची इच्छा होती. त्या मित्राने विसरभोळ्याच्या गळ्याला एक कोहळा बांधला; व तो त्याला म्हणाला, " म्हाताऱ्या, नीट ऐक. एखाद्या दिवशीं तूं पूर्णपणें हरवून जाशील व तुला स्वतःची आठवणहि येणार नाही. तेव्हा खूण म्हणून हा कोहळा मी तुझ्या गळ्याशीं बांधतों; रोज सकाळीं उठल्यावर तुला हा कोहळा दिसला म्हणजे

कोहळ्याची गोष्ट.

तूं तेथें आहेसच असें जाण ". दररोज उठल्यानंतर तो विसरभोळा कोहळा पाही; व "मी हरवलों नाहीं" असें स्वगतच म्हणे. कालांतराने त्या विसरभोळ्यास कोहळ्याच्या साहाय्याने स्वतःस ओळखण्याची सवयच लागली. तेव्हा त्या मित्राने एका तिऱ्हाइताला त्या विसरभोळ्याजवळ राहण्यास व रात्रीं त्याच्या गळ्यांतील कोहळा काढून स्वतःच्या गळ्यांत बांधण्यास सांगितलें. तिऱ्हाइताने त्याप्रमाणे केलें. मग जेव्हा तो विसरभोळा सकाळीं उठला, तेव्हा त्याला स्वतःच्या गळ्यांत कोहळा दिसेना. म्हणून "मी हरवलों" असें तो स्वगत म्हणाला. नंतर त्याला तो कोहळा त्या तिऱ्हाइताच्या गळयांत दिसला, तेव्हा तो त्याला म्हणाला, "तूंच मी आहें; पण मग मी कोण ?"

देहभावरूपी मिथ्या आत्मज्ञानाचे जे भिन्न प्रकार आहेत, त्यांच्याशीं या कोहळ्याच्या गोष्टीचें फार साम्य आहे. स्वतःस देह समजणें म्हणजे स्वतःस कोहळ्याच्या द्वारा जाणण्यासारखें आहे. आपण स्वतः जड, सूक्ष्म किंवा मनोदेह नाही, हें कळल्यावर उत्पन्न होणारी अस्थिरता ही विसरभोळ्याला गळ्यांत कोहळा दिसला नाही, तेव्हाच्या-त्याच्या मनांतील घोटाळ्याप्रमाणे आहे. द्वैतभावाचा लय म्हणजे तो विसरभोळा गळ्यांत कोहळा बांधलेल्या तिऱ्हाइताशीं तादात्म्य पावला, त्याप्रमाणे आहे. पुढे ह्या गोष्टींत तो विसरभोळा बाहेरच्या कोणत्याहि खुणेची मदत न घेतां स्वतःला ओळखण्याचें शिकला असतां; तर त्याचें स्वतः-बद्दलचें ज्ञान देहत्रयाहून स्वतःचें भिन्नत्व व अनंत परमात्म्याशीं स्वतःचें एकत्व अनुभवणाऱ्या आत्म्यांच्या खऱ्या आत्मज्ञानासारखें झालें असतें. अशा प्रकारच्या आत्मसाक्षात्काराप्रत पोचणें हें विश्वाचें ध्येयच आहे.

दृष्टान्ताचे स्पष्टीकरण

---

## ५ : : : ईश्वरानुभूति

खरा आत्मसाक्षात्कार मिळविणें म्हणजे ईश्वरानुभूति करणें होय. ईश्वरानुभूति (God-realisation) ही अनुपमेय अवस्था आहे. इतर सर्व अवस्थांचा अनुभव व्यष्टिमनाच्या द्वारा येतो; परंतु ईश्वरानुभूति ही व्यष्टिमनावर किंवा दुसऱ्या कोणत्याहि साधनावर अवलंबून नसते; म्हणून ईश्वरानुभूति ही इतर अवस्थांहून अगदी निराळी आहे. स्वतःच्या अंतरात्म्याहून निराळ्या अशा कोणत्याहि पदार्थाचें ज्ञान होण्याकरिता साधनाची आवश्यकता असते; स्वतःचेंच ज्ञान होण्याकरिता साधनाची आवश्यकता नाही. खरें पाहतां, ईश्वरानुभूति प्राप्त करण्याकरिता चेतनेचा मनाशीं संसर्ग सहायक नसून, निश्चयतः बाधकच आहे. व्यष्टिमन हें पार्थक्यबोधाचें व अहंभावाचें आसन आहे. तेंच सीमित व्यक्तित्व निर्माण करतें; आणि हें सीमित व्यक्तित्व द्वैत, काल व परिवर्तनशीलता यांच्या भासाचा परिपोष करतें, व स्वतःहि त्या भासावर पुष्ट होतें. म्हणून आत्मज्ञान होण्याकरिता चेतना व्यष्टिमनाच्या मर्यादितेंतून मुक्त झाली पाहिजे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे वैयक्तिक मन नाहीसें झालें पाहिजे; पण जाणीव मात्र कायम राहिली पाहिजे.

आत्मानुभूति म्हणजेच ईश्वरानुभूति होय.

आत्म्याच्या गतकालीन जीवनेतिहासांत चेतनेचा विकास मनाबरोबरच झाला; व चेतनेचे सर्व व्यापारहि मनाच्या पार्श्वभूमीवरच होत आले. म्हणून चेतना वैयक्तिक मनांत दृढपणें बद्धमूल झाली; व मनाच्या कोंदणांत संलग्न झालेली ही चेतना त्यांतून अलग करणें दुरापास्त होते. म्हणून मन निष्क्रिय असेल, तर चेतनाहि अंतर्धान पावते. ध्यानामध्ये मन स्थिर करण्याचा प्रयत्न केला, तर मनुष्याची अचेतन होण्याची प्रवृत्ति होते, यावरूनहि मन व चेतना या दोहोंमधील ग्रंथिसंबंध स्पष्टपणें दिसून येतो.

चेतनेची मनाशीं संलग्नता.

ध्यानावस्थेंतील मनाच्या क्रियेची मंदता निद्रेहून स्वभावतः भिन्न नाही; पण त्या दोहोंच्या उत्पत्तीमध्ये थोडासा फरक आहे. व्यष्टिमन द्वैतमय जगदाभिमुख असतें; व म्हणून त्यांत नेहमीच संघर्ष असतो. आणि जेव्हा तें अविश्रान्त संघर्षाने क्लान्त होतें, तेव्हा स्वतःच्या पृथक् सत्तेचा लोप करून, अनंतत्वाप्रत परत जाण्याकरिता तें तृषित होतें. नंतर मन स्वयंनिर्मित सृष्टीपासून परावृत्त होतें व त्याचे सर्व व्यापार मंदावतात; ह्या निद्रारूपी मंदतेच्या स्थितींत चेतना अवश्यमेव लुप्त होते.

निद्रेचें स्पष्टीकरण.

निद्रेंत मनाचे व्यापार स्थगित झाल्यामुळे चेतनेचा पूर्ण लोप होतो; परंतु मनाच्या क्रियेचें व चेतनाव्यापारांचें हें थांबणें तात्पुरतेंच असतें; कारण मनांतील संचित संस्कार त्याला पुनः कार्यप्रवण करतात. कांही वेळाने, संस्कारांच्या आंतरिक प्रेरणेने मन चलायमान होतें; व तद्द्वारा चालणारा चेतनाव्यापार पुन्हा सुरू होतो. निद्रेनंतर जाग्रति व जाग्रतीनंतर निद्रा, क्रमाक्रमाने क्रिया व विश्रान्ति यांच्या

पुनः जागृत होणें.

क्रमनियमानुसार येतात. परंतु जोंपर्यंत मनांतील सुप्त संस्कार पूर्णपणें नाहीसे होत नाहीत, तोंपर्यंत व्यष्टिमनाचा लय होत नाही व चेतनाहि विमुक्त होत नाही. झोपेंत मनाला स्वतःच्या सत्तेची विस्मृति होते; पण त्याची पृथक् सत्ता नाहीशी होत नाही. झोपेंतून जागे झाल्यावर मनुष्याचीं पूर्वींचीं बंधनें पुनः प्रस्थापित होतात. चेतना पुनरपि जीवित झाली तरी तिच्यावर मनाचें ओझें असतेंच.

सीमित मनाच्या भूमींत अहंकार दृढपणें बद्धमूल होतो; व अहंकार अनेक भ्रमांमध्ये फसला असल्यामुळे, तो अज्ञानास चिरंजीवि बनविण्याचा प्रयत्न करतो. अहंकार आत्म्यांतील सुप्त अनंत ज्ञान अनावृत होण्यामध्ये प्रतिबंध करतो; व तो ईश्वरप्राप्तीमधील भयंकर अडथळा आहे. "अज्ञनरूपी पडदा फाडणें फार दुष्कर आहे, कारण ज्वालेवर एक मोठा दगड आहे", या अर्थाची एक फारशी कविता आहे. अग्निशिखेवर मोठा दगड असला, तर ती फार उंचपर्यंत पोचूं शकत नाही; त्याचप्रमाणे जोंपर्यंत चेतनेवर अहंकार आरूढ आहे, तोंपर्यंत आत्मज्ञानाची लालसा साधकास सत्यानुभूतीप्रत नेऊं शकत नाही. आत्म्याच्या सर्व यात्रेंत सतत टिकून राहणारा अहंकार आत्मप्राप्तींत यश मिळविणें अशक्य करतो. म्हातारपणीं, दुखत असलेला दांत हिरडीमध्येच दीर्घकाल हलत राहून, कित्येक महिनेपर्यंत अतिशय दुःख देत राहतो, कारण तो सहजपणें मूळासकट उपटतां येत नाही. त्याचप्रमाणे प्रेम व तपस्या यांच्यामुळे अहंकार क्षीण झाला, तरी त्याचें उन्मूलन कठीण असल्यामुळे, तो शेवटपर्यंत टिकून राहतो. आत्म्याची पथांत जसजशी प्रगति होते, तसतसा तो अधिक कच्चा होत जातो; पण सातव्या भूमिकेच्या अंतिम अवस्थेपर्यंत तो कायम राहतोच.

अहंकाराचा अडथळा.

अहंकार हा सर्व मानवी क्रियांचें केंद्र आहे; व स्वतःचा संहार करण्याचा अहंकाराचा प्रयत्न म्हणजे मनुष्याने स्वतःच्याच खांद्यावर उभे राहण्याचा प्रयत्न करण्यासारखें आहे. डोळा स्वतःला पाहूं शकत नाही; त्याचप्रमाणे अहंकार स्वतःचा अंत करूं शकत नाही. स्वतःचा अंत करण्याकरिता तो जें जें करतो, त्यामुळे त्याचा विस्तारच अधिक वाढतो; **स्वतःविरुद्ध केलेल्या प्रयत्नांवरच तो पुष्ट होतो.** स्वतःच्या आणीबाणीच्या यत्नशीलतेने तो फार तर स्वतःचें रूपांतर करण्यास समर्थ होतो; पण तो स्वतःचा पूर्ण नाश करण्यास असमर्थ असतो. अहंकाराचें आसन असलेलें व्यष्टिमन जोंवर वितळून जात नाही, तोंपर्यंत अहंकाराचा लोप होत नाही.

अहंकारावर विजय मिळविण्यामधील अडचण.

मनाच्या बंधनांतून चेतना विमुक्त करणें, हीच ईश्वरानुभूतीची मुख्य समस्या आहे. व्यष्टिमनाचा लय झाला म्हणजे मनाच्या सापेक्षतेने भासणारें सर्व विश्व शून्यरूप होतें; व चेतना कशाशींहि संबद्ध राहत नाही. आता चेतना सीमारहित व निर्भ्रान्त होऊन, अनंत सद्वस्तूचें स्वरूप प्रकाशित करतें. अनुभूतीच्या आनंदांत मग्न असतांना, विश्वांतील शब्दरूपादि विषयांचें मुळीच भान असत नाही; व **ह्या बाबतींत अनुभूति गाढ निद्रेप्रमाणें आहे.** परंतु बऱ्याच महत्त्वाच्या बाबतींत ईश्वरानुभूति गाढ निद्रेहून भिन्न आहे. निद्रेंत चेतना तहकूब (in abeyance) असते, व म्हणून विश्वभ्रमाचा निरास होतो. परंतु निद्रेंत अहंकाराचा पूर्ण लय न झाल्यामुळे व पूर्ण चेतना अंतिमसत्याभिमुख न होऊं शकल्यामुळे, ईश्वरानुभूति होत नाही. क्वचित् प्रसंगीं, निद्रासातत्याचा भंग करणाऱ्या कांही क्षणिक अवकाशामध्ये आत्म्याची चेतना कोणत्याहि विशिष्ट पदा-

निद्रा व ईश्वरानुभूति यांमधील साम्य.

र्थावर न जडतां कायम राहते. चेतना असते, पण ती विश्वाची चेतना नसते; ती शून्यत्वा (nothing) ची चेतना असते. अशा प्रकारचे अनुभव आगामी ईश्वरानुभूतीच्या आगाऊ सूचना असतात. ईश्वरानुभूतीमध्ये चेतना विश्वभ्रमापासून पूर्णपणें विनिर्मुक्त होऊन, आतापर्यंत अहंकाराने झाकलें गेलेलें असीम ज्ञान अनावृत करतें.

झोपेंत इतर सर्व गोष्टींबरोबर मन स्वतःसहि विसरतें; पण त्याचें अस्तित्व कायम असतें; व विलुप्त (submerged) चेतना व अंतरहित सद्वस्तु यांमध्ये मनांतील सुप्त संस्कारांचा पडदा असतो.

निद्रा व ईश्वरानुभूति यांमधील फरक.

याप्रमाणे, निद्रेमध्ये चेतना व्यष्टिमनाच्या कोषांत विलुप्त होते; परंतु ती अजून कोष फोडून बाहेर पडण्यास समर्थ झालेली नसते. म्हणून निद्रेमध्ये ईश्वरापासूनच्या स्वतःच्या पृथक्त्वाचा विसर पडून, आत्मा परमात्म्याशीं वस्तुतः एकत्व पावला असला, तरी त्याला ह्या एकत्वाची जाणीव येत नाही. परंतु, ईश्वरानुभूतीमध्ये मन स्वतःस विसरतें, इतकेंच नव्हे तर सर्व संस्कारांसह पूर्णपणें विलय पावून सत्ताशून्य होतें. व आतापर्यंत व्यष्टिमनाशीं जखडलेली चेतना बंधमुक्त होते, व अंतिम सद्वस्तूशीं प्रत्यक्षपणें संबद्ध होऊन, तिच्याशीं ऐक्य पावते. चेतनेंत व अंतिम सद्वस्तूमध्ये आता कोणताहि पडदा नसल्यामुळे ती केवल तत्त्वाशीं संयुक्त होऊन, तिचा त्यांतच अविच्छेद्य रूपाने चिरकालपर्यंत निवास राहतो; व त्यांतून अंतरहित ज्ञानाची व असीम आनंदाची अवस्था उत्पन्न होते.

अंतरहित ज्ञानाचें व असीम आनंदाचें हें प्रादुर्भवन ईश्वरप्राप्त आत्म्यापुरतेंच असतें. ईश्वरप्राप्त आत्म्यांतील अनंत सद्वस्तूला स्वतःच्या

सीमारहितत्वाचें ज्ञान झालेलें असतें; परंतु ईश्वरानुभूति नसलेल्या व विश्वभ्रमांत फसलेल्या आत्म्यांतील त्याच सद्वस्तूला असें स्पष्ट ज्ञान प्राप्त होत नाही.

ईश्वरानुभूति व्यक्तिगत असते.

याप्रमाणे ईश्वरानुभूति व्यक्तिगत (personal) नसती, तर कोणाहि एका आत्म्याला ईश्वरानुभूति झाल्याबरोबर सर्व सृष्टीचा अंत झाला असता. परंतु असें होत नाही. कारण **ईश्वरानुभूति ही मनाच्या क्षेत्राच्या पलीकडे पोहोंचलेल्या आत्म्याची व्यक्तिगत चेतनावस्था आहे.** दुसरे आत्मे बंधनांतच राहतात; व त्यांनाहि कधीतरी ईश्वरानुभूति खात्रीने मिळणारच असली, तरी ती मिळण्याकरिता, त्यांना चेतनेवरील अहंकाराचें ओझें फेकून व्यष्टिमनाच्या शृंखला तोडाव्या लागतात.

ईश्वरानुभूति प्राप्त झाल्यावर आत्म्याला असें आढळून येतें की **जें अंतरहित सत्य स्वतः असल्याचें तो आता जाणतो तेंच तो नेहमी होता;** व उत्क्रान्तीच्या व उन्नतीच्या कालांतील त्याचे स्वतःस सीमित मानणें भ्रममूल होतें. तसेंच ज्या अंतरहित ज्ञानाचा व आनंदाचा तो आता आस्वाद घेतो, तेंहि अनंत सद्वस्तूंत

जें अनंतांत प्रसुप्त असतें, तेंच प्रगट होतें.

कालाच्या सुरवातीपासून प्रसुप्त होतें व तें अनुभूतीच्या क्षणांत फक्त प्रगट झालें, हेंहि त्याला कळून चुकतें. याप्रमाणे ईश्वरप्राप्त पुरुष अनुभूतीपूर्वी जे होता, त्याहून वस्तुतः निराळा होत नाही. जे तो पूर्वी होता, तेंच तो आताहि असतो; परंतु त्याला पूर्वी स्वस्वरूपाचें यथार्थ ज्ञान नव्हतें, व आता तें असतें, इतकाच फरक त्याच्यामध्ये अनुभूतीमुळे पडतो. आता जें तो स्वतःस जाणतो, त्याव्यतिरिक्त दुसरें कांहीहि तो कधीहि नव्हता; व ज्या कांही अवस्थांतून तो आला, त्या सर्व फक्त स्वतःस जाणण्याच्या प्रक्रियेच्या पायऱ्या होत्या. हें त्याच्या ध्यानांत येतें.

ईश्वरानुभूति प्राप्त करण्याची सर्व घटना म्हणजे एक खेळ मात्र आहे; व ह्या खेळांतील सुरवात व अंत या दोहोंत भेद नाही. तरी ही अनुभूतीची प्राप्ति हा आत्म्याला निश्चयात्मक फायदाच आहे.

दोन प्रकारचे लाभ.

लाभ दोन प्रकारचे असतात. अप्राप्त वस्तूची प्राप्ति हा एक लाभ; व आपण वस्तुतः जे आहों, त्याचेंच यथार्थ ज्ञान व आस्वादन हा दुसरा लाभ. ईश्वरानुभूतीचा लाभ दुसऱ्या प्रकारचा असला, तरी त्यामुळे ईश्वरप्राप्त मनुष्यांत व ईश्वरानुभूतिहीन मनुष्यांत महदंतर निर्माण होतें. ईश्वरप्राप्त पुरुषाला स्वतःजवळ पूर्वी नसलेलें असें दुसरें कांही नवीन प्राप्त होत नसलें, तरी तो जें होता, आहे व चिरकाल असणार याचें स्पष्ट ज्ञान ईश्वरानुभूतीला सर्वथैव महिमामय बनवितें. ईश्वरानुभूतिहीन आत्मा सीमित असण्याचा अनुभव घेतो व क्षणिक सुखदुःखरूप द्वंद्वांच्या आघाताने विकल होतो; परंतु अनुभूतिसंपन्न आत्मा द्वंद्वातीत होऊन, जागृत ईश्वरावस्थेचें अंतरहित ज्ञान व सीमारहित आनंद यांचें आस्वादन करतो.

ईश्वरानुभूतीमध्ये आत्मा स्वतःचा पृथग्भाव (separate consciousness) टाकून द्वैतातीत होतो; व तो स्वतः अनंत व सत्स्वरूप असण्याच्या शाश्वत ज्ञानांत स्थिर होतो.

ईश्वरानुभूतीचा महिमा.

व्यक्तिजीवनाच्या शृंखला भंग पावतात; छायामय जगताचा अंत होतो; भ्रमरूपी पडदा नेहमीकरिता उघडला जातो; सीमाबद्ध चेतनेच्या उद्योगांतील हायहाय व यातनामय नैराश्य जाऊन, तेथे सत्यप्रत्ययाची शांति व आनंद येतात; व कालबद्ध जीवनांतील क्षोभ व उद्वेग अनंतत्वाच्या अथांग व गंभीर शांतीमध्ये समाविष्ट होतात.

---

# ६ : : : कामवासनेची समस्या

मनुष्याचें पाऊल जोंवर द्वंद्वांच्या प्रांताबाहेर पडत नाही, तोंवर मानवी मनापुढे प्रामुख्याने येणाऱ्या ज्या अत्यंत महत्त्वपूर्ण समस्या आहेत त्यांत कामवासनेची समस्या एक आहे. मानवी स्वभावाच्या घडणीमध्येच ही उत्पन्न झालेली असते; आणि म्हणूनच तत्संबंधी विचार करावा लागतो.

कामवासनेचा जन्म.

जीवनांतील इतर साऱ्या गोष्टींप्रमाणेच मर्यादित मनाच्या परस्पर-विरोधी द्वंद्वांच्या द्वाराच कामवासनेचाहि विचार केला जात असतो. ज्याप्रमाणे मन सुख आणि दुःख, बरें आणि वाईट, एकांत आणि सहवास, आकर्षण आणि तिटकारा या द्वंद्वांच्या बैठकींत जीवन बसविण्याचा प्रयत्न करतें, त्याचप्रमाणे कामवासनेच्या बाबतींतहि उपभोग आणि दमन या द्वंद्वाच्या द्वारा विचार करण्याची मनाची प्रवृत्ति असते; आणि याबाचून दुसरा मार्ग नाही असें भासतें. मनुष्याने जणू काय या दोहोंतून एकाचा स्वीकार केलाच पाहिजे असें भासलें तरीहि कोणत्या तरी एकाच द्वंद्वपक्षाचा स्वीकार करून, मनुष्याचें पूर्ण समाधान होऊं शकत नाही. जर त्याने दमनाचा अंगीकार केला, तर विषय-सुखाभावामुळे स्वतःच्या कमनशीबाबद्दल तो दुःखी राहतो; आणि जेव्हा तो उपभोगाचा अंगीकार करतो, तेव्हा स्वतःच्या इंद्रिया-

धीनतेची त्याला जाणीव होऊन, तो यंत्रसम व विवेकनिरपेक्ष ( mechanical ) दमना ( repression ) चा प्रयत्न करूं लागून इंद्रियवशतेपासून स्वातंत्र्य मिळवूं पहातो. दोहोंमुळेहि मन असंतुष्टच राहतें; आणि अशा तऱ्हेने जीवनांतला एक अत्यंत महत्त्वाचा आणि गुंतागुंतीचा प्रश्न उत्पन्न होतो.

कामवासनेचा हा प्रश्न सोडविण्याकरिता, तृष्णेमुळे मूढ झालेल्या कल्पनेपासूनच उपभोग आणि दमन या द्वंद्वाची उत्पत्ति आहे, हें मनाला प्रथम समजलें पाहिजे. भोगामध्ये व दमनामध्ये—दोहोंत तृष्णा ही गुप्तपणें असतेच. दोहोंतहि तृष्णेमुळे अगर इंद्रियसंवेदनेच्या इच्छेमुळे येणारी जाणिवेची भ्रष्टता अनस्यूत असतेच. यामुळे भोग अगर दमन यांपैकी कोणत्याहि अवस्थेंत मन अस्वस्थच असतें. ज्याप्रमाणे ढग आले म्हणजे सूर्यप्रकाशाचा अभाव नि वातावरणांत उदासता असते—मग पाऊस पडो अगर न पडो—त्याचप्रमाणे विषयेच्छा पुरी होवो अगर न होवो—त्या इच्छेचा प्रादुर्भाव मनांत झाला, म्हणजे जीवनाचा ऱ्हास नि खऱ्या सुखाचा अभाव होतो. तृष्णाक्रांत मन इच्छेच्या पूर्तीतच सुख आहे अशी भ्रामक कल्पना करून घेतें; आणि इच्छापूर्तीनंतरहि असमाधानच कायम राहिलें म्हणजे आत्मा त्या इच्छेचें दमन ( repression ) करून स्वतंत्र होण्याचा प्रयत्न करतो. अशा रीतीने, सुख आणि स्वातंत्र्य यांच्या शोधांत मन उपभोग आणि दमन यांच्या द्वंद्वांत सापडतें; पण शेवटीं उपभोग व दमन या दोहोंमध्ये त्याची निराशाच होते. या द्वंद्वांपलीकडे मन जाऊं न शकल्यामुळे, त्याचें आंदोलन केवळ या द्वंद्वांतील उपभोगापासून दमनाकडे किंवा दमनाकडून उपभोगाकडे म्हणजे एका निराशेकडून दुसऱ्या निराशेकडेच होतें.

उपभोग व विवेकहीन दमन हे दोन्हीही द्वंद्वपक्ष सारखेच निराशाजनक आहेत.

विषयेच्छा याप्रमाणे कल्पनेचें कार्य बिघडवून मनापुढ उपभोग आणि दमन हें द्वंद्व उभें करतें; आणि तें दोन्हीहि प्रथम सुख मिळवून देण्याचें आश्वासन देत असले तरी अखेरीस सारखेच फसवे ठरतात.

द्वंद्वांचें मिथ्या आश्वासन.

भोग आणि दमन यांमुळे वारंवार निराशा होऊनहि, दुःखाचें मूळकारण जी विषयेच्छा तिचा त्याग मन करीत नाही.* कारण तृप्तीनंतरहि निराशेचा अनुभव आला, म्हणजे दमनाच्या सुखप्रदानाच्या मिथ्या आश्वासनास तें बळी पडतें; आणि दमनामुळे निराशा झाली, म्हणजे भोगामुळे सुख होईल, या भ्रान्तीस तें बळी पडतें.

हें म्हणजे एखाद्या पिंजऱ्यांत फिरण्याप्रमाणे होतें. सद्‌गुरूकडून जागृति मिळण्याचें भाग्य ज्यांना लाभलेलें नाही, अशांना विषयेच्छेच्या आंतरिक व स्वयंस्फूर्त त्यागाचा अध्यात्मपथ बंदच असतो. परंतु शाश्वत जीवनांतील चिरंतन सुख आणि स्वातंत्र्य यांच्याकडे यथाकाल पण निश्चितपणें नेणाऱ्या ज्ञानमार्गास लागणें हीच खरी जागृतीची सुरवात होय.

जागृति झाल्यावरच विषयतृष्णेचा आंतरिक व सहजस्फूर्त त्याग संभवतो.

**विवेकहीन व यंत्रसम दमनाकडे मन निराशेमुळे वळतें; परंतु, केवळ खरा भ्रमनिरास अगर खरी जागृति यांच्याच द्वारा तृष्णेचा आंतरिक आणि स्वयंस्फूर्त त्याग करण्याकडे मन वळूं शकतें.**

विषयेच्छेचें स्वरूप यथार्थपणें कळलें नाही म्हणजे मन विवेकहीन दमन किंवा विषयोपभोग यांच्याकडे वळतें. मुमुक्षूला विषयेच्छेपासून होणाऱ्या बंधनाची आणि दुःखाची पूर्ण जाणीव होते, तेव्हाच समजूतदारपणाने त्याचें मन विषयतृष्णेच्या भारापासून स्वतःस मुक्त करण्याचा प्रयत्न करतें. विषयेच्छा असेल तेव्हाच

भोग व दमन हीं द्वंद्वें तृष्णेवर अवलंबून आहेत.

भोग अगर दमनाचा प्रश्न उद्भवतो. विषयेच्छाच पूर्णपणें नाहीशी झाली, तर तिच्या बरोबरच भोग व दमन या दोहोंचीहि जरुरी नाहीशी होते. मन वासनारहित झालें, म्हणजे भोग किंवा विवेकहीन दमन यांच्या फसव्या सुखप्रलोभनांना मन भुलून जात नाही.

तरी देखील, मुक्तजीवन हें भोगलोलुप जीवनापेक्षा संयमनिष्ठ जीवनास अधिक जवळचें आहे, हें लक्षांत टेवलें पाहिजे.

उपभोगापेक्षा दमन मुक्तीच्या अधिक जवळ आहे.

मात्र गुणधर्मांच्या बाबतींत तें या दोन्ही प्रकारच्या जीवनांहून निराळें आहे. म्हणूनच आत्मनिरोधा(self-repression)ची तीव्र जाणीव टाळून संयम साधत असेल, तर मुमुक्षूस वैवाहिक जीवनापेक्षा पूर्ण ब्रह्मचर्य हेंच श्रेयस्कर आहे. परंतु बहुतेक लोकांना अशा प्रकारचा संयम साधणें कठीण व कधी कधी अशक्यहि असतें; आणि त्यांच्यासाठी वैवाहिक जीवन हें ब्रह्मचर्यापेक्षा निःसंशय अधिक उपकारक असतें. ब्रह्मचर्याची विशेष क्षमता (aptitude) नसेल, तर साधारण लोकांना वैवाहिक आयुष्य हेच खात्रीने श्रेयस्कर आहे.

ज्याप्रमाणे ब्रह्मचर्यमय जीवनांत अनेक सद्गुणांची आवश्यकता असते व त्यांचा विकासहि होतो, त्याचप्रमाणे वैवाहिक जीवनांतहि अनेक सद्गुणांची आवश्यकता असते व त्यांचा परिपोषहि होतो.

ब्रह्मचर्य व विवाह ह्यांची संभाव्यता.

ब्रह्मचर्यामुळे साध्य होणारी अनासक्ति, संयमशीलता व स्वतंत्रता यांच्यांत ब्रह्मचर्याची खरी महती आहे. परंतु विषयेच्छेपासून मन पूर्णपणें मुक्त झाल्याखेरीज, खरें

आत्मस्वातंत्र्य मिळत नाही. त्याचप्रमाणे, परस्परविषयक ऐक्यभाव व परस्परांशीं स्वयंव्यवस्थापन (mutual adjustment) यांचे जे धडे वैवाहिक जीवनांत मिळतात, त्यांतच वैवाहिक जीवनाची महती साठवलेली आहे. परंतु खरें ऐक्य किंवा द्वैतभावाचा लोप केवळ दैवी प्रीतीनेच होतो; आणि मनांत जोंपर्यंत विषयेच्छेची किंवा तृष्णेची यत्किंचित् छायादेखील आहे, तोंपर्यंत या दैवी प्रीतीचा उदय होत नाही. विषयतृष्णेचा आंतरिक व स्वयंस्फूर्त त्याग करण्याच्या पथाचा अवलंब करूनच खरी स्वतंत्रता आणि ऐक्य यांचा लाभ होऊं शकतो.

ब्रह्मचर्य व विवाह या दोन्हीहि स्थितींत पूर्णतेचा पथ मोकळा असतो.

विवाहित आणि ब्रह्मचारी या दोघांनाहि जीवनाचा आंतरिक मार्ग एकच असतो. मुमुक्षु एकदा सत्याकडे आकर्षित झाला म्हणजे त्याला कशाचीहि इच्छा राहत नाही, आणि सत्य जों जों त्याच्या अधिकाधिक टप्प्यांत येत जातें, तों तों विषयेच्छेच्या भारापासून तो स्वतःची अधिकाधिक मुक्तता करून घेत जातो. ब्रह्मचर्याचा किंवा वैवाहिक जीवनाचा- कशाचाहि त्याने अवलंब केलेला असला, तरी भोग अगर विवेकहीन दमन यांच्या कल्पनापासून मिळणाऱ्या सुखाच्या भ्रामक आश्वासनांना तो फसत नाही. आणि या भोग आणि दमनाच्या भ्रामक द्वंद्वापासून मुक्त होईपर्यंत, तो विषयेच्छेचा आंतरिक व स्वयंस्फूर्त त्याग करण्याची रुवय करतो. विवाह अगर ब्रह्मचर्य या दोहोंतहि पूर्ण होण्याचा मार्ग मुमुक्षूस मोकळाच असतो. परंतु, ब्रह्मचर्यापासून सुरुवात करावयाची किंवा वैवाहिक जीवनापासून सुरुवात करावयाची, हें मुमुक्षूच्या संस्कारांवर आणि कर्मबंधांवर अवलंबून असतें. आपल्या पूर्वजन्मींच्या कर्मांमुळे प्राप्त

झालेल्या परिस्थितीचा तो आनंदाने स्वीकार करतो, एवढेंच नव्हे, तर जें ध्येय त्याला दृग्गोचर झालेलें असतें, त्या ध्येयाच्या प्रकाशांत अधिक आध्यात्मिक प्रगती करण्यासाठी, तो त्या परिस्थितीचा उपयोग करून घेतो.

मुमुक्षूने त्याला मोकळया असलेल्या या दोन मार्गांपैकी एकाची निवड केली पाहिजे. त्याने एकतर ब्रह्मचर्य तरी स्वीकारलें पाहिजे; किंवा वैवाहिक जीवन तरी स्वीकारले पाहिजे. परंतु वाटेल तें झालें, तरी या दोहोंमधील एखादा सोपासा मध्य साधण्याचें मात्र त्याने अगदी टाळलेंच पाहिजे. कामेच्छेच्या उच्छृंखल व व्यभिचारशील तृप्तीमुळे, मनुष्याची अतीशय केविलवाणी व अनुकम्पनीय स्थिति होते; आणि त्यामुळे उद्भ्रांत होऊन, तो भयानक व अदम्य कामवासनेच्या गोत्यांत हटकून फसतोच.

स्पष्ट निवड करण्याची आवश्यकता.

अशी अनिर्बंध आणि अनेकमुखी (diffused and undirected) कामवासना उच्च मूल्यांना अवगुंठित करीत असल्यामुळे, बंधन व मानसिक गुंतागुंत यांना चिरस्थायी करते; आणि विषयेच्छेच्या आंतरिक व स्वयंस्फूर्त त्यागाच्या आध्यात्मिक मार्गांत अनुल्लंघनीय अडचणी उत्पन्न करते. वैवाहिक जीवनांतील कामवासना ही विवाहबाह्य कामवासनेपेक्षा अगदी निराळी आहे. वैवाहिक जीवनांतील कामवासनेचे संस्कार बरेच फिके असतात; आणि ते अधिक सुलभतेने नष्ट होऊं शकतात. अनिर्बंध, बेजबाबदार व व्यभिचारशील स्त्रीपुरुषसंबंधापेक्षा, जबाबदारीची जाणीव, प्रेम आणि आध्यात्मिक ध्येय यांनी संपन्न असलेल्या स्त्रीपुरुष–सहवासा (sex-companionship) मध्ये कामवासनेच्या ध्येयोन्मुख उन्नयना (sublimation) ची किंवा उदात्तीकरणाची अधिक शक्यता असते.

ओझरतेंच व वरवर धावत राहण्याच्या सवयीचें गुलाम झालें, तर जीवनाचा पुरा व खरा रसास्वाद घेणे अशक्य होतें. वैवाहिक जीवनांतील साथीदाराच्या सहवासांत अनुभवाचे क्षेत्र इतकें विशाल असतें,



श्रीसद्‌गुरु मेहेरबाबा.

की त्या जीवनात मनाला केवळ कामवासनेच्या सूचनाच प्रथम होत नाहीत; तर अनुभवांना मर्यादित व विकृत करणाऱ्या गोष्टी ओळखण्याची व त्या नाहींशा करण्याची मनाला पूर्ण संधि मिळते. याप्रकारें, कामवासनेचा हळूहळू क्षय करून, आणि त्याग व प्रीति यांच्या अधिकाधिक व अर्थपूर्ण अनुभवांची वृद्धि करूनच मनुष्य प्रगत होत होत शेवटीं अनंतांत पोचतो.

---

# ७ : वैवाहिक जीवनाचें पवित्रीकरण

बहुतेक लोक विवाह करायचा म्हणूनच करतात. परंतु विवाह जीवनांत साह्यकर होईल, की एक अडचण होईल, हें वैवाहिक जीवन ज्या तऱ्हेने घालविलें जाईल, त्या तऱ्हेवर अवलंबून राहील. कांही अत्यंत महत्त्वाच्या आध्यात्मिक गोष्टी वैवाहिक जीवनांत शक्य होतात, परंतु त्यासाठी योग्य दृष्टिकोण मात्र हवा. आध्यात्मिक सत्याच्या दृष्टीने वैवाहिक जीवन पूर्णपणें निश्चित झालें, तरच तें यशस्वी होईल. 'करार' अगर 'बानियेगिरी' यांतील भागिदारीच्या दृष्टीने, अगर केवळ विषय-वासनेच्या दृष्टीने, वैवाहिक जीवनाकडे पाहिल्यास त्यापासून फारशी फलनिष्पत्ति होणार नाही. **वैवाहिक जीवन ही सर्वांत उत्तम प्रकारच्या जीवनाचा शोध करण्याकरिता स्वीकारलेली साहसपूर्ण व वस्तुत: अध्यात्मिकतेने संपन्न असलेली अशी महान योजना असावयास पाहिजे.** दोघेहि विवाहित जीवनसाथी आत्मजीवनांतील प्रसुप्त संभाव्यतांचा आविष्कार करण्यासाठी कृत-संकल्प होतात, तेव्हा त्यानी आपला वैयक्तिक फायदा काय होईल आणि त्याचें स्वरूप काय राहील, यांबद्दलच्या आकडेमोडीने अंगीकृत प्रयोगाला सुरवातीसच मर्यादित करणें इष्ट नसतें.

वैवाहिक जीवन हीं आध्यात्मिक व साहसपूर्ण योजना असावी.

वैवाहिक जीवनांत दोघांनाहि समजूतदारपणा ठेवून परस्परांशीं जुळणी करून घ्यावी लागते; पण कधीकधी त्यांच्या मूळ अपेक्षेबाहेरचे प्रश्न त्यांच्यासमोर येतात. आणि हें सर्वसाधारण जीवनासंबंधी जरी खरें असलें, तरी विशेषतः वैवाहिक जीवनासंबंधी हें अधिक खरें आहे. विवाहित स्त्रीपुरुषांना एखाद्या स्वतंत्र इच्छेमुळें उत्पन्न झालेल्या प्रश्नापेक्षा कितीतरी अधिक बिकट असलेला असा संपूर्ण व्यक्तिमत्वा (personality) चा अत्यंत गुंतागुंतीचा प्रश्न सोडवावा लागतो. कारण वैवाहिक जीवनात, दोन जीव अनेक रीतींनी संबद्ध झालेले असतात. अनिर्बंध वैषयिक संबंधाहून वैवाहिक जीवन अगदीच निराळें करणारा विशेष म्हणजे हाच होय. व्यक्तिमत्वाची वाढ होण्यासाठी जरूर असलेल्या इतर गोष्टींपासून कामवासनेच्या समस्येला विलग करणें व केवळ कामवासनेच्याच प्रश्नाची स्वतंत्रपणें सोडवणूक करण्याचा प्रयत्न करणें हें व्यभिचारशील व अनिर्बंध कामसंबंधा (promiscuous sexpartnership) चें वैशिष्ट्य आहे. अशी ही सोडवणूक जरी प्रथम सोपी वाटली, तरी ती केवळ वरवरची असते; व शिवाय ह्या सोडवणुकीमुळे, त्या प्रश्नाची खरी सोडवणूक करण्याच्या बाबतींत साधकाची दिशाभूल मात्र होते.

वैवाहिक जीवन हे व्यभिचारशीलतेहून अगदी भिन्न आहे.

मर्यादित व्यक्तित्वाच्या निरनिराळ्या अंगांचीं सापेक्ष मूल्यें जेव्हा परस्परांशी संबद्ध होतात, आणि निरनिराळ्या दृष्टिकोणांतून आणि विविध कोंदणांमधून दृष्टीस पडतात, तेव्हाच त्यांचें खरें महत्त्व समजून येतें. जर तीं मूल्यें निरनिराळीं, मधूनमधून व अलगअलग पाहिलीं, तर त्यांत सारासारविवेक करणें कठीण जातें. वैवाहिक

वैवाहिक जीवनांतील विविध हेतूंचा परस्परावरील ताण (tension) उदात्तीकरणास (sublimation) कारण होतो.

जीवनांत नानाविध अनुभवांना पुष्कळ जागा असते; आणि यामुळे मनातील विविध प्रवृत्ति वैवाहिक जीवनाच्या मूर्तरूप योजनेभोंवती संघटित होऊं लागतात. या विविध हेतूंच्या संघटने-( organisation ) मुळे उच्च आणि नीच मूल्यांबद्दल सारासार-विवेक करण्यास मदत होते, एवढेंच नव्हे तर त्यामुळे यशस्वी व विवेकसंपन्न उदात्तीकरणास आवश्यक असलेला मूल्यांचा परस्परांवर ताणहि उत्पन्न होतो.

वैवाहिक सबंधामध्ये आंतरिक जीवनांत शीघ्र परिवर्तन घडून येते.

एका दृष्टीने वैवाहिक जीवन हें मानवी समस्यांना तीव्रतम करतें. व यामुळेच वैवाहिक जीवन हें अज्ञानतिमिर व ज्ञानप्रकाश, यांचें-म्हणजे आध्यात्मिक बंधन व आत्मस्वातंत्र्य देणाऱ्या शक्तींचें समरांगण बनतें. सामान्य मनुष्यांचें वैवाहिक जीवन हें मिश्र हेतु व विचार यांनी ठरविलें जात असल्याने, त्यांत मनुष्यांतील आत्मदेव ( higher self ) व जीवात्मा ( lower self ) याच्यामध्ये अतिशय आग्रहपूर्ण विरोध असतोच; आणि हा विरोध 'मी' च्या 'हिणकस भागाचा क्षय करून टाकण्यास व खऱ्या व दिव्य आत्मदेवाचा आविष्कार होण्यास आवश्यक असतो. वैवाहिक जीवनांत, दोन आत्म्यांचे परस्परांस संबद्ध करणारे इतके धागेदोरे उत्पन्न होतात, की ते तोडून टाकावयाचे म्हटल्यास, साऱ्या जीवनांत अस्वस्थता आणि विस्कळीतपणा आल्याखेरीज राहत नाही; आणि एकमेकांपासून अलग होण्यापासून येणारी आपत्ती टाळण्याकरिता, आंतरिक जीवनांत पुनः तड-जोडीचें व्यवस्थापन सत्वर करण्याची आवश्यकता उत्पन्न होते. त्यामुळे वैवाहिक जीवन हें वास्तविक पाहतां, अत्यंत गुंतागुंतीच्या

कठीण आणि नाजूक परिस्थितीतहि टिकेल अशी परस्परविषयक जुळणी करण्याची एक प्रच्छन्न संधीच बनते.

नित्य व रोज घडणाऱ्या गोष्टी ठरविण्यांत ज्या प्रमुख घटकांचें प्राधान्य असतें, त्यांच्या स्वरूपावर वैवाहिक जीवनाचें आध्यात्मिक महत्त्व अवलंबून असते. जर वैवाहिक जीवन उथळ विचारावर अधिष्ठित असेल, तर त्याचें अधःपतन सर्व जगाविरुद्ध रचलेल्या केवळ स्वार्थपर कटाच्या स्वरूपांत होईल. परंतु जर वैवाहिक जीवन उच्च ध्येय-वादाने उस्फूर्त झालें असेल, तर त्याचे उन्नयन परस्परासाठी अधिकाधिक त्यागशील बनणाऱ्या दृढ मैत्रीने होईल; एवढेंच नव्हे, तर तें अखिल मानवतारूपी कुटुंबाची प्रेमपूर्वक सेवा करण्याचें एक माध्यम होईल. अशा रीतीने जेव्हा वैवाहिक जीवन मनुष्याच्या उन्नतीसाठी ईश्वरी योजनेला अनुकूल होतें, तेव्हा तें त्यांत निर्माण होणाऱ्या संततीला शुभ व केवळ कल्याणप्रदच ठरतें; कारण अशा जीवनात मुलाबाळांना, त्यांच्या पृथ्वीवरील जीवनाच्या सुरवातीपासूनच आध्यात्मिक वातावरण आत्मसात् करण्याचा लाभ मिळतो.

वैवाहिक जीवन हें ईश्वरी योजनेस अनुकूल असावयास पाहिजे.

मातापित्यांच्या वैवाहिक जीवनापासून अपत्यांना फायदा होत असला, तरी मुलांच्यामुळे तें वैवाहिक जीवन स्वतःहि अधिक संपन्न होतें, यांत शंका नाही. त्याग सुलभ आणि आनंददायक करणारें, व खरें आणि स्वयंस्फूर्त असें प्रेम व्यक्त करून तें वाढविण्याची संधि आईबापांना मुलांमुळे मिळते. मातापित्यांच्या

संततीमुळे वैवाहिक जीवनांत पावित्र्य व संपन्नता येते.

आध्यात्मिक उन्नतीच्या दृष्टीने, त्यांच्या जीवनांत मुलांचें स्थान अतिशय महत्त्वाचें आहे. यासाठी मुलांचा जन्म होईल तेव्हा त्यांनी त्यांचें आनंदाने स्वागत केलें पाहिजे.

मुलांचा वैवाहिक जीवनावर जो हक्क पोंचतो, त्या दृष्टीने अलीकडच्या संततिनियमनाच्या चळवळीचें नीट परीक्षण झालें पाहिजे. या प्रश्नाकडे कोणत्याहि विशेष व मर्यादित दृष्टीने न पाहतां, व्यक्ति आणि समाज यांच्या अंतिम कल्याणाच्या दृष्टीनेच पाहिले पाहिजे. इतर सर्व गोष्टींप्रमाणे याहि प्रश्नासंबंधींचें मत आध्यात्मिक विचारधारेवर अधिष्ठित असलें पाहिजे. संततिनियमनाच्या चळवळीकडे पाहण्याची पुष्कळ लोकांची दृष्टि वारंवार बदलणारी आणि अनिश्चित असते, याचें कारण त्या चळवळींत चांगलें आणि वाईट यांचें चमत्कारिक मिश्रण आहे. लोकसंख्येचें नियमन करणें हें संततिनियमनाच्या चळवळीचें ध्येय योग्य असलें, तरी तें साधण्याकरिता, त्या चळवळींत पुरस्कृत केलेलीं साधनें भयावह व शोचनीय आहेत. वैयक्तिक आणि सामाजिक कारणासाठी संततिनियमन इष्ट असतें, यांत संशय नाही. अनियमित संततीमुळे जीवनकलह तीव्रतर होतो; आणि त्यामुळे समाजांत कठोर चढाओढ सुरू होते. असंयत प्रजननामुळे, व्यवस्थितपणें पार न पाडतां येणारी जबाबदारी मातापित्यांवर पडते; व शिवाय लोकसंख्या अपरिमित झाल्यामुळे, ती पर्यायाने गुन्हे, युद्ध आणि दारिद्र्य यांसहि कारणीभूत होते. परंतु विवेकाच्या व सहृदयतेच्या दृष्टीने संततिनियमनाचे सर्व गंभीर प्रयत्न जरी न्यांय्य ठरले, तरी संततिनियमनाकरिता भौतिक साधनें वापरणें मूलतःच असमर्थनीय व अत्यंत गर्हणीय आहे.

संततिनियमनाची चळवळ आपले ध्येय दोषपूर्ण साधनांनी साधण्याचा प्रयत्न करते.

संततिनियमनवाद्यांनी पुरस्कृत केलेलीं संततिनियमनाचीं भौतिक साधनें आध्यात्मिक दृष्टीने पूर्णपणें निषेधार्ह आहेत. या भौतिक साधनांचा पुरस्कार मानवतेचें हित साधण्याच्या बुद्धीनेच केला जात असला तरी बहुतेक लोक, जवळ-जवळ नेहमीच, त्यांचा उपयोग केवळ स्वार्थाकरिता आणि मुलांच्या जननाची व संवर्धनाची जबाबदारी टाळण्याकरिता करतात. आणि कामवासनेला बळी पडण्याचा नैसर्गिक परिणाम इतक्या यशस्वी रीतीने सहज टाळतां आल्यामुळे, त्यांच्यामध्ये उच्च मूल्यांची जागृतीच उत्पन्न झालेली नाही, अशा लोकांना आत्मसंयमन करण्यास कांही प्रेरणाच राहत नाही. अशा रीतीने ते वासनापूर्तीच्या अतिरेकास बळी पडून, पाशवी विकारांचे गुलाम झाल्यामुळे, मन:संयमाकडे दुर्लक्ष करून आपली आध्यात्मिक, शारीरिक आणि नैतिक हानि करून घेतात.

भौतिक साधनांचा अवलंब केल्यास मन:संयमास साधारणत: प्रेरक होणारा हेतू बाजूस सारल्या जातो.

भौतिक नियमनसाधनांचा उपयोग करणें सोपें असल्यामुळे, या प्रश्नाची आध्यात्मिक बाजू तर दृष्टीआड होतेच, परंतु त्यांच्यामुळे मनुष्यास स्वत:च्या आध्यात्मिक गौरवाची व स्वातंत्र्यक्षमतेची जाणीव होणेंहि दुरापास्त होतें. अविचारी आणि अनियमित उपभोगाची प्रतिक्रिया आध्यात्मिक बंधनाच्याच स्वरूपांत हटकून होते. म्हणून विशेषत: साधकांनी आणि सामान्य लोकांनीहि—कारण तेहि संभाव्य मुमुक्षूच असतात—संततिनियमनासाठी भौतिक साधनांवर अवलंबून राहणें अनुचित आहे व त्याकरिता त्यांनी केवळ मन:संयमाचाच

विकारक्षोभांतून शांतीप्रत जाण्याकरिता मन:संयम अवश्य आहे.

**अवलंब केला पाहिजे.** ज्या हेतूंमुळे संततीनियमनाची चळवळ उत्पन्न होते, ते हेतु मनःसंयमाच्या द्वारा सफल होतात; व संयमाचा अवलंब केल्यास, भौतिक साधनांमुळे होणाऱ्या आध्यात्मिक अनर्थांपासूनहि मनुष्य बचावला जातो. मनःसंयमाच्या द्वारा संततीचें नियमन शक्य होतें, एवढेंच नव्हे, तर मनुष्याच्या दैवी आत्मगौरवाची जागृति आणि आध्यात्मिक श्रेयाची प्राप्ति होण्याकरिताहि, मनःसंयम अत्यंत आवश्यक आहे. **विवेकपूर्वक केलेल्या मनःसंयमामुळे विकारजन्य क्षोभापासून शांतीप्रत, बंधनापासून मुक्ततेप्रत आणि पशुतेपासून पावित्र्याप्रत जाणें शक्य होतें.** विचारी लोकांनी या प्रश्नाच्या ह्या उपेक्षित बाजूचें योग्य महत्त्व जाणलें पाहिजे.

स्त्रियांना मुलांच्या जननाचा आणि जोपासनेचा त्रास व जबाबदारी सोसावी लागते; म्हणून मनःसंयम न साधल्यास त्यांच्यावर पुरुषांपेक्षा अधिक अनिष्ट परिणाम होतो, असें प्रथम दर्शनी वाटतें. परंतु खरोखर पाहतां, स्त्रियांच्या बाबतींत हा अन्यायच ठरतो असें नाही. स्त्रियांना जननाची व जोपासनेची जबाबदारी व त्रास सोसावा लागतो, हें खरें असलें, तरी त्यांच्या मोबदल्यामध्ये, त्यांना मुलांच्या लालनपालनाचा आनंदहि मिळतो. पितृत्वाच्या आनंदापेक्षा मातृत्वाचा आनंद अधिक असतो. याशिवाय पित्यावर मुलांच्या शिक्षणाची व आर्थिक जबाबदारीहि असतेच. वैवाहिक जीवनाचें यथोचित व्यवस्थापन केल्यास, त्यांतील मातृपितृत्वाच्या जबाबदारीची विभागणी अन्याय्य होण्याची शक्यता नाही. ती जबाबदारी स्त्री व पुरुष या दोघांनीहि वाटून घेतली पाहिजे. मातापित्यांना परस्परासंबंधीच्या जबाबदारीची जाणीव खरोखरच असेल,

मातृपितृत्वाची संयुक्त जबाबदारी.

तर ते दोघेहि अविचाराऐवजी स्वतःमध्यें पूर्ण मनःसंयम साधण्याचा सहयोगशील प्रयत्न करतील आणि एखाद्या वेळीं हा प्रयत्न फसला, तर आपली क्रमप्राप्त मातृपितृत्वाची जबाबदारी ते आनंदाने आणि स्वेच्छेने पार पाडतील.

जर एखाद्याला संततीची जबाबदारी नको असेल, तर त्याला एकच मार्ग मोकळा आहे. त्याने ब्रह्मचारी राहून पूर्ण मनःसंयम पाळला पाहिजे. असा मनःसंयम अतिशय कठीण असला, तरी अशक्य नाही. केवळ आध्यात्मिक दृष्टीने ब्रह्मचर्य हें उत्तम आहे. परंतु तें कठीण असल्याने फारच थोड्यांना साधतें. ज्यांना तें साधत नाही, त्यांच्यासाठी अनिर्बंध विषयवासनेस बळी पडण्यापेक्षा वैवाहिक जीवन हेंच श्रेयस्कर ठरतें. वैवाहिक जीवनामध्ये पाशवी विकारास ताब्यात ठेवण्याचें शिकतां येतें. परंतु हें अर्थात् हळूहळूच होणार. मनःसंयम न साधल्यास, त्यांनी निसर्गाच्या व्यापारांत यांत्रिक व भौतिक साधनांच्या द्वारा ढवळाढवळ करूं नये. निसर्गप्राप्त परिणामांचें आनंदाने स्वागत करून, मुलांची जबाबदारी स्वीकारण्यास त्यांनी तयार असलें पाहिजे.

वैवाहिक जीवनात संततीचे स्वागतच केले पाहिजे.

आध्यात्मिक दृष्टीने पाहतां, केवळ मनःसंयमाच्या द्वाराच संततिनियमन केलें पाहिजे. कोणत्याहि कारणास्तव, व कोणत्याहि परिस्थितींत (मनःसंयमाचें ध्येय दृष्टीआड न करितां, तात्पुरतें साधन म्हणून देखील), संततिनियमनाकरिता भौतिक साधनें वापरणें अनिष्टच आहे. तीं वापरल्यास, मनःसंयम साधण्याची मनुष्याची खरी इच्छा असूनहि तो साध्य करणें त्याला

भौतिक साधनांचा अवलंब केल्यामुळे मानसिक शक्तीचा ऱ्हास होतो.

ममत्वबुद्धिप्रधान ( possessive ) प्रेमाऐवजी त्यांच्या हृदयांत त्यागशील व विशाल प्रीति उद्भवते. खरोखर पाहतां, वैवाहिक



श्रीमेहेरबाबा

जीवनाचा बुद्धियुक्त उपयोग करून घेणारास, आध्यात्मिक मार्गावर इतकी प्रगति करून घेतां येते की, शाश्वत जीवनाच्या तीर्थभूमींत प्रविष्ट होण्याकरिता, . साधकाला केवळ सद्गुरूच्या स्पर्शाचीच आवश्यकता राहते.

---

## ८ : : साधनेचे गंभीरतर स्तर

स्वतःच्या धर्मात निर्दिष्ट केलेले बाह्य विधि व समारंभ यांचें पालन करणें, हीच बहुतेक लोकांची आध्यात्मिक साधना असते. आत्मशुद्धि व मनोनिग्रह यांच्या प्राप्तीकरिता, अशा प्रकारच्या विधिप्रधान बाह्य क्रिया प्रारंभीच्या अवस्थेंत पोषक असल्यामुळे, एका दृष्टीने महत्त्वाच्या असतात; परंतु अखेरीस साधकाला विधिनियमरूप बहिरंगाचें अनुसरण सोडून, साधनेच्या गंभीरतर स्तरांमध्ये प्रवेश करावा लागतो. असें झालें म्हणजे धर्माचें बाह्यांग गौण होऊन, साधकाला सर्व विश्वधर्मांत निर्देशिलेल्या रहस्यपूर्ण तत्त्वांमध्ये गोडी वाटूं लागते. **खरी साधना म्हणजे आध्यात्मिक बोधावर आधारलेलें जीवन होय.** व ती आध्यात्मिक तत्त्वांमध्ये रुचि घेणाऱ्यांनाच प्राप्त होते.

बाह्य विधि व समारंभ टाकून साधनेच्या गंभीरतर स्तरामध्ये प्रवेश.

कडक नियमानुसार चालणें हें साधनेचें रहस्य कधीहि होऊं शकत नाही. जीवनांत अपवादरहित सारखेपणा किंवा कडक नियमबद्धता असूं शकत नाही व असण्याची आवश्यकताहि नाही. **आध्यात्मिक क्षेत्रांत साधनेच्या प्रकारभेदांना मुबलक वाव आहे.** सर्वांचें आध्यात्मिक ध्येय एकच असलें,

साधनेचे प्रकारभेद.

तरी कोणत्याहि एखाद्या विशिष्ट साधकाला कोणती साधना उपयुक्त ठरेल, तें त्याच्या स्वभावावर व संस्कारांवर अवलंबून असते; म्हणून प्रत्येक साधकाची साधना स्वतंत्र असूं शकते. परंतु सर्वांचें ध्येय एकच असल्यामुळे, साधनेच्या प्रकारभेदांना मौलिक महत्त्व देतां येत नाही: व असे काही बाह्य भेद असले, तरी साधनेच्या गंभीरतर स्तरांचें महत्त्व सर्वांकरताच असतें.

आध्यात्मिक क्षेत्रांतील साधना ही भौतिक क्षेत्रांतील साधनाहून मूलत: भिन्नच राहणार; कारण आध्यात्मिक क्षेत्रांतील ध्येय हें भौतिक क्षेत्रांतील ध्येयाहून तत्त्वत:च भिन्न असतें. भौतिक क्षेत्रांतील साध्य हें कालप्रवाहांत उत्पन्न होणारें असून, त्याला आरंभ व शेवट असतो; परंतु आध्यात्मिक क्षेत्रांतील साध्य परिपूर्णता असून, ती कालप्रवाहाच्या बंधनांच्या पलीकडे असते. म्हणून भविष्यकालाच्या गर्भात असलेली वस्तु संपादन करणें, हें भौतिक साधनाचें लक्ष्य असतें; व जी सद्वस्तु **नेहमीच होती, आताहि विद्यमान आहे व चिरकालपर्यंत राहणारच, तिची अनुभूति करणें, हें आध्यात्मिक साधनेचें लक्ष्य आहे.**

आध्यात्मिक क्षेत्रांतील साधना भौतिक क्षेत्रांतील साधनाहून भिन्न आहे.

जीवनाच्या आध्यात्मिक ध्येयाचा शोध जीवनांतच केला पाहिजे, जीवनाबाहेर नाही; म्हणून आध्यात्मिक साधना अशी पाहिजे की तिने साधारण मानवी जीवन आत्मनिष्ठ बनविलें पाहिजे. एक दिवस चमकणाऱ्या, पण अखेरीस निष्प्रभ होऊन, नेहमीकरिता अंतर्धान पावणाऱ्या एखाद्या सीमित साध्याची प्राप्ति करणें, हें कांही आध्यात्मिक साधनेचें लक्ष्य नव्हे; तर त्या

आध्यात्मिक साधनेच्या ध्येयाचें साधारण स्वरूप.

साधनेचें ध्येय म्हणजे साधारण मानवी जीवनाच्या स्वरूपांत आमूल परिवर्तन करून, अनंततेंतील निरंतरच्या सद्यःक्षणां ( eternal now ) तच सत्यास अभिव्यक्त करणारें जीवन प्रस्थापित करणें, हें होय. परमात्मस्थितीचें जाणीवपूर्वक आस्वादन करण्याचा जो दैवी हेतु आहे, त्या हेतूशीं व्यक्तीचें जीवन समस्वर ( intime ) करितां आलें, म्हणजेच साधना सफल झाली. ध्येयाच्या ह्या स्वरूपाकरिता साधना सर्वथा अनुकूल बनली पाहिजे.

साधना साध्यांत मिळून जाते.

जीवनाच्या सर्व स्तरांमध्ये ईश्वरत्व साधण्याचें लक्ष्य गांठण्याच्या कामीं आध्यात्मिक साधनेच्या प्रत्येक भागाचें व्यवस्थापन झालें पाहिजे; म्हणून एका दृष्टीने आध्यात्मिक साधनेच्या विविध स्तरांचे स्वतःचेच आध्यात्मिक पूर्ण स्थितीशीं निरनिराळ्या अंशांत, साधर्म्य असावें लागतें. साधना ज्या मानाने आध्यात्मिक आदर्श व्यक्त करील, त्या मानाने ती पूर्ण असते;—म्हणजे ज्या मानाने तिचें पूर्ण जीवनाशीं सादृश्य असेल, त्या मानाने ती पूर्ण असते. याप्रमाणे ज्या मानाने साधना व तिचा आदर्श यांच्यांत अधिक अंतर असतें, त्या मानाने साधना अपूर्ण असते; व हें अंतर जितकें कमी असेल, तितकी ती पूर्ण असते. जेव्हा साधना पूर्ण होते, तेव्हा ती परिपूर्ण आत्मजीवनरूपी साध्यांत विलीन होते; आणि साधना व साध्य यांच्यांतील भेद अभेदपर सत्ताविस्तारांतील अविकल संपूर्णतेमध्ये लुप्त होतो.

साधनेचा साध्याशीं असलेला हा संबंध भौतिक क्षेत्रांतील साधन व साध्य यांमधील संबंधाहून अगदी निराळा आहे. भौतिक

क्षेत्रामध्ये, साध्य हें साधनाच्या अगदी बाहेर पडतें, व साधन व साध्य यांच्या स्वरूपांत स्पष्ट फरक असतो. उदाहरणार्थ, बंदुकीचा चाप ओढणें हें मनुष्यास ठार मारण्याचें साधन होतें; परंतु मनुष्यास ठार मारणें हें बंदुकीचा चाप ओढण्याहून स्वरूपतःच भिन्न आहे. परंतु आध्यात्मिक क्षेत्रांत साधना व साध्य हे एकमेकांशीं पूर्णपणें बहिर्भूत नसतात; व त्यांच्या स्वरूपांत स्पष्ट भेद नसतो. आध्यात्मिक क्षेत्रांत साधना व साध्य ह्यामध्ये अनुल्लंघनीय अंतर ठेवतां येत नाही; व त्यामुळे **आध्यात्मिक क्षेत्रामध्ये साधनेचा अभ्यास म्हणजे साध्याची अंशतः सिद्धीच असते.** हा विरोधाभास येथें उत्पन्न होतो. या प्रकारें, कित्येक आध्यात्मिक साधनांना, जणूं काय त्या स्वतः साध्य आहेत, इतकें महत्त्व कां दिलें जातें, हेंहि स्पष्ट होतें.

साधना ही साध्याची आंशिक सिद्धि आहे.

आध्यात्मिक साधनेच्या गंभिरतर स्तरांच्या दृष्टीने, तिचे तीन भाग पडतात—( १ ) ज्ञानमार्ग ( २ ) कर्ममार्ग व ( ३ ) प्रेम किंवा भक्तिमार्ग. ज्ञानमार्गांत तीन गोष्टींचा समावेश होतो–( क ) यथार्थ बोधामुळे उत्पन्न होणारा अनासक्तीचा अभ्यास, ( ख ) निरनिराळे ध्यानप्रकार, व ( ग ) विवेक व अंतःप्रज्ञा ( intuition ) यांचा सतत उपयोग. ज्ञान मिळविण्याच्या या तीनहि प्रकारांचें स्पष्टीकरण आवश्यक आहे.

ज्ञान, कर्म व प्रेम यांच्या द्वारा साधना.

जीवात्मा नामरूपात्मक जगांत फसतो; व स्वतः परमात्म्याचा अंश असल्याचें जाणत नाही. हें अज्ञान आत्म्याचें बंधन असून, हें बंधन

तोडणें, हेंच आध्यात्मिक साधनेचें उद्दिष्ट असावयास पाहिजे. जगांतील वस्तूंचा बाह्य त्याग बहुधा मुक्तिकारक साधनाप्रकारांत मोडला जातो. परंतु असल्या प्रकारचा बाह्य त्याग महत्त्वाचा असला तरी अगदी आवश्यक नाही. जगांतील वस्तूविषयीची अंतस्थ तृष्णा टाकून देण्याची खरी आवश्यकता असते. तृष्णात्याग साधल्यास, आत्म्याने जगांतील वस्तूंचा बाह्य त्याग केला किंवा न केला, तरी त्यास खास महत्त्व राहत नाही. भ्रमरूप नामरूपात्मक जगापासून तो आंतून सुटला असतो व त्याची मुक्तीची पूर्वतयारी झाली असते. अनासक्ति हा ज्ञानसाधनेचा एक महत्त्वाचा भाग आहे.

(१–क) अनासक्ति.

आध्यात्मिक ज्ञान प्राप्त करण्याकरिता ध्यान हा एक दुसरा उपाय आहे. ध्यानाला फक्त गुहेमधील मुनिजनांचीच साधना मानणें बरोबर नाही. प्रत्येक मनुष्य कोणत्या ना कोणत्या प्रकारचें ध्यान करतच असतो; पण साधकाच्या ध्यानाचें वैशिष्ट्य हें आहे, की त्यांत **आध्यात्मिक दृष्टीने रहस्यपूर्ण असलेल्या वस्तूंबद्दल सुसंगत व व्यवस्थित चिंतन असतें.** ध्यानरूपी साधना व्यक्तिपर (personal) किंवा व्यक्तिनिरपेक्ष (impersonal) असूं शकते.

(१–ख) ध्यान.

ध्यानाचा विषय जेव्हा आध्यात्मिक पूर्णावस्था प्राप्त झालेली व्यक्ति असते, तेव्हा तें व्यक्तिपर किंवा रूपाश्रित ध्यान होय. पूर्वीचे किंवा हल्लींचे अवतार किंवा सद्गुरु यांच्यापैकी कोणताहि विषय साधकाने सगुण ध्यानाकरिता निवडावा. सगुण ध्यानाच्या द्वारा, साधक हा सिद्ध पुरुषांचें आध्यात्मिक ज्ञान व दैवी संपत्ति यांचें ग्रहण करतो; व अशा ध्यानांत प्रेम व शरणागति अंतर्भूत असल्या-

मुळे, साधक अंतिम अनुभूति देण्यास समर्थ असलेल्या गुरूच्या अनुग्रहास आमंत्रित करतो. मूर्तिनिष्ठ ध्यानरूपी साधनेने साधकाला गुरूचें साधर्म्य तर लाभतेंच, पण सत्यस्वरूपांत सद्गुरूशीं ऐक्य पावण्याचा त्याचा मार्गहि खुला होतो.

परमात्म्याच्या निराकार व अपरिमित स्वरूपाचें चिंतन हें व्यक्तिनिरपेक्ष ( impersonal ) ध्यान होय. ह्या अव्यक्त चिंतनाने मनुष्य ईश्वराच्या रूपातीत स्थितीप्रत प्रगत होतो. परंतु साकार ध्यान व सदाचारसंपन्नता यांच्या द्वारा साधकाची योग्य तयारी झालेली नसल्यास, मूर्तिनिरपेक्ष अव्यक्त ध्यान हें नीरस व निष्फल होतें. अनंततेच्या अंतिम अनुभूतीमध्ये, व्यक्तित्वाची सीमाबद्धताहि नसते, व शुभाशुभ द्वंद्वगत भेदहि नसतो; पण ती अनुभूति प्राप्त होण्यास, रूपांतून अरूपांत व दैवी संपत्तीमधून पापपुण्यातीत ईश्वरावस्थेंत प्रविष्ट व्हावें लागतें. त्याचप्रमाणे सत्यानुभूति प्राप्त होण्याची दुसरीहि एक अट आहे; व ती म्हणजे साधकाला स्वतःचें मन पूर्णपणें निश्चल ठेवतां आलें पाहिजे. परंतु मनांतील सर्व संस्कार नाहीसे झाल्यावरच हें शक्य होतें; व संस्कारांचें अखेरचें परिमार्जन गुरुकृपेशिवाय अशक्य असल्याने, अव्यक्तचिंतन देखील गुरूच्या साहाय्याशिवाय यशस्वी होऊं शकत नाही.

विवेकाचा निरंतर अभ्यास करून, साधक जोंवर श्रेष्ठ अंतःप्रज्ञा अनावृत करीत नाही, तोंवर त्याची ज्ञानसाधना अपुरीच राहते.

( १–ग ) विवेक व अंतःप्रज्ञा.

जो साधक स्वतःचा विवेक जागृत ठेवून, सत्य व शाश्वत मूल्यांविषयीच्या अंतःप्रज्ञेचा उपयोग करतो, त्याला ईश्वरानुभूति होते. प्रत्येकामध्ये अपरिमित ज्ञान प्रसुप्त स्थितींत आहेच.

परंतु तें आविष्कृत केलें पाहिजे; व जो कांही बोध स्वतःला झाला असेल, तो आचरणांत उतरविणें, हाच ज्ञानसंवर्धनाचा राजमार्ग आहे. साधकाची जन्मजात मूल्यनिर्धारणशक्ति व तत्त्वदर्शी सिद्धांनी मानवतेस वेळोवेळीं केलेला उपदेश, यांच्या द्वारा साधकाने पुढचें पाऊल कोणत्या दिशेंत टाकावें, यावर यथेष्ट प्रकाश मिळतो. परंतु हें ज्ञान अमलांत आणणेंच फार कठीण असते. स्वतःस प्राप्त असलेल्या ज्ञानाचा उपयोग करणें, हाच अध्यात्मज्ञान वाढविण्याचा सर्वश्रेष्ठ उपाय आहे.

ज्ञानसाधना सफल व्हावयाची असेल, तर त्याची पूर्ति, प्रत्येक पावलाला क्रियाशीलतेला प्राधान्य देऊन केली पाहिजे. दैनिक जीवन विवेकाने निर्दिष्ट असून, त्याच्या स्फूर्तीच्या मुळाशीं श्रेष्ठ अंतःप्रज्ञा पाहिजे. स्वतःचें वर्तन, निर्भयपणें व न कचरतां, अंतःकरणांतील सर्वोत्तम प्रज्ञेस अनुसरून ठेवणें, हाच कर्मयोग. साधनेमध्ये केवळ सिद्धान्तांना महत्त्व नसून, आचाराला महत्त्व आहे. बौद्धिक ज्ञानापेक्षा सदाचार अधिक श्रेष्ठ आहे. सम्यक् ज्ञानावर आधारलेला आचार केव्हाहि जास्तच फलप्रद राहणार; परंतु आचारांत घडलेली चूक देखील कधीकधी बोधप्रद ठरते. केवळ बौद्धिक सिद्धान्त निभ्रान्त असले, तरी निष्फल असतात. जगांतील सर्व तत्त्वज्ञान जाणणाऱ्या, पण त्या तत्त्वांचा आपल्या दैनिक जीवनावर मुळीच परिणाम न होऊं देणाऱ्या पंडितापेक्षा, एखादा अडाणी पण ईश्वराचें नांव अंतःकरणपूर्वक घेणारा मनुष्य, ईश्वराच्या अधिक जवळ असतो.

(२) कर्ममार्गाचा महिमा.

साधनाक्षेत्रांत, बौद्धिक सिद्धान्तापेक्षा आचाराचें जें अधिक महत्त्व

आहे, तें एका सुप्रसिद्ध गाढवाच्या गोष्टीवरून स्पष्ट होईल. एक गाढव बराच वेळपर्यंत रस्ता चालून थकलें; व खूप भूक लागली असतां, त्याला रस्त्याच्या उजव्या व डाव्या बाजूला कांही अंतरावर गवताच्या दोन गंजी दिसल्या. त्या गाढवाला असें वाटलें की त्या दोन गंजीपैकी कोणती गंजी निश्चितपणें अधिक ग्राह्य आहे, याचा निर्णय झाल्याशिवाय, त्या दोन गंजीपैकी एकीकडे जाणें, शहाणपणाचें होणार नाही, कारण पूर्ण विचार न करता व एक गंजी टाकून दुसरीची निवड करण्यास समर्थनक्षम कारण नसतांना, केलेली क्रिया विवेकजन्य न होतां इच्छाप्रेरित ठरेल. तेव्हा त्याने प्रथम त्याच्या रस्त्यापासून त्या दोन्हीहि गंजी क्रमशः किती अंतरावर आहेत, याचा विचार केला. त्याच्या दुर्दैवाने विचारान्तीं, त्याला असें आढळून आलें, की त्या दोन्हीहि गंजी रस्त्यापासून सारख्याच अंतरावर आहेत. मग 'योग्य' निवड करण्याकरिता दुसरें एखादें कारण शोधीत असताना, त्या गंजींच्या आकाराची तुलना करण्याचें त्याने टरविलें. पण क्रियमाण होण्यापूर्वी सैद्धान्तिक खात्री करून घेण्याचा हा त्याचा दुसरा प्रयत्नहि विफलच झाला, कारण विचारान्तीं त्या दोन गंजींचा आकारहि अगदी सारखाच आहे, असा त्याचा निर्णय झाला. नंतर गाढवास सुलभ असलेल्या तितिक्षेने व चिकाटीने, त्याने गवताची श्रेष्ठकनिष्ठता इत्यादि सर्व गुणविशेषांचाहि तुलनात्मक विचार केला, परंतु त्याच्या विचाराच्या क्षेत्रांत येऊं शकणाऱ्या सर्व बाबतींत त्या दोनहि गंजी सारख्याच वांच्छनीय असल्याचें त्याला दिसलें.

गाढवाची गोष्ट.

अखेरीस असें झालें की त्या गाढवाला त्याची निवड सैद्धांतिक दृष्टीने निर्दोष करण्याकरिता, एकहि निर्णयात्मक कारण सापडूं

शकलें नाही. त्यामुळे गवताच्या त्या दोन गंजीपैकी एकाहि गंजीकडे न जाता, तो पूर्वीप्रमाणेच क्षुधित व क्लान्त राहून, सरळ तसाच पुढे गेला. त्या दोन गंजीमुळे त्याचा यत्किंचितहि फायदा झाला नाही. जर त्या गाढवाने सैद्धान्तिक निश्चया (theoretical certainty) ची पर्वा न करितां, एका गंजीची निवड केली असती, तर कदाचित् त्याने ग्रहण केलेली गंजी कनिष्ठहि निघाली असती; परंतु या बौद्धिक निर्णयांतील चुकीची भरपाई व्यावहारिक दृष्टीने पुरेपूर भरून निघाली असती. अध्यात्मजीवनामध्ये, पथ चालण्यास सुरवात करण्यापूर्वीच त्या पथाचा संपूर्ण नकाशा जवळ असण्याची आवश्यकता नसते; उलटपक्षीं, असें पूर्ण ज्ञान उपकारक न होतां, वास्तविकपणें अपकारकच ठरण्याचा संभव अधिक असतो. **स्वतःवर जोखीम घेऊन, जे वीरतापूर्वक प्रयोगशील होतात, त्यांनाच अध्यात्मजीवनांतील गूढ रहस्यविशेष प्रगट होतात.** ज्या ऐदी लोकांना प्रत्येक पावलागणिक हमी (guarantee) पाहिजे असते, अशांना ते प्राप्त होत नाहीत. जो किनाऱ्यावरून समुद्राचा विचार करतो, त्याला फक्त समुद्राच्या पृष्ठभागाचेंच ज्ञान होईल. परंतु ज्याला समुद्राच्या खोलीचा थांग घ्यायचा आहे, त्याने त्यांत धाडसाने बुडी घेण्यासच तत्पर असलें पाहिजे.

क्रियेचा उगम सत्यदर्शनांत असेल, तेव्हाच कर्मयोगरूप साधना परिपूर्ण होते. ज्ञानयुक्त क्रिया बंधनकारक होत नाही, कारण ती अहंमूलक नसून, स्वार्थरहित असते. स्वार्थपरायणतेंत अज्ञान प्रतिबिंबित होतें, व स्वार्थशून्यतेमध्ये सत्य प्रतिबिंबित होतें. बाह्य फलांच्या किंवा परिणामांच्या दृष्टीने स्वार्थरहित सेवाजीवनाचा अंगीकार करावयाचा नसतो, तर तें जीवन त्यांतील स्वयंसिद्ध अर्थपूर्णतेमुळे स्वीकारावयाचें असतें. परंतु स्वार्थरहित

स्वार्थरहित सेवा.

क्रियाशीलतेंतील अंतर्गत विलक्षणताच अशी आहे, की अज्ञान-जनित स्वार्थपरतेस कदापि साध्य नसलेला महत्तर लाभ साधकाला स्वार्थरहित क्रियाशीलतेमुळे मिळतो. स्वार्थामुळे जीवन संकुचित होऊन, तें पृथक् व्यक्तित्वाच्या खोट्या कल्पनेभोवती भ्रमत राहतें. परंतु स्वार्थरहित क्रियाशिलता ही भेदभ्रम लयास नेण्यास मदत करते; व सर्वात्मकते ( all-selfness ) ची अनुभूति ज्यांत आहे, अशा सीमारहित जीवनाचें ती प्रवेशद्वार बनतें. माणसाजवळ जें कांही आहे, तें तो गमावूं शकतो; व ज्याची तो इच्छा करतो, तें त्याला अप्राप्यहि असूं शकतें. पण जें कांही त्याने ईश्वरार्पणबुद्धीने दिलें असेल, तें त्याला तत्क्षणींच परतहि मिळून चुकलें असतें. कर्मयोगाची साधना ही अशी असते.

(३) प्रेम.

ज्ञान व कर्म या साधनांपेक्षाहि प्रेम किंवा भक्ति ही साधना अधिक महत्त्वाची आहे. प्रेमाचें समर्थन प्रेमांतच आहे. तें स्वयंपूर्ण आहे; व म्हणून, त्याची पूर्ति दुसऱ्या कशानेहि करण्याची आवश्यकता नाही. संतश्रेष्ठांनी भगवत्प्रेमांतच पूर्ण संतोष मानला; व दुसऱ्या कशाचीहि इच्छा केली नाही. ज्या प्रेमांत आशा आहे, तें प्रेमच नाही. ईश्वरीय प्रेमाच्या तीव्रतेंत प्रेमी प्रियतमाशीं एकत्व पावतो. प्रेमाहून मोठी साधना नाही; प्रेमाहून श्रेष्ठ कायदा नाही; व प्रेमाहून अधिक उंच दुसरें प्रामण्य नाही, कारण प्रेम भगवत्स्वरूप झाल्यावर अनंत होतें. दैवी प्रेम व ईश्वर हे एकच आहेत; ज्याच्याजवळ दैवी प्रेम आहे, त्याला भगवंताची प्राप्ति झालीच.

प्रेमाला साधना व साध्य ह्या दोहोंचें अंग मानतां येईल; परंतु प्रेमाचें स्वयंसिद्ध महत्त्व इतकें स्पष्ट आहे, की त्याला अन्य वस्तूंच्या

प्राप्तीचें साधन मानणें, ही बहुधा चूक समजली जाते. दुसऱ्या कोणत्याहि साधनेने ईश्वरामध्ये इतक्या सहजतेने व पूर्णतेने लय होत नाही. प्रेमाच्या दिग्दर्शनांत सत्याप्रत जाणारा पथ आनंदमय व आयासरहित होतो. साधारणतः साधनेमध्ये प्रयत्नशीलता अंतर्भूत असतेच; कधीकधी प्रलोभनांच्या सान्निध्यांत असतांना, विरक्ति टिकविण्याकरिता प्रचंड प्रयत्नहि करावे लागतात. परंतु प्रेमात प्रयत्नभावाला वाव राहत नाही, कारण तें सहजस्फूर्त असतें; व सहजता ही अध्यात्मजिवनाचा प्राण आहे. चेतनेच्या श्रेष्ठतम व पूर्णपणें तत्त्वाकार झालेल्या स्थितीला सहजावस्था म्हणतात; व या सहजस्थितींत अनिर्बंधता व निरंतर आत्मानुभूति असते. **साधकाची सर्व कांही प्रयत्नशीलता शेवटची प्रयत्नशून्य व सहजसिद्ध अवस्था प्राप्त करण्याकरिताच असते, ही आध्यात्मिक साधनेची नवलाई आहे.**

प्रयत्नशीलतेंतून सहजावस्थेची प्राप्ति.

आध्यात्मिक साधनेचें स्वरूप एका कस्तुरीमृगाच्या गोष्टीवरून विशद होतें. एकदा एक कस्तुरीमृग आपल्या दुर्गम व ओबडधोबड पर्वतप्रदेशांमध्ये स्वच्छंदाने क्रीडाविहार व संचरण करीत असतां, त्याला अकस्मात् अननुभूत व मनोमुग्धकारि सुगंध प्रत्ययास आला. त्या सुगंधाने त्याचें हृदय इतकें अस्थिर व उन्मत्त झालें, की त्याने त्या सुगंधाचें उगमस्थान शोधून काढण्याचें ठरविलें. गंधोन्मादाने त्याची उत्कंठा तीव्रतम झाली; व तो त्या शोधांत पर्जन्यवृष्टि, तुफान वादळ, मेघांची घनघोर गर्जना व विजांचा कडकडाट, किंवा कडक थंडी व असह्य सूर्यताप यांची परवा न करता, रात्रंदिवस, अविश्रान्त शोधांत व्याकूळ

कस्तूरीमृगाची गोष्ट.

होऊन, इतस्ततः भटकूं लागला. न कचरतां व निर्भयपणाने, तो कस्तुरीमृग एका दरींतून दुसऱ्या दरीत व पर्वताच्या कड्यासुळ्यांवर उड्या मारीत बेगुमानपणें संचार करीत असतांना, एका उंच व धोक्याच्या सुळक्यावरून पाय घसरून खालीं पडला; व त्याला प्राणघातक जखम झाली. पण त्याचें प्राणोत्क्रमण होत असतांना, त्याला आढळून आलें, कीं ज्या सुगंधाने तो इतका व्याकूळ झाला होता, **तो सुगंध त्याच्या स्वतःच्याच नाभिस्थानांतून निघत होता.** परंतु त्याच्या जीविताच्या ह्या अखेरच्या क्षणीं, तो कस्तूरीमृग हर्षातिशयाचा अनुभव घेत होता; व त्याच्या चर्येवर एक अनिर्वचनीय शांति होती !

साधकाची सर्व कांही आध्यात्मिक साधना त्या कस्तुरीमृगाच्या धडपडीप्रमाणे असते. **साधकाचें अहंनिष्ठ जीवन संपुष्टांत आणणें,** ह्यांतच साधनेची सफलता आहे; परंतु त्याच क्षणामध्ये, साधकाला हीहि प्रतीति येते, कीं त्याच्या सुखदुःखांचें, जोखीमयुक्त साहसाचें, त्यागपर व बेगुमान यत्नशीलतेचें व व्याकुलतामय शोधाचें अंतिम उद्दिष्ट तो स्वतःच होता. **सीमित व्यक्तित्व लयास नेऊन, सर्वान्तर्गत ईश्वराशीं ऐक्य-प्रत्यय देणारी स्व-स्वरूपाची अनुभूति मिळविण्याकरिताच सर्व साधना होती,** हें साधकाला कळून चुकतें.

स्व-स्वरूपानुभूति हेच साधनेचे साध्य आहे.

---

## ९ : : : मोक्षपथांतील टप्पे

सर्वांनाच बंधनाच्या स्थितीमधून जावें लागतें; पण ही बंधनाची स्थिति जीवनाच्या विकासांतील अर्थशून्य आख्यान नाही. स्वातंत्र्याचा खरा आस्वाद अनुभविण्याकरिता प्रथम कारागृहवासाचा अनुभव पाहिजेच. आपल्या सर्व जीवन-विस्ताराच्या संपूर्ण अवधीमध्ये मासा पाण्याच्या बाहेर एकदाहि आला नाही, तर पाण्याचें स्वारस्य पारखूं शकणार नाही. तो आजन्म पाण्यांतच राहिला असल्याने, त्याला स्वतःच्या जीवनाकरिता असलेलें पाण्याचें महत्त्व कळत नाही. परंतु त्याला एक क्षणभर का होईना, पण पाण्याबाहेर काढलें, तर तो पाण्याकरिता तडफडतो व त्या अनुभवामुळे पाण्याच्या गुणग्राहकतेस समर्थ होतो. त्याचप्रमाणे, जीवन सुरवातीपासून शेवटपर्यंत बंधनरहितच असतें व त्याला बद्धतेचा मुळीच अनुभव नसता, तर त्यांत मुक्त स्थितीचा आनंदहि दुरावला असता. आध्यात्मिक बंधन व त्याच्या बाहेर पडण्याची उत्कट तळमळ हे दोन्हीहि आगामी मुक्तावस्थेच्या आनंदास्वादाची पूर्वतयारी आहेत.

बंधनामुळे मुक्तीचे महत्त्व वाढतें.

पाण्याबाहेर काढलेला मासा परत पाण्याची इच्छा करतो, त्याच-

प्रमाणे साधकहि ध्येयदर्शनानंतर ईश्वराशीं ऐक्य पावण्याची लालसा ठेवतो. वास्तविक पाहतां, आपल्या उगमस्थानी परत पोहचण्याची प्रत्येक व्यक्तीला, तो त्या अज्ञानरूपी पडद्यामुळे वियुक्त झाल्यापासून तीव्र लालसा असतेच; पण साधक मोक्षपथांत प्रविष्ट होईपर्यंत, ती लालसा **नकळत** ( unconscious ) राहते. बोगद्यांतून काही कालपर्यंत आगगाडी गेल्यावर, त्यांतील अंधार ज्याप्रमाणे अंगवळणी पडतो, त्याचप्रमाणे मनुष्याला एका अर्थाने अज्ञानाचीहि सवय होते; परंतु **आपण कशास तरी मुकलों आहों**, याबद्दल निश्चित अस्वास्थ्य व अस्पष्ट हुरहुरहि त्याच्या मनांत असतेच. आणि ज्यापासून आपण वंचित आहों, तें '**कांही तरी**' अत्यंत सारभूत आहे, ही जाणीवहि त्याला असते. घोर अज्ञानाच्या अवस्थेंत असावधपणामुळे तें 'कांही तरी' भौतिक जगांतील नानारंगांच्या वस्तुच आहेसें भासतें. पण ह्या जगांतील अनुभवाचा जरूर तितका परिपाक झाला, म्हणजे या वस्तूंबद्दलचा भ्रम पुनःपुनः नाहीसा होऊन, साधक तें हरवलेलें श्रेयरूप 'कांही तरी' शोधण्याच्या खऱ्या मार्गावर येतो. त्या वेळेपासून, **साधक परिवर्तनशील नामरूपांहून अधिक गंभीरतर सत्याचा शोध करतो**; व ह्यालाच पथप्रवेश ( initiation to the path ) किंवा दीक्षा म्हणतां येईल. पथप्रवेशानंतर, साधकाची स्वतःच्या उगमाशीं पुनः युक्त होण्याची लालसा तीव्र व स्पष्ट होते. बोगद्यांतील पुढच्या टोकांतून आगगाडीमधील प्रवाशाला प्रकाशकिरण दिसला, तर पूर्ण प्रकाशाची त्याची तृष्णा अधिक तीव्र होते. त्याचप्रमाणे ध्येयाचें संदिग्ध दर्शन झाल्यावर, साधक तें ध्येय शक्य तितक्या शीघ्र गतीने गाठण्याची आकांक्षा बाळगतो.

पथाचा प्रारंभ गंभीरतर सत्याच्या लालसेमध्ये होतो.

मोक्षपथावर सहा स्टेशनें असून, सातवें स्टेशन हें त्या पथांतील शेवटचें उद्दिष्ट गन्तव्य स्थान किंवा ध्येय आहे. मधलें प्रत्येक स्टेशन आपल्या परीने त्या ध्येयाची अगाऊची कल्पनारचित पूर्वसूचना (imaginative anticipation) असते.

अज्ञानरूपी पडद्याचे अनेक पदर.

मिथ्या कल्पनारूपी पडद्यानेच मानव व ईश्वर यांमध्ये अंतर पाडलें असून, या पडद्याला अनेक पदर आहेत. पथप्रवेशापूर्वी, मानव या बहुरंगी कल्पनेच्या अनेक घड्यांच्या पडद्याने आवृत असतो; व त्यामुळे तो स्वतःस सीमित व पृथक् व्यक्तीव्यतिरिक्त दुसरें कांहीहि मानूं शकत नाही. ह्या बहुरंगी व मिथ्या कल्पनेच्या विलासामधूनच मनुष्याची अहंचेतना (ego-consciousness) उत्पन्न होते; व ईश्वराशीं ऐक्य पावण्याची जाणीवपूर्वक लालसा हा ह्या मिथ्याकल्पनारचित अहंचेतनारूपी इमारतीला पहिला धक्का आहे. **पथाक्रमण म्हणजे मिथ्या कल्पनाविलासाच्या परिणामांना निस्तारून, अदम्य पृथग्भाव व अनिवार्य वियुक्त जीवन निर्माण करणाऱ्या अज्ञानरूपी पडद्याचे अनेक पदर एकामागून एक फेकून देणें.** आतापर्यंत मनुष्य आपल्या निराळ्या अस्तित्वाला दृढपणें चिकटून राहिला होता; व त्याची ती पृथक् सत्ता घोर अज्ञानाच्या भव्य भिंतीमागे संरक्षित होती. परंतु, **यानंतर, तो जणू काय विशालतर सत्याशीं वार्तालाप सुरू करतो.** ज्या मानाने तो सत्याशी अधिक संबद्ध होतो, त्या मानाने त्याचा अज्ञानरूपी पडदा अधिक विरळ होतो; व त्याचा पृथग्भाव व अहंकार ज्या प्रमाणांत क्रमशः जीर्ण होतो, त्या प्रमाणांत तो विशालतर सत्यांत अधिक लय पावल्याचें अनुभवतो.

कल्पनेच्या भराऱ्यांमुळे, तुटक वेगळेपणाच्या भासाची रचना होते;

व हा स्वयंनिर्मित भिन्नभाव तोडून, सत्याशीं पुनः एकत्व पावण्याकरिता, मिथ्या कल्पनेची प्रक्रिया उफराटावी लागते. कल्पना टाकून देण्याचा हा उपक्रम गाढ निद्रेंतून जागृत होण्याच्या प्रक्रियेप्रमाणे आहे; व मिथ्याकल्पेनेच्या निरासांतील निरनिराळ्या अवस्था गाढ झोप व पूर्ण जागृति, या दोहोंमध्ये पुलांचें कार्य करणाऱ्या अनेक स्वप्नांप्रमाणे आहेत. मिथ्या कल्पनेची नानाविध रचना मोडून टाकण्याची प्रक्रिया क्रमिक असून, तिच्या सात अवस्था आहेत. कल्पनारूपी पडद्याचा एक पदर टाकून देतांना, साधक सत्याच्या व प्रकाशाच्या अधिक जवळ निश्चितपणाने जातोच; परंतु ह्यात केवळ एका अधिक मिथ्या कल्पनेचा त्याग करून, कमी मिथ्या कल्पनेचा स्वीकार केला जात असला, तरी त्याने साधकाचें सद्वस्तूशीं पूर्णैक्य होत नाही. अहंचेतनेच्या तुटक पृथग्भावाच्या अंशभेदास अनुसरून, कल्पनेच्या मिथ्यत्वाचेहि अंशभेद आहेत. मिथ्या कल्पनेच्या निरासामधील प्रत्येक टप्प्यामध्ये, अहंभाव निश्चितपणाने जीर्ण होतो. परंतु ध्येयप्राप्तीच्या पूर्वीचा मार्गांतील प्रत्येक टप्पा गाठणें, म्हणजे कल्पनेचें एक उड्डाण विसर्जन करून, दुसऱ्या उड्डाणाचा अंगीकार करणें होय.

मिथ्या कल्पनेची क्रिया उफराटी करणे.

कल्पनेच्या ह्या अनेक भराऱ्यांमुळे, आत्म्याच्या वास्तविक सत्तेमध्ये खरा बदल होत नाही. जो बदल होतो, तो आत्म्यांत नसून, आत्म्यासंबंधीच्या कल्पनेंत होतो. कल्पना करा की दिवास्वप्नांत किंवा कल्पनारचित मनोराज्यांत, तुम्ही स्वतःस चीनमध्ये असल्याचें मानतां, पण तुमचें शरीर वास्तविकपणें हिंदुस्थानांत आहे. ही कल्पनाशृंखला जेव्हा संपुष्टांत येते, तेव्हा तुमचें शरीर वास्तविकपणें चीनमध्ये

पथांतील टप्पे कल्पनास्वरूप आहेत.

नसून, हिंदुस्थानांतच आहे, हें तुमच्या ध्यानांत येतें. मानसिक (subjective) दृष्टीने, हें चीनमधून हिंदुस्थानांत परत येण्यासारखें आहे. त्याचप्रमाणे, पथांतील सर्व टप्पे सारखेच कल्पनारचित असले, तरी देहभाव क्रमशः सोडून, सर्वगत परमात्म्याशीं वर्धनशील तादात्म्य पावण्याचा मार्ग वास्तविकपणें चालून जाण्याशीं त्याचे साम्य आहे.

उन्नतीचे सहाहि टप्पे द्वैताच्या साम्राज्यांतच आहेत; पण **प्रत्येक टप्प्यावर भिन्नत्वाची पृथक्‌भावरचना तोडून, विशालतर सद्वस्तूमध्ये विलीन होण्याची जाणीव इतकी प्रबल व सुस्पष्ट असते, की साधकास कित्येक वेळा स्वतःस अंतिम सत्यानुभूतीच झाली असल्याचा मिथ्याभास (psuedo-sense) होतो.**

सत्यानुभूतीचा मिथ्याभास.

ज्याप्रमाणे पर्वतारोहण करणारा मनुष्य एखाद्या गहन दरीपर्यंत आल्यास, तिच्या हृदयंगम दृश्यांत रममाण झाल्यामुळे, त्याला अंतिम ध्येयाची विस्मृति होते व त्याला उद्दिष्ट स्थानच गाठल्याचा थोडा वेळ भास होतो, त्याचप्रमाणे साधकहि पथांतील मध्यंतरांतील टप्प्यांना अंतिम गन्तव्य स्थानच समजण्याची चूक करतो. परंतु ज्याचा पर्वतारोहणावर कटाक्ष आहे, त्याला थोड्याच वेळांत दरीपलीकडे जाण्याची आवश्यकता प्रतीत होते, त्याचप्रमाणे साधकासहि लवकरच किंवा कालान्तराने, हा मधील टप्पा मागे टाकून, स्वतःस पुढे जावें लागणार, हें उमगून येतें. **मधील टप्प्यांत उत्पन्न होणारा सत्यानुभूतीचा मिथ्याभास म्हणजे वास्तविकपणें जागे न होतां, जागृत झाले असल्याबद्दलच्या केवळ स्वप्नाप्रमाणे आहे.** वास्तविकपणें जागे झाल्यावर, आपला पूर्वीचा जागे झाल्याचा भास स्वप्नरूप होता, हें त्याला दिसून येतें.

उन्नतीचा प्रत्येक टप्पा म्हणजे जाणिवेची एक विशिष्ट अवस्था असते; व जाणीव एका अवस्थेंतून दुसऱ्या अवस्थेंत प्रवेश करीत असतांना, साधकाची अंतस्थ भूमिका (plane) हि बदलते. ह्याप्रमाणे, सातव्या भूमींत आरूढ होण्यापूर्वी, साधकाला सहा भूमिका व अवस्था ह्यांचा अनुभव घ्यावा लागतो. सातवी भूमिका ही पथाची अखेर असून, तेथेच साधकाला अंतिम ईश्वरानुभूति होते. तरीही, प्रत्येक स्टेशनवर आगगाडी कांही वेळ थांबतेच. अंतस्थ भूमिका ही स्टेशनप्रमाणे आहे; परंतु जाणिवेची अवस्था, ही प्रवाशाने त्या स्टेशनवर खाली उतरून इतस्ततः फिरण्याप्रमाणे आहे.

भूमिका व अवस्था.

नवीन भूमिकेंत प्रवेश केल्यावर, त्या भूमिकेमध्ये अनिर्बंध कार्यक्षमता येण्याकरिता, जाणिवेला थोडा वेळ लागतो. मानसिक जीवनाची सगळीच परिस्थिति बदलल्यामुळे, त्या साधकाचे मनोव्यापार एकप्रकारें स्थगित होतात; व ह्याच स्थितीला समाधि म्हणतात. अध्यात्मपथावरील यात्री जेव्हा नवीन भूमिकेमध्ये प्रवेश करतो, तेव्हा तो त्या भूमिकेमध्ये कांही कालपर्यंत मग्न राहतो. असा कांही काल निमग्नतेंत गेल्यानंतरच त्याला त्या भूमिकेची विशिष्ट अवस्था प्राप्त होते. प्रवासाने थकलेला पथिक जसा केव्हा केव्हा निद्रावश होतो, त्याचप्रमाणे, वरील भूमिकेंत आरोहण करण्याचे परिश्रम केलेल्या जाणिवेचे मनोव्यापारहि अगदीच मंदावतात. मनोव्यापारांच्या ह्या अत्यंत मंद स्थितीचें निद्रेशीं साम्य असतें; परंतु, त्याबरोबरच समाधि निद्रेहून मूलतः भिन्न असते, कारण, निद्रेंत मनुष्य पूर्णपणें अचेतन ( unconscious ) असतो; पण समाधीमध्ये तो देहाबद्दल किंवा भोंवतालच्या परिस्थितीबद्दल

‘ हस्तिग्राक ’ किंवा समाधींचें स्वरूप.

अचेतन असला, तरी त्याला आनंद, प्रकाश व शक्ति यांची जाणीव असतेच. नवीन भूमिकेंत कांही काल सापेक्षतः स्थगित झालेलें मन, त्या भूमिकेंत क्रियाप्रवण होऊन, त्या भूमिकेस विशिष्ट असणारी अवस्था अनुभविते; व ही नवीन अवस्था मागे टाकलेल्या अवस्थेहून अगदी निराळी असते.

पथांतील प्रत्येक टप्पा म्हणजे आहंकारिक जीवनाचा ऱ्हास असतो.

नवीन भूमिकेंत प्रविष्ट झाल्यावर, साधक त्या भूमिकेंत निमग्न होतो; व तेव्हा, मनोव्यापार मंदावत असतांना, साधकाच्या आहंकारिक जीवनाचा बराच ऱ्हास होतो. आहंकारिक जीवनाचा हा ऱ्हास सातव्या भूमिकेंत होणाऱ्या अहंभावाच्या पूर्ण मूलोच्छेदाहून निराळा असतो. पण सातव्या भूमिकेंतील अंतिम अहंनिरासाप्रमाणेच, मधील सहा भूमिकांमध्ये होणारा अहंभावाचा ऱ्हासहि जरूर उल्लेखनीय आहे. कारण त्यांनाहि सापेक्ष महत्त्व आहेच. सूफी अध्यात्मपरंपरेमध्ये अहंभावाच्या अंतिम मूलोच्छेदाला ' फना–फिल्लाह ' म्हणतात; व अलीकडच्या द्वैतपूर्ण सहा भूमिकांमधील समाधींमध्ये, अहंकाराचा आंशिक लोप होत असल्यामुळे, त्यांनाहि ' फना ' किंवा अहंलोपाचेच प्रकार मानतात.

पहिले तीन ' फना '.

या सर्व चढत्या ' फनां ' मधून प्रगतिपूर्ण सातत्य असून, चढावाच्या शेवटीं अंतिम ' फनाफिल्लाह ' आहे. प्रत्येक ' फना ' चें नैज वैशिष्ट्य असतें. पहिल्या भूमिकेंत आरूढ झाल्यावर, यात्रीला पहिल्या 'फना–ए–नासूती', म्हणजे 'जडत्व-निरासा 'च्या मग्नतेचा अनुभव येऊन, त्याच्या अहंनिष्ठ जीवनाचा थोडासा ऱ्हास होतो. सीमित व्यक्तित्वाची थोडा

वेळ विस्मृति होऊन, यात्री हर्षमग्न होतो. पहिल्या भूमिकेंत मग्नता पावणाऱ्या कित्येक यात्रींना ईश्वरानुभूति झाल्याचा भास होऊन, ते तेथेच रुतून जातात. परंतु, जर यात्रीने स्वतःची या आत्मसंभ्रमा-( self-delusion ) पासून मुक्तता करून घेतली, तर त्याला प्राप्त झालेली स्थिति ही यात्रेतील अवस्थांतर मात्र आहे, हें त्याला कळून चुकतें; व तो पुढील पथ चालावयास लागून, दुसऱ्या भूमिकेप्रत पोहोचतो. दुसऱ्या भूमिकेंतील मग्नतेला '**फना-ए-बातिली**' किंवा '**मिथ्यात्वनिरास**' म्हणतात. यात्री आता आनंदांत व अनन्त प्रकाशांत निमग्न होतो. काहींना ध्येयप्राप्तीच झाल्याचा भास होऊन, ते तेथेच रुतून बसतात. पण जेव्हा ते या मिथ्याभासापासून स्वतःस मुक्त करतात, तेव्हा ते पुढे चालू लागून, तिसऱ्या भूमिकेंत प्रविष्ट होतात. तिसऱ्या भूमिकेंतील मग्नतेला '**फना-ए-जाहेरी**' म्हणजे '**दिखाऊ वस्तुत्वाचा अंत**' म्हणतात. यात्री देह व जगत् यांच्या-विषयी पूर्णपणे अचेतन होतो व अनंत शक्ति अनुभवतो. परंतु, जगाचें भान नसल्यामुळे, त्याला आपली शक्ति व्यक्त करण्याकरता संधीच मिळत नाही. ह्या स्थितीला दैवी मूर्च्छा किंवा झांपड (coma)—अथवा विदेह समाधि म्हणतात. ह्या स्थितींत जाणीव स्थूल जगापासून पूर्णपणे परावृत्त झालेली असते.

यात्री जर याही पलीकडे गेला, तर तो चवथ्या भूमिकेप्रत पोहोचतो. चवथ्या भूमिकेंतील मग्नतेला '**फना-ए-मलकूति**' अथवा '**मुक्तिद्वार**' म्हणतात. ह्या भूमींतील विशिष्ट जाणिवेमध्ये

चवथ्या भूमिकेंतील धोका.

साधक अनंत शक्ति अनुभवतो. इतकेंच नव्हे, तर त्या शक्तीचा उपयोग करण्याचे प्रसंगहि त्याच्यावर पुष्कळ येतात. तो सर्व कांही जाणू शकतो,

उदाहरणार्थ, जगांतील कोणत्याहि भागांतील कोणताहि मनुष्य काय विचार करतो, किंवा कोणत्या कार्यांत गुंतला आहे, हें तो जाणू शकतो. शिवाय स्वतःच्या शक्तीचा उपयोग करण्याची संधि त्याला मिळते, इतकेंच नव्हे, तर ती शक्ति वापरण्याची निश्चित इच्छाहि त्याला होते. ह्या मोहास तो बळी पडला, तर तो आपली शक्ति व्यक्त करीत जातो व चवथ्या भूमिकेंत शक्य असलेल्या चित्ताकर्षक बाबतींत फसून जातो. ह्या कारणामुळे, चवथी भूमि अत्यंत धोक्याची व दुस्तर आहे. येथे, यात्रीचा अधःपात होण्याची शक्यता असते; व तो चवथी भूमि तरून, पांचवी भूमि गाठेपर्यंत, आध्यात्मिक दृष्टीने मुळीच सुरक्षित नसतो.

पांचव्या व सहाव्या भूमिकेंतील फना.

पांचव्या भूमींतील मग्नतेला 'फना-ए-जब्रूति' म्हणजे 'इच्छा-नाश' म्हणतात. येथे निम्नतर बुद्धीची अविरत क्रिया शांत होते. तो (साधारण अर्थाने) विचार करीत नाही; परंतु, तो अप्रत्यक्षपणे दुसऱ्यांच्या मनाला अनेक विचारांची स्फूर्ति देतो. तो पाहतो, पण चर्मचक्षूने नव्हे. मन मनाशीं बोलतें; व संशय किंवा चिंता यांना स्थान राहात नाही. तो आध्यात्मिक दृष्टीने सुरक्षित असून, यापुढे त्याचें अधःपतन होणें शक्य नसतें. तरीहि या उंच भूमीवरील कित्येक यात्रींना स्वतःस ईश्वरत्व प्राप्त झालें, अशा आत्मसंभ्रमाचें निवारण करतां येत नाही. 'मी ईश्वर आहें,' असें तो या मिथ्या-भासामुळे समजतो व म्हणतो. आपण आता आध्यात्मिक पथाच्या शेवटीं आलो, असें तो मानतो. पण तो आणखी पुढे अग्रसर झाला, तर त्याला स्वतःची चूक कळून, तो सहावी भूमिका गांठतो. सहाव्या भूमिकेंतील मग्नतेला 'फना-ए-महबूबी', म्हणजे, 'प्रियतमांत

जीवत्वनाश' म्हणतात. साधारण मनुष्य जगांतील निरनिराळ्या वस्तू जशा प्रत्यक्षपणे व स्पष्ट पाहतो, त्याचप्रमाणे यात्रीला आता परमात्मा प्रत्यक्षपणे व स्पष्ट दिसतो; व ह्या ईश्वरदर्शनाचा आनंद निरंतर टिकून, त्यांत एका क्षणाचाहि खंड पडत नाही. तरीहि तो यात्री परमेश्वराशीं ऐक्य पावू शकत नाही.

फना–फिल्लाह किंवा निर्विकल्प समाधि म्हणजेच सचेतन ईश्वरत्व आहे.

यात्री सातव्या भूमीवर आरूढ झाला, म्हणजे तो **'फना-फिल्लाह'** नांवाची अखेरची मग्नता अनुभवितो; व त्याच्या **ईश्वरानुभूतीमध्ये जीवत्वाचा मूलोच्छेद होतो.** या मग्नतेत यात्रीचें निराळें अस्तित्व लयास जाऊन, तो ईश्वराशीं नेहमीकरता एकत्व पावतो. ईश्वराशीं पूर्णैक्य झाल्यामुळे, तो स्वतः ईश्वरा-व्यतिरिक्त दुसरें कांही अनुभवित नाही. सातव्या भूमिकेंतील ही **'फना–फिल्लाह'**, म्हणजे आध्यात्मिक पथाचा शेवट असून, सर्व शोधांचें व प्रयत्नांचें ध्येय आहे. ती **जागृत ईश्वरत्वाची सहजसमाधि किंवा निर्विकल्प समाधि आहे.** हीच खरी जागृत स्थिति आहे. यात्रीने आता विशाल कल्पनासागराच्या पलीकडचा किनारा गांठलेला असतो. **हें अखेरचें सत्य हेंच एकमेव सत्य असल्याचें तो जाणतो;** व पथांतील इतर सर्व टप्पे भ्रमात्मक होते, हेंहि त्याला कळून चुकतें. तो आपल्या अंतिम गन्तव्य स्थानाप्रत **पोहोंचलेला** असतो.

---

## १० : : : सद्‌गुरूंची न्यारी रीत

सद्‌गुरूंची चेतना व्यक्तिनिरपेक्ष (impersonal) व विश्वगामी (universal) असते. परंतु, त्यांच्या आध्यात्मिक कार्याकरिता, ते आपलें कार्यक्षेत्र मर्यादित करूं शकतात; व ते आपल्या अभिव्यक्त व्यक्तिमत्तेला आपल्या शिष्यांच्या आकांक्षांचें केंद्रस्थान बनूं देतात. जे शिष्य त्यांच्या सहवासांत राहतात, त्यांना मदत पोहोचविण्याकरिता, सर्व व्यक्तिगत संबंधांचा, ते रेखीव कालव्यांसारखा, साधन म्हणून उपयोग करतात.

**सद्‌गुरू सहाय्य करण्यास सदैव तयार असतात.**

ज्यांना त्यांच्या सहाय्याची आवश्यकता व पात्रता असते, अशा साधकांच्या शोधांत ते नेहमीच असतात. कोणामध्ये आध्यात्मिक तळमळीचा लेशहि असला, तरी त्याच्याकडे ते दुर्लक्ष्य करीत नाहीत. साधकाच्या प्रगतीस ते हरतऱ्हेने प्रेरणा व प्रोत्साहन देतात; व त्यांची रीत सर्वांना बरोबर कळली नाही, तरी ती खात्रीने परिणामकारक होते.

सद्‌गुरु साधकाच्या आध्यात्मिक यात्रेला निश्चित व सुरक्षित करून, ध्येय प्राप्तीस एरव्ही लागणारा कालावधि कमी करतो.

स्वतंत्र रीतीने शोध करणारा साधक मोक्षमार्गांत बराच दूरवर जाऊं शकतो; परंतु तो सद्गुरूच्या मदतीशिवाय सहावी भूमिका उल्लंघूं शकत नाही. मधल्या भूमिकांतून वर चढत असतांनाहि, सद्गुरूचें सहाय्य अतिशय महत्त्वाचेंच ठरतें. तो साधकाला आध्यात्मिक प्रवासपथांत मध्येच अटकूं देत नाही, किंवा त्यामधील भयानक खळग्यांमध्ये पडूं देत नाही. कबीराने मार्गाच्या तीन टप्प्यांची अग्नीच्या तीन स्थितींशीं तुलना केली आहे. प्रथम धूर असतो, पण अग्नि नसतो; मग धुराने वेष्टिलेला अग्नि असतो; व शेवटीं धुराशिवाय अग्नि असतो. त्याचप्रमाणे, मोक्ष-मार्गांतील प्रारंभीचा भाग केवळ घोर अज्ञानांधःकारानेच आवृत असतो; मध्यभागांत ध्येयाचें अतिशय अस्पष्ट दर्शन होतें; व अखेरीस निभ्रान्त सत्यानुभूति होते. मार्ग नानाप्रकारच्या भ्रमांमधून असल्याने, सद्गुरूचें दिग्दर्शन नसल्यास, साधकास धोका असतो; पण सद्गुरूला मार्गांतील सर्व टप्प्यांचें ज्ञान असल्यामुळे, तो साध-काला त्या सर्वांमधून घेऊन जाऊं शकतो.

त्यांच्या सहाय्याचें स्वरूप.

अंतश्चक्षु उघडण्यापूर्वी, मन अनंततेच्या ध्येयाची कल्पना बनवितें; व ही कल्पना आकाश किंवा सागर याप्रमाणे विशालता सूचित करणाऱ्या एखाद्या लाक्षणिक प्रतीकावर आधारलेली असते. अशा प्रकारची कल्पना निश्चित व सुस्पष्ट असली, तरी तिच्या ऐवजी अनंततेचें प्रत्यक्ष ज्ञान आलें पाहिजे. आत्म्याचा अंतश्चक्षु उघडल्यावरच साधकाला प्रत्यक्ष आत्म-दर्शन होतें. परंतु त्यावेळीं, मन चकित होऊन गोंधळून जातें; व त्यामुळे, त्याचें ज्ञान पूर्वीप्रमाणे स्पष्ट राहत नाही. आत्मदर्शनाने थक्क

भ्रमनिकेतन.

झाल्यामुळे, मनाची स्पष्ट विचार करण्याची शक्ति जाऊन, आत्मदर्शन म्हणजेच आत्मप्राप्ति किंवा आत्मानुभूति ( realisation ) आहे, असा त्याचा गैरसमज होतो; व म्हणून, साधक वास्तविक पाहतां मार्गाचें आक्रमण करीत असला, तरी आपण मार्गाची अखेर गाठली, असेंच त्याला भ्रमाने भासतें. मार्गाच्या ह्या विशिष्ट भागाला सूफी पंथांत 'मुकामे आफसन' किंवा भ्रमनिकेतन म्हणतात. अशा प्रकारच्या मार्गांतील कठीण भागामध्ये, सद्‌गुरु साधकाला कुशलतेने धक्का देऊन पुढे ढकलतात. म्हणजे तो साधक रस्त्यांतच अटकून न बसतां, पुढे चालूं लागतो.

सद्‌गुरूचें कर्तृत्व.

खरें पाहतां, अंतस्थ भूमिकांतील प्रत्येक भूमिकेवर, साधक अटकून राहण्याची भीति असतेच, कारण प्रत्येक भूमिकेमध्ये, एक विशिष्ट प्रकारचें आकर्षकत्व असून, ती साधकास सापळ्याप्रमाणे अडकवून ठेवते. परंतु, सद्‌गुरु त्याला ह्या भूमिकांच्या बाजूने, किंवा भूमिकांमधून, अनावश्यक विलंब न लावतां घेऊन जातो. साधकाला आपला मार्ग स्वतःच आक्रमण करावा लागतो; पण साधकाच्या पूर्वप्राप्त ज्ञानास व अंतःप्रज्ञे ( intuitions ) स पक्कें व स्थिर करून, पुढील अनपेक्षित पण अनिवार्य अग्रगमनाकरिता, त्याच्या जाणिवेस त्वरित उद्युक्त करण्यांतच सद्‌गुरूचें खरें कर्तृत्व आहे.

शिष्याची संशयरहित श्रद्धा.

शिष्याला मायेंतून काढण्याकरिता, सद्‌गुरु मायेचाच उपयोग करतो; व तो स्वतः चांगल्यावाईटाच्या पलीकडे असल्यामुळे, शिष्याला अप्रशस्त, अग्राह्य व विस्मयजनक वाटणाऱ्या आज्ञाहि देतो. अशा वेळीं, शिष्याने त्या आज्ञा स्वतःच्या परिमित बुद्धीच्या न्यायासनासमोर न मांडतां, संशयरहित श्रद्धा ठेऊन पाळाव्यात, हाच

सर्वोत्कृष्ट मार्ग आहे. खालील उदाहरणावरून चर्चेचा हा विषय अधिक स्पष्ट होईल.

आज्ञेस मान देऊन, इस्मायल नांवाच्या आपल्या प्रियतम मुलाचें ईश्वराप्रीत्यर्थ बलिदान करण्यास उद्युक्त झालेल्या अब्राहमची कथा कुराणांत आली आहे. श्रद्धायुक्त निश्चयाने अब्राहम आपल्या मुलास ठार मारण्यास तयार झाला; व त्याकरिता, त्याने आपला चाकू त्या मुलाच्या गळ्याशीं धरला. इतक्यांत, त्या मुलाच्या जागीं एक बकरीच येऊन, तो मुलगा वांचविला जाण्याचा चमत्कार घडला.

अब्राहम.

मौलाना रूमी नांवाच्या आपल्या शिष्याला शम्सतब्रेज नांवाच्या सद्गुरूने दारूच्या सार्वजनिक अड्ड्यांतून दारू आणण्याचा हुकूम दिला; व सद्गुरूची कृपा संपादन करण्याकरिता त्याने तो हुकूम न कचरतां पाळला. त्या वेळीं, इस्लामी जगांतील एक अत्यंत मोठा व धर्मनिष्ठ पुरुष म्हणून मौलानाची ख्याती असून, त्याला पुष्कळ धार्मिक मुसलमान अनुयायी होते; व मुसलमान लोकांत दारू हराम ( निषिद्ध ) समजली जाते. तेव्हा, भर रस्त्यांत दारूचा घडा आपल्या खांद्यावरून नेणें, म्हणजे मौलानाकरिता एक अग्निदिव्यच होतें. पण त्यांतूनहि तो पार पडला.

मौलाना रूमी.

गौसाली शाहच्या सद्गुरूंपैकी एकजण गंगाकिनारी राहत असे; व त्याने त्याला पिण्याचें पाणी नदींप्रवाहाच्या मध्यधारेंतूनच आणण्याची आज्ञा दिली. ती वेळ मध्यरात्रीची असून, गंगानदीस पावसाळ्यामुळे महापूर आला होता. शिष्याने प्रथम थोडी कांकूं केली; पण अखेरीस, सद्गुरूच्या सर्वज्ञतेवर विश्वास

गौसाली शाह.

टाकून, अशक्यप्राय वाटणारी गोष्ट करण्यास उद्युक्त होण्याचें त्याने धार्ष्ट्य केलें. परंतु, गंगा नदींतील प्रक्षुब्ध जलराशींत त्याने पदार्पण केल्यावर, सर्वच परिस्थिति आश्चर्यकारक रीतीने एकदम बदलून गेली. महापुराच्या उसळणाऱ्या व उत्तुंग लाटांच्या ऐवजी गंगानदी एक अत्यंत बारीक जलधारा बनली; व त्याचा पाण्याचा घडा नदीच्या तळाला जवळजवळ स्पर्श करूं लागला. गौसाली शहा मध्यधारेचा शोध करीत, जवळजवळ दुसऱ्या किनाऱ्यास पोहोंचला होता! ह्याप्रमाणे कार्यमग्न असतांना, त्याचा गुरु तेथे आला व उशीर लागण्याचें कारण विचारूं लागला. 'मध्यधारा सापडत नाहीं', असें त्याने सांगितल्यावर, गुरूने त्याला त्याच बारीक जलधारेंत घडा भरण्याची परवानगी दिली; व थोडा वेळ तो स्वत: त्याला पाण्याने घडा भरूं लागला. मग कांही तरी कारण सांगून, व घडा पाण्याने भरल्याबरोबर ताबडतोब मागोमाग येण्याची आज्ञा करून, गुरु निघून गेला. नंतर, जेव्हा गौसाली शहा पाण्याने भरलेला घडा घेऊन झोपडींत परत आला, तेव्हा त्याला गुरुसन्निध असलेल्या शिष्यांकडून कळलें की, तो गेल्यापासूनच्या सर्व अवधींत, गुरु त्यांच्याशीं त्याच्याबद्दल सारखें बोलत होता, व त्याने झोपडी एक मिनिटभरहि सोडली नव्हती! हें ऐकल्यावर त्याच्या आश्चर्यास सीमाच राहिली नाही.

वरील उदाहरणावरून दिसून येईल की, कांही थोड्या प्रसंगीं, शिष्यांचें गर्वहरण करण्याकरिता, व त्यांना मार्गावर मदत करण्याकरिता, सद्गुरु आपल्या गूढ शक्तींचा (occult powers) उपयोग करूं शकतो. परंतु, साधारणत: सद्गुरु आपल्या ईश्वरी शक्तींचा उपयोग फारच क्वचित् करतात; व आध्यात्मिक उद्दिष्टास अगदींच आवश्यक असेल, तरच

सद्गुरु गूढ रीतींपेक्षा साधारण पद्धतच पसंत करतात.

ते त्यांचा असा उपयोग करतात. साधारणपणें, जगांतील इतर लोकांच्या नेहमीच्या रीतींनीच ते आपले हेतु सिद्ध करतात. परंतु, असें करतांना, त्यांचें महान् ज्ञान, सूक्ष्म विनोदवृत्ति, असीम तितिक्षा व पूर्ण व्यवहारकुशलता व्यक्त होतेंच. तसेंच, शिष्यांना मदत करण्याकरिता, ते अतिशय परिश्रम घेऊन, त्या परिस्थितींत जरूर असलेल्या नानाविध गोष्टी स्वीकारण्यांत लवचीकपणा दाखवितात.

बहलूलची गोष्ट.

या संबंधी कांही मुद्दे बहलूल नांवाच्या एका महान् गूढवाद्याच्या गोष्टीवरून स्पष्ट होतात. कांही आंतरिक कारणाकरिता, बहलूलला इराणच्या कांही सरदार लोकांशीं संबंध पाहिजे होता. ह्याकरिता एकच मार्ग खुला होता; व तो म्हणजे ज्या राजपुत्राच्या मेजवानीला हे सर्व सरदार जात असत, त्याच्याकडे जाणें. पण दुर्दैवाने बहलूलच्या डोक्याला टक्कल होतें. आणि त्या दिवसांत, राजपुत्राने दिलेल्या मेजवानीला, केस नसलेल्या, म्हणजे टक्कल असलेल्या कोणासहि जाऊं दिलें जात नसे. राजपुत्राचे सर्व केस गेलेले होते. दुसऱ्या कोणास बिनकेसाचे पाहून, त्यास स्वतःच्या टक्कलाची आठवण होई; आणि त्यामुळे, त्याला मेजवानीचा आनंद लुटतां येत नसे. राजपुत्राची ही फार नाजुक बाब असल्यामुळे, टक्कल पडलेल्या कोणत्याहि मनुष्यास मेजवानीस मज्जाव असे; आणि म्हणून, टक्कल असलेल्या आणि अव्यवस्थित व मळके कपडे घालून गेलेल्या बहलूलला तेथून हाकलून देण्यांत आलें. परंतु मेजवानी तीन दिवस चालली होती. दुसरे दिवशीं बहलूलने चांगले कपडे व केसांचा टोप उसना आणला; व तो पुन्हा मेजवानीसाठी गेला.

मेजवानीमध्ये कोणीही बहलूलला ओळखलें नाही; आणि

मेजवानीसाठी जमलेल्या पुष्कळशा थोर लोकांवर आपल्या उत्तम पोषाखाने त्याने वजन पाडलें. तो सर्वांना इतका प्रिय झाला की, प्रत्यक्ष राजपुत्रानेहि त्याचें अगत्यपूर्वक स्वागत करून, स्वतः त्यास जवळ बसावयास बोलाविलें. बहलूल तेथे जाऊन बसतांच, त्याने राजपुत्राकडे पाहून डोळे मिचकाविले. राजपुत्रास या डोळे मिचकाविण्याचा अर्थ समजला नाही. परंतु एखाद्या थोर माणसाच्या अशा कृतीचा अर्थ कांहीतरी महत्त्वाचाच असला पाहिजे, व त्याला तावडतोब प्रत्युत्तरहि दिलेंच पाहिजे, असें वाटून, त्यानेहि डोळे मिचकाविले. राजपुत्राच्या आसपास जी मंडळी बसली होती, त्यांनी हा प्रकार पाहिला; आणि त्यांनाहि त्यांचें अनुकरण करण्याचा मोह अनावर झाला. म्हणून, त्यांनीहि परस्परांकडे पाहून डोळे मिचकाविले. शेवटी सर्व समुदायांत हा प्रकार पसरून, पांच मिनिटेंपर्यंत डोळे मिचकाविण्याखेरीज कोणासहि कांही दिसलें नाही. तेव्हा बहलूल म्हणाला, सद्गृहस्थांनो, थांबा. तुम्ही डोळे कां मिचकावितां ? सरदारांनी उत्तर दिलें, 'आपण थोर लोकांनी डोळे मिचकाविले म्हणून आम्ही मिचकावीत आहोंत. आम्हीं केवळ आपलें अनुकरण करीत आहों." त्यावर बहलूलने आपला केसांचा टोप एकिकडे काढला. व तो म्हणाला, 'आम्हाला दोघांनाहि टक्कल आहे. आता आमचें अनुकरण करा.' ते सर्व सरदार लोक नंतर परत गेले; व तिसरे दिवशीं ते हजामती करून आपले सर्व केस काढून आले. तेव्हा, बहलूल राजपुत्राकडे वळून म्हणाला,—'आपलें टक्कल कायमचें आहे; परंतु यांना मात्र टक्कल ठेवण्याकरता, दररोज हजामत करावी लागेल.' अशा रीतीने, आपल्या विनोदवृत्तीने आणि युक्तीने, ज्यांना त्याला मदत करावयाची होती, त्यांच्याजवळ त्याने प्रवेश मिळवून घेतला.

शिष्याशीं संबंध आणून, त्याला अध्यात्मजीवनाकडे ओढून घेण्याकारिता, सद्‌गुरु अनंत परिश्रम करतो. शिष्याचें गुरुवरील प्रेम नष्ट झालें नाही, तरच त्याची प्रगती निश्चितपणें होते; व म्हणून, शिष्याच्या अंतःकरणपूर्वक भक्तीच्या आड येणारे सर्व अडथळे तो अत्यंत काळजीपूर्वक रीतीने नाहीसे करतो. एकाद्या वेळीं, सद्‌गुरु शिष्याच्या व्यक्तिगत स्वभावाची स्तुति करीत असला, तर त्याच्या मुळाशीं, शिष्याच्या व्यक्तिगत स्वभावाने गुरुशिष्य संबंधांत अडथळा आणूं नये, हाच उद्देश असतो. कधी कधी, सद्‌गुरु शिष्याच्या अहंभावास पुष्ट करीत असल्याप्रमाणें दिसेल. परंतु, बलिदान करण्यापूर्वी प्राण्यांना खूप खाऊं पिऊं घालतात, तशांतलाच हा प्रकार आहे. शिष्याच्या अहंभावाचा हा दिखाऊ परिपोष, म्हणजे त्याच्या अज्ञानास दिलेली तात्पुरती सवलत असून, तो अखेरीस अहंभाव पूर्णपणें नष्ट करण्याची पूर्वतयारीच असतो. सद्‌गुरु हा चांगल्या वाईटाच्या पलीकडे असतो; व तो शिष्याच्या दोषांमुळे क्षुब्ध होत नाही. असीम तितिक्षेने व अनंत कालपर्यंत वाट पाहण्याचें सामर्थ्य अंगीं ठेऊन, तो शिष्यांचे दोष सहिष्णुतापूर्वक चालूं देतो. एकदा शिष्याने पथप्रवेश केला, कीं त्या सर्व दोषांचा परिहार होण्यास कांहीच वेळ लागणार नाही, हें त्याला पक्कें ठाऊक असतें.

शिष्याच्या दोषांचा परिहार.

परंतु, जेव्हा शिष्य मार्गावर दृढतापूर्वक आल्याची सद्‌गुरूंची खात्री पटते, तेव्हा तो शिष्याच्या मनांतील दोषपरिहारास सुरवात करतो. ज्याप्रमाणें शल्यवैद्य एकदा आपल्यावर विश्वस्त केलेल्या रोग्यावर, आपलें शस्त्र चालवीत असतांना, रोग्याच्या विरोधाची मुळीच पर्वा करीत

चित्तशुद्धीची रीत.

नाही, त्याचप्रमाणें सद्गुरु शिष्याचे दोषपरिहार करीत असतांना, कठोर दिसण्याची पर्वा करीत नाही. परंतु, तो जें कांही करतो, तें शिष्याच्या हिताकरिताच करीत असतो; व ह्याची जाणीव अखेरीस शिष्यालाहि झाल्याशिवाय राहत नाही. म्हणून, शिष्यास दोषपरिहार क्वचित् दुःखद किंवा कंटाळवाणा वाटला, तरी त्यामुळे तो सद्गुरूपासून दूर न जातां, त्याच्या अधिक जवळच येतो.

प्रशंसेच्या द्वारां मदत.

परंतु, साधारणतः सद्गुरूची रीत प्रभावशाली असते, त्याचप्रमाणें ती प्रिय व मनोरमही असते. शिष्य जेव्हा अध्यात्मजीवनांत विशेष प्रगती दाखवितो, तेव्हा सद्गुरूला संतोष होतो. योग्य बाबतींत शिष्याची प्रशंसा करीत असतांना, सद्गुरु कांही दैवी गुणांना–(जे गुण शिष्य आत्मसात् करण्याचा प्रयत्न करीत असतो)–शिष्यामध्यें अधिक पक्के करतो; व त्याचप्रमाणें, तो त्यावेळीं शिष्यामध्यें कोणत्याहि परिस्थितीस तोंड देऊं शकणारा आत्मविश्वास जागृत करतो. उदात्त भावनेचा उद्रेक, आत्मदानाचा भाव, वीरोचित त्याग, किंवा असाधारण तितिक्षा, प्रेम किंवा श्रद्धा दर्शविणारी एखादी घटना–ह्यांपैकी कांहीहि सद्गुरूला संतोष देऊन, त्याची प्रशंसा मिळविण्यास कारणीभूत होते. शिष्याने संपादन केलेल्या दैवी संपत्तीची प्रगट व स्पष्ट प्रशंसा करूनच सद्गुरु साधारणतः त्याच्या सद्गुणांना प्रोत्साहन देतो. शिष्यहि सद्गुरूच्या पसंतीचें खरें महत्त्व जाणूं लागतो; व सद्गुरूची मान्यता मिळविण्यामध्ये त्याला इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षा अधिक आनंद वाटतो. केवळ सद्गुरूला आनंद होईल, ह्या जाणिवेनेच तो महान् मोहावर विजय मिळविण्यास, किंवा एरव्ही अशक्यप्राय वाटणाऱ्या अग्निदिव्यांतून पार पडण्यास सिद्ध होतो.

सद्‌गुरु हा साधकाकरिता सर्वांतर्यामी परमात्म्याचे प्रतीक असतो. म्हणून, गुरुप्रत स्वतःस यथोचित रीतीने व्यवस्थित करण्या (adjustment) च्या प्रश्नांत, स्वतःच्या अंतरात्म्याची अनुभूति (realisation) मिळविणें, व इतर अनेक रूपांतून अभिव्यक्त होत असणाऱ्या परमात्म्याप्रत स्वतःस व्यवस्थित करणें—ह्या दोन्ही प्रश्नांचा अंतर्भाव होतो. हे सर्व प्रश्न वास्तविक मूळांत एकच आहेत, याची जाणीव साधक आपल्या गुरुनिष्ठेच्या द्वारां व्यक्त करीत असतो. या सर्व प्रश्नांना अलग व स्वतंत्र न मानतां, ते सर्व एकाच प्रश्नाचीं निरनिराळीं अंगें असल्याचें तो जाणतो; व म्हणून, परस्परविरुद्ध हक्का-मध्यें एखादी तात्पुरती जुळवाजुळव करण्याहून भिन्न असलेला, असा खरा समन्वय (integration) साधण्याकरिता, तो मानसिक डावपेचां (psychological strategy) च्या दृष्टीने समर्थ होतो. हें अतिशय कठिण कार्य साधण्यांत, शिष्याला मदत व्हावी, म्हणून सद्‌गुरूला शिष्याच्या सर्व आध्यात्मिक ध्येय-वादाचें आश्रयकेंद्र बनावें लागतें; कारण, साधक व त्याचें ध्येय, यांमधील अनेक प्रतिबंध तोडण्यासाठी, साधकाच्या मानसिक शक्तीचें अवधानपूर्वक व पूर्ण केंद्रीकरण होण्याची आवश्यकता असते.

सर्व प्रश्नांची सोडवणूक.

आपल्या स्वतःच्या सद्‌गुरूहून अन्य सद्‌गुरूंकरिता शिष्याला स्वाभाविकपणेच आदर वाटतो. परंतु, त्यामुळे स्वतःच्या सद्‌गुरूचा सर्वश्रेष्ठ अधिकार कमी होत नाही, किंवा कच्चा होत नाही. सर्व सद्‌गुरु आपल्या जाणिवेंत एकच असतात; व त्यांच्यांत श्रेष्ठकनिष्ठ भेद करणें, ही केवळ मूर्खता आहे. परंतु, या दृष्टीने, एक सद्‌गुरु

सद्‌गुरूचा सर्वश्रेष्ठ अधिकार.

दुसऱ्या सद्गुरूहून मोठा नसला, तरी द्वैतसृष्टीचें संपूर्ण उल्लंघन होऊन, अखिल जीवनाच्या एकतेचा अनुभव येईपर्यंत, शिष्याने स्वतःच्या हिताकरितां, स्वतःच्या सद्गुरूचा अधिकार व हक्क (claim) इतर सद्गुरूंच्या अधिकार व हक्कापेक्षा अधिक श्रेष्ठ मानला पाहिजे. जीवनांतील अनेक परस्परविरोधी हक्कांमध्ये (claims), एक सर्वश्रेष्ठ हक्क निघाला नाही, तर मानसिक शक्तीचा इतस्ततः अपव्यय व ऱ्हास होईल. म्हणून, शिष्याच्या इतस्ततः व्ययीभूत होणाऱ्या मानसिक शक्तीचें सद्गुरूवर पूर्णपणें केंद्रीकरण होणें, साधारणतः अपरिहार्यच असतें. अगदी क्वचित्, व कांही विशिष्ट परिस्थितीमध्ये, एखाद्या शिष्याच्या बाबतींतील आध्यात्मिक कार्य सद्गुरूच आपसांत वाटून घेण्याचें ठरवितात. म्हणून, कांही अपवादात्मक शिष्यांना दोन किंवा दोन-पेक्षा अधिक सद्गुरूंशीं संबंध ठेवावा लागतो. पण हा नियम नसून, अपवाद आहे; व ज्या ठिकाणी, एकाच शिष्याला एकाहून अधिक सद्गुरु असतात, तेव्हा त्यांच्यांत त्या शिष्याच्या बाबतींतील आध्यात्मिक कार्याची विभागणी इतकी काळजीपूर्वक केली जाते, कीं त्यांच्यांत अधिकारक्षेत्रांबद्दल कोणताहि विरोध उत्पन्न होऊं शकत नाही.



## ११ : क्रियाशीलता आणि निष्क्रियता

कर्माने संचित अज्ञानाची वृद्धि होते.

ईश्वरानुभूतिकरता केल्या जाणाऱ्या बुद्धियुक्त कर्माव्यतिरिक्त इतर कोणतेंहि कर्म जाणीवेस बंधन उत्पन्न करतें. तें केवळ संचित अज्ञानाची अभिव्यक्ति आहे, एवढेंच नव्हे, तर तें त्या संचित अज्ञानाची अधिक वृद्धि करतें.

विधिसमारंभ हे आध्यात्मिक मार्गाची आडकाठ बनतात.

धार्मिक विधि आणि समारंभ, त्याचप्रमाणे निरनिराळ्या संप्रदायांचे आदेश, बाह्य आचार आणि संघटित आध्यात्मिक संस्था इत्यादींची प्रवृत्ति साधारणत: प्रीति आणि पूजा या भावनांना पोषकच असते. आणि म्हणून, कांही एका सीमेपर्यंत, त्यांचा मानवी जाणीवे-वरील अहंकारकवचा (ego-shell)चा ऱ्हास करण्यास उपयोग होतो. परंतु, विधिसमारंभांचें जर यांत्रिक आणि अंधानुकरण केलें, तर प्रीति आणि पूजा यांची आंतरिक भावना सुकून जाते; आणि असें झालें, म्हणजे त्यांच्यामुळे अहंकारकवचाचा ऱ्हास होण्याऐवजी तें दृढ होण्यास मात्र मदत होते. म्हणून, धार्मिक विधि आणि

समारंभ हे मनुष्याला अध्यात्ममार्गावर फार दूरवर नेऊं शकत नाहीत. त्यांचें जर अंधानुसरण केलें, तर दुसऱ्या कोणत्याहि विवेकशून्य क्रियाशीलतेने जसें बंधन उत्पन्न होतें, तसेंच या अंधानुसरणानेहि होऊं शकतें. या धार्मिक विधिसमारंभांतील आंतरिक जीवन आणि अर्थ निघून जातो, तेव्हा तर ते इतर दुसऱ्या विवेकशून्य क्रियांहूनहि अधिक भयंकर बनतात. कारण, विधिसमारंभ ईश्वरानुभूती मिळविण्यास उपयोगी आहेत, अशा समजुतीनेच मनुष्य ते करीत असतो; परंतु खरें पाहतां, ते या कार्याकरता किंचित्‌हि उपयोगी नसतात. या आत्मवंचनेमुळे निर्जीव धार्मिक विधि आणि समारंभ ही अध्यात्ममार्गावरची आडवाट बनते; आणि कित्येक वेळा, केवळ संवयींच्या शक्तीनेच, या बाह्य आचारांच्या ठिकाणीं, मनुष्य इतका आसक्त होऊन जातो, की तीव्र दुःखानुभूतिखेरीज, त्यांच्या भासमान सारपूर्णतेचा आणि मूल्यांचा त्याचा भ्रम नाहीसा होऊं शकत नाही.

विवेकशून्य क्रियाशीलतेपेक्षा निष्क्रियता अनेक प्रकारांनी बरी; कारण, निष्क्रियतेंत अधिक संस्कार न वाढविण्याचा आणि गुंतागुंत न करण्याचा गुण तरी असतो. सदाचारसंपन्न आणि उदार क्रियादेखील संस्कार उत्पन्न करते, आणि गतानुभव आणि गतक्रिया, यामुळे उत्पन्न होत असलेल्या जटिलते (complications) मध्ये, ती भर टाकते. सर्व जीवन म्हणजे स्वयंरचित बंधनापासून मुक्त होण्याचा प्रयत्न आहे. अज्ञानामुळें जें निर्माण झालें आहे, त्याचा निरास करण्याची, पूर्व संचिताचा भार फेकून देण्याची, व तात्कालिक आणि अस्थायी, अशा अनेक नफानुकसानांच्या ढिगाऱ्या-

स्वयंरचित बंधनाच्या गुंतागुंतीतून जीवन स्वतःस मुक्त करण्याचा प्रयत्न करतें.

खालून, स्वतःस विमुक्त करण्याची—अखिल जीवन ही तीव्र धडपड आहे. जीवन पूर्वप्राप्त सीमाकारक संस्कारांना नाहींसे करण्याचा, व स्वयंरचित चक्रव्युहांतून मुक्त होण्याचा प्रयत्न करतें. भावी क्रियाशीलता शाश्वत सत्यामधूनच प्रत्यक्षपणे उत्स्फूर्त व्हावी, व तिच्यावर सीमारहित्व, निर्मलता आणि आंतरिक सत्‌संपन्नता यांचा शिक्का असावा, हें जीवनाचें उद्दिष्ट असतें.

परमेश्वरप्राप्तींत मदत करणारी क्रियाशीलता खरोखर विवेकयुक्त (intelligent) आणि अध्यात्मदृष्टया फलदायक असते; कारण, त्या क्रियाशीलतेमुळे बंधनापासून मुक्ति मिळते. केवळ प्रत्यक्ष ईश्वरानुभूतिनंतर स्वयंस्फूर्त होणाऱ्या क्रियाशीलतेशीं तुलना केली, तरच ती दुय्यम दर्जाची ठरेल. इतर सर्व प्रकारच्या क्रिया—मग त्या जगदृष्टीने कितीहि चांगल्या अगर वाईट असोत, कितीहि प्रभावी किंवा प्रभावशून्य असोत—बंधनासच कारणीभूत होतात; आणि म्हणूनच त्या निष्क्रियतेहून कनिष्ठ दर्जाच्याच ठरतात. निष्क्रियता ही विवेकपूर्ण क्रियाशीलतेपेक्षा कमी श्रेयस्कर असते. परंतु, ती विवेकरहित क्रियाशीलतेपेक्षा बरी; कारण, तिच्यामुळे नवीन बंधनें तरी निर्माण होत नाहीत. विवेकरहित (unintelligent) क्रियाशीलतेंतून विवेकयुक्त क्रियाशीलतेप्रत (म्हणजे बंधनकारक कर्में सोडून, मुक्तिदायक कर्मांकडे) प्रगति करतांना, मध्ये एक प्रकारची निष्क्रियतेची अवस्था असतेच. शंका व संशय उत्पन्न झाल्यामुळे, विवेकरहित क्रियाशीलता स्थगित झाली आहे, परंतु,

निष्क्रियता ही विवेकरहित क्रियाशीलता आणि विवेकपूर्ण क्रियाशीलता, यांमधील आवश्यक स्थिति आहे.

पुरेशा प्रेरणेच्या अभावीं, विवेकसम्मत क्रियाशीलता मात्र सुरू आलेली नाही, अशी ही निष्क्रियतेची स्थिती असते. परंतु, आळस आणि जीवनाचें भय, यांपासून उत्पन्न होणारी सामान्य निष्क्रियता व आध्यात्मिक मार्गावरील प्रगतीमध्ये आवश्यक असलेली विशिष्ट स्वरूपाची निष्क्रियता,—या दोहोंतील फरक लक्षांत ठेवला पाहिजे.



*

*

# १२ : : : हिंसा आणि अहिंसा

घोषणांच्या शद्वां (slogans) बद्दल आसक्ति वाटणें, ही मनुष्याची प्रवृत्तीच आहे; एवढेंच नव्हे, तर ज्या शद्वांबद्दल त्याला अशी आसक्ति वाटते, त्या शद्वांनीं तो आपल्या क्रिया एखाद्या यंत्रासारख्या नियंत्रित करून घेतो. जीवनांत शद्वांनाहि स्वतःचें स्थान आहेच. परंतु, क्रिया जर सुबुद्ध, व विवेकपूर्ण व्हावयास हवी असेल, तर त्या शद्वांनी सूचित होत असलेल्या अभिप्रायाचें पृथक्करण करून, त्याचा अर्थ निश्चित करणें अत्यंत आवश्यक आहे. अशा तऱ्हेचें ज्यांचें अभ्यासपूर्वक परीक्षण व्हावयास पाहिजे, अशा शद्वांमध्ये, ' हिंसा ' ( violence ) आणि ' अहिंसा ' (nonviolence) या शद्वांइतक्या महत्त्वाचे दुसरे शद्व क्वचितच असतील. विचारधारे ( ideology ) च्या दृष्टीने, या शद्वांचें अतिशय महत्त्व आहे. त्यांचा क्रियांवर परिणाम होतो, एवढेंच नव्हे, तर एकंदर जीवनाच्या धोरणावर परिणाम होतो.

शद्वांबद्दल आसक्ति.

आध्यात्मिक जीवन ही अनुभवाची गोष्ट आहे. अत्यंत उच्च मूल्यांसाठी केलेल्या नियमांचें देखील, केवळ यांत्रिक अनुसरण करणें,

हें आध्यात्मिक जीवनाचें लक्षण नव्हे; तर अध्यात्मजीवनामध्ये, शद्बसूत्रांच्या पलीकडे असणारें ज्ञान अध्याहृत आहे. सर्व शद्ब किंवा सूत्रें यांची सत्याला सीमित करण्याची प्रवृत्ति असते. म्हणून, या सूत्रांतील गूढ भावार्थ ओळखण्याचा प्रयत्न ज्यांना करावयाचा आहे, त्यांना त्या सूत्रांतील चिकित्सात्मक पृथक्करण (analysis) करावें लागतें; आणि या पृथक्करणाचा जीवनांतील प्रत्यक्ष उदाहरणांशीं सतत संबंध ठेवून, त्याला त्यांची पुष्टि द्यावी लागते. 'हिंसा आणि अहिंसा', या परस्पर विरोधी कल्पनांच्या साह्याने, जीं जीवनाची मार्गदर्शक तत्त्वें बनविलीं जातात, त्यांसंबंधी तर हें विशेषतः खरें आहे.

आध्यात्मिक ज्ञान हें शद्बसूत्रांच्या पलीकडे आहे.

व्यवहारांतील जीवनांत 'हिंसा आणि अहिंसा,' हे इतक्या विविध प्रकारांच्या परिस्थितींना उद्देशून वापरले जातात, कीं या परिस्थितींची दखल घेऊन, तो पुढील स्पष्टीकरणाचा आरंभबिंदू केल्याखेरीज, ह्या शद्बांच्या प्रयोगांतून उद्‌भवलेल्या कोणत्याहि प्रश्नांचें स्पष्टीकरण पूर्ण होणें शक्य नाही. तथापि, स्पष्टीकरणाकरिता, या शद्बांनी सूचित होत असलेल्या सर्वच भिन्न परिस्थितींची पूर्ण संख्या लक्ष्यांत घेण्याचें कारण नाही; तर विविध परिस्थितींचीं कांहीं प्रातिनिधिक (representative) उदाहरणें घेतलीं म्हणजे पुरे. 'हिंसा' आणि 'अहिंसा' या शद्बांभोंवतीचीं जीं मूल्यें आहेत, त्यावर पुढे दिलेल्या प्रातिनिधिक उदाहरणांनी चांगला प्रकाश पडेल.

प्रातिनिधिक परिस्थितीपासून प्रारंभ.

उदाहरण १ लें:—कल्पना करा, कीं ज्या माणसाला पोहतां येत नाही, असा एक मनुष्य एखाद्या तलावांत पडला आहे, व जवळच

त्याला वांचविण्याची इच्छा असलेला व पोहतां येऊं शकणारा एक दुसरा मनुष्य आहे. बुडणाऱ्या मनुष्याची प्रवृत्ति बहुधा त्याला वांचविण्याकरता येणाऱ्या माणसाला घट्ट पकडण्याची असते. कधी कधी, त्याची पकड इतकी विचित्र असते की, त्याला वांचविणें अशक्य होतें, एवढेंच नव्हे, तर त्याच्या मदतीला म्हणून जो येतो, तो वांचविणाराहि त्या पकडीमुळे बुडण्याचा संभव असतो. म्हणून, ज्याला बुडत्याला वांचवावयाचें आहे, त्याने बुडणाऱ्याच्या डोक्यावर मारून, त्याला प्रथम बेशुद्ध करावयाचें असतें, आणि नंतर त्याच्या सुटकेचे इतर प्रयत्न सुरू करावयाचे असतात. अशा परिस्थितींत बुडणाऱ्याचे डोक्यावर मारणें, ही हिंसाहि नव्हे, अगर अहिंसाहि नव्हे.

बुडणाऱ्या माणसाचें उदाहरण.

उदाहरण २ रें:—समजा, एक मनुष्य संसर्गजन्य रोगाने आजारी आहे, आणि तो केवळ शस्त्रक्रियेनेच बरा होऊं शकेल. अशा स्थितींत, त्याला बरा करण्याकरता, त्याचप्रमाणे त्या रोगापासून इतरांना वांचविण्याकरता, डॉक्टरला त्या मनुष्याच्या शरीराचे रोगदूषित भाग आपल्या शस्त्राने कापून काढावे लागतील. परंतु, त्याच्या या कापण्याच्या क्रियेला 'हिंसा' अगर 'अहिंसा', यांपैकी कोणत्याहि सदरांत घालतां येणार नाही.

शस्त्रक्रियेचें उदाहरण.

उदाहरण ३ रें:—समजा, एका आक्रमक धोरणाच्या राष्ट्राने स्वार्थासाठी एका दुबळ्या राष्ट्रावर स्वारी केली, आणि केवळ त्या दुर्बल राष्ट्राचें रक्षण करण्याच्या उदात्त हेतूनेच प्रेरित होऊन, दुसरें एक राष्ट्र त्या चढाऊ राष्ट्राचा सशस्त्र प्रतिकार करीत आहे. दुर्बल राष्ट्रांच्या

आक्रमक राष्ट्राचें उदाहरण.

रक्षणार्थ, असें लढणें हिंसाहि होणार नाही, किंवा अहिंसाहि होणार नाही. तर, ती अहिंसात्मक हिंसा (nonviolent violence) होईल.

पिसाळलेल्या कुत्र्याचे उदाहरण.

उदाहरण ४ थें:—समजा, एक पिसाळलेला कुत्रा बेफाम होऊन, सैरावरा धावत आहे, आणि शाळेंतील विद्यार्थ्यांना तो चावण्याचा धोका आहे. अशा वेळीं, मुलांच्या रक्षणासाठी, त्या शाळेंतील शिक्षकांनी त्याला ठार मारलें, तर त्यामध्ये हिंसा होईल; परंतु, त्या हिंसेंत द्वेष नाही.

बलवंतांची अहिंसा.

उदाहरण ५ वें:—समजा, एका आरोग्यसंपन्न आणि सुदृढ मनुष्याचा कोणी एका उर्मट माणसाने त्याच्या अंगावर थुंकून अपमान केला, व तो बलशाली मनुष्य त्या उर्मट मनुष्याला चिरडून टाकण्याची शक्ति असूनहि, त्याला कांही शिक्षा न करतां, उलट शांतपणाने प्रीतीचें तत्त्वज्ञान शिकवितो. या क्रियेंत अहिंसा आहे. परंतु, ती बलवंतांची अहिंसा (violence of the strong) आहे.

सूक्ष्म विचाराची आवश्यकता.

उपरिनिर्दिष्ट पहिल्या तीनहि उदाहरणांत (१) त्या त्या उदाहरणांतील परिस्थितींच्या विविध बारिकसारिक गोष्टींचा, व तसेंच, (२) क्रियेस प्रवृत्त करणाऱ्या हेतूंचा—सूक्ष्म विचार केल्याखेरीज, त्या त्या क्रियेंत हिंसा आहे, की अहिंसा आहे हें सांगतां येणार नाही. उदाहरणांतील शेवटल्या दोन परिस्थितींत, ती क्रिया हिंसा आहे, की अहिंसा आहे, हें सांगणें शक्य असलें, तरी त्यांमध्ये असे कांही घटक आहेत, की त्यांमुळे या शब्दांचा सामान्यतः जो अर्थ असतो, त्याहून कांही निराळ्याच अर्थाने ते वापरावे लागतात.

पहिल्या उदाहरणांतील बुडत्या मनुष्यास कराव्या लागणाऱ्या आघाताच्या परिस्थितीचें सूक्ष्म पृथक्करण केलें, तर असें दिसून येईल, की ज्यावर तो आघात केला जातो, त्याची पूर्वी परवानगी घेतलेली नसते. या परिस्थितींत, ज्या मनुष्याला टोला मारला जातो, त्याची प्रथम अनुमति घेतलेली नसते. परंतु, ही टोला देण्याची क्रिया बुडत्या मनुष्याच्या कल्याणासाठीच योजली जाते. त्याला इजा करावी, म्हणून कांही ती योजली जात नाही. तेव्हा या अर्थाने, ही क्रिया अहिंसात्मक आहे, असें म्हणतां येईल. या विशिष्ट दृष्टीने पाहतां, या क्रियेंत हिंसा आणि अहिंसा हीं अनुक्रमें दोन्हीहि आहेत. परंतु, सामान्य अर्थाने, तिला हिंसाहि म्हणतां येणार नाही, किंवा अहिंसाहि म्हणतां येणार नाही.

संसर्गजन्य रोगावरील शस्त्रक्रियेचें उदाहरण ( उदा. नं २ ) बुडत्या मनुष्याच्या उदाहरणाहून थोडें निराळें आहे. या ठिकाणीं देखील, बला ( force ) चा उपयोग आहेच ( इतका की येथे जोराने शरीराचा भाग कापला जातो ); आणि ज्या व्यक्तिविरुद्ध तो बलाचा उपयोग केला जातो, त्याच्या कल्याणासाठीच तो असतो. परंतु, सामान्यतः, शस्त्रक्रियेपूर्वी रोगी आपली अनुमति बहुधा देत असतो. याशिवाय, या शस्त्रक्रियेंत, रोगापासून होणाऱ्या पुढील आपत्तीपासून रोग्याला वांचविणें, एवढाच एक हेतू नसून, त्या रोगाच्या संसर्गापासून इतरांना वांचविणें, हाहि एक हेतू असतो. तेव्हा रोग्याचें, व त्याचप्रमाणे त्याच्या सान्निध्यांत जे जे येतील, त्या सर्वांचें निर्भेळ कल्याण करण्याच्या हेतूने, हा बलाचा उपयोग प्रेरित झालेला असतो. या क्रियेंत इजा करण्याचा हेतू नसल्याने, सर्वसामान्य अर्थाने तिला हिंसा म्हणतां येणार नाही; परंतु, या क्रियेंत जिवंत शरीराचे भाग कापले जात असल्याने, तिला अहिंसा म्हणणेंहि योग्य होणार नाही.

आक्रमक देशाचें उदाहरण (उदा. नं ३) तर याहूनहि मनोरंजक आणि उद्बोधक आहे. या ठिकाणीं, लढाई ही कोणत्याहि स्वार्थी हेतूकरता नसते; किंबहुना ती केवळ दुर्बल राष्ट्राचें रक्षण करण्याकरताच असते. परंतु, त्यामुळे चढाऊ राष्ट्राची पुष्कळ हानी आणि संहार होण्याचा संभव असतो. आणि हा बलाचा उपयोग चढाऊ राष्ट्राविरुद्ध असून, त्याच्या पूर्वीच्या अनुमतीशिवाय केलेला असतो, एवढेंच नव्हे, तर त्या राष्ट्राच्या जाणीवयुक्त आणि बुद्धिपुरस्सर इच्छेच्याहि विरुद्ध असतो. परंतु, याहि परिस्थितीला, आपणांस केवळ हिंसेचें निर्भेळ उदाहरण म्हणतां येणार नाही, कारण त्यांत हानी आणि हिंसा असली, तरी बलाचा उपयोग आक्रमक राष्ट्राचा बळी पडलेल्या दुर्बल राष्ट्राच्या कल्याणासाठी तर असतोच, परंतु त्या आक्रमक राष्ट्राच्याहि कल्याणासाठीच असतो. कारण, चढाऊ धोरणाचा प्रतिकार केल्यामुळे, दुबळ्या राष्ट्रांच्या दुर्बलतेचा अवास्तव फायदा घेऊन, त्यांच्यावर स्वारी करण्याची चढाऊ राष्ट्राची आध्यात्मिक दुर्बलता दर्शविणारी प्रवृत्ति ह्यामुळे हळूहळू कमी होत जाते. याकरिता, ही हिंसात्मक क्रिया नव्हे, तर अहिंसात्मक हिंसा ( nonviolent violence ) आहे.

आक्रमक राष्ट्राशीं लढाई करण्याचें उदाहरण (उदा. नं. ३) आणि दूषित भागावरील शस्त्रक्रियेचें उदाहरण (उदा. नं. २) यांत पुष्कळसें साम्य आहे. चढाऊ राष्ट्राशीं सामना करण्याच्या उदाहरणांत, दुर्बल राष्ट्राचें हित हा प्रमुख उद्दिष्ट परिणाम आहे, आणि ज्याच्या विरुद्ध बलाचा उपयोग होतो, त्या चढाऊ राष्ट्राचें हित हें दुय्यम उद्दिष्ट आहे. त्याचप्रमाणे, शस्त्रक्रियेच्या उदाहरणांत, ज्याच्या विरुद्ध बलाचा उपयोग होतो, त्या रोग्याचें हित हें मुख्य उद्दिष्ट असून, इतरांचें हित हें दुय्यम उद्दिष्ट आहे. परंतु हा भेद क्षुल्लक आहे. या दोन्ही

एक तुलना.

उदाहरणांची तुलना आणि पृथक्करण केलें, तर बलाच्या उपयोगास बळी पडणारांचें व त्याचप्रमाणे इतरांचें हित साधण्यांत तीं दोन्ही सारखींच परिणामकारक आहेत, असें आढळून येईल.

दुर्बलांचें रक्षण हा एक निस्वार्थ सेवेचा महत्त्वाचा प्रकार आहे; तो एक कर्मयोगाचा भाग आहे. आणि यासाठी केलेला शक्तीचा उपयोग, केवळ उद्दिष्ट हेतू साधण्याकरता, अपरिहार्य साधन म्हणून करणें, पूर्णपणे न्याय्य आहे. परंतु, अशा तऱ्हेच्या लढाईला निर्भेळ आध्यात्मिक महत्त्व येण्याकरता, ती केवळ दुर्बलांच्या रक्षणाकरतांच, आणि पूर्ण निःस्वार्थीपणानें आणि द्वेषरहित होऊन, लढली गेली पाहिजे. एखाद्या स्त्रीवर एखाद्या मनुष्याने दुष्ट हेतूने हल्ला केला असतां, त्यापासून तिला वांचवून, तिचा जीव आणि अब्रू रक्षण करणें, आणि त्या मनुष्यास शिक्षा करून, त्याच्या मनांत पश्चात्ताप उत्पन्न करणें,—या परिस्थितीसारखीच उपरिनिर्दिष्ट लढाईची परिस्थिति आहे.

दुर्बलांचें रक्षण हा निःस्वार्थ सेवेचा प्रकार आहे.

पिसाळलेल्या कुत्र्याच्या नाशाच्या उदाहरणांत (उदा. नं. ४) हिंसा खासच आहे. परंतु, त्या कुत्र्याकडून ज्यांना इजा झाली असती, त्या मुलांच्या अधिक महत्त्वाच्या कल्याणासाठी ती केल्यामुळे, आणि त्यांत द्वेष नसल्यामुळे, ती न्याय्य आहे. सूड घेण्याऐवजी, केवळ प्रीतीचें तत्त्वज्ञान शिकविणाऱ्या बलवान मनुष्याच्या उदाहरणांत, अहिंसा आहे (उदा. नं. ५); परंतु ती निष्क्रियता नव्हे, तो दुबळेपणाहि नव्हे, किंवा निष्क्रियताहि नव्हे; तर त्यांत बळ असून, खरी विधायक आणि निष्काम स्वरूपाची क्रियाहि आहे. ही बलवंतांची अहिंसा होय.

पिसाळलेला कुत्रा आणि बलवंतांची अहिंसा यांच्या उदाहरणांचें समालोचन.

# अहिंसेचे प्रकार

## शुद्ध व अमिश्रित अहिंसा

( Non-violence Pure and Simple )

( दिव्य प्रेमावर अधिष्ठित )

या अवस्थेंत, मनुष्य सर्वांकडे आत्मवत् पहात असून, शत्रुमित्रतेच्या पलीकडे जातो; आणि कोणत्याहि प्रकारचा हिंसात्मक विचार त्याच्या मनांत प्रविष्ट होत नाही.

---

## वीराची अहिंसा

( Non-violence of the Brave )

( सीमारहित शुद्ध प्रेमावर अधिष्ठित )

प्रत्यक्ष ज्ञानामुळे सर्व लोक आत्मवत् वाटूं लागले नाहीत, तरी कोणासहि जे आपले शत्रू समजत नाहीत, आणि आक्रमणकारी मनुष्यास देखील, जे प्रेमाने जिंकण्याचा प्रयत्न करतात, आणि स्वतःवर हल्ला झाला असतांना सुद्धा, भीतीने नव्हे, तर प्रीतीने प्राणार्पण करतात, त्यांना ही अहिंसा लागू आहे.

---

## भित्र्यांची अहिंसा

( Non-violence of the Coward )

( चारित्र्य आणि मन यांच्या असीम दुर्बलतेवर अधिष्ठित )

या श्रेणीमध्ये, जे आक्रमणाचा प्रतिकाररहित स्वीकार दुसऱ्या कोणत्याहि कारणास्तव करीत नसून, केवळ भीतिमुळेच करतात, असे लोक येतात.

# हिंसेचे प्रकार

## अहिंसात्मक हिंसा
( Non-violent Violence )
( अपरिमित प्रेमावर अधिष्ठित )

आत्मरक्षण अगर स्वार्थहेतु यांचा कांहीहि संबंध नसतांना, केवळ दुर्बलांच्या रक्षणासाठी केलेली हिंसा.

---

## निःस्वार्थ हिंसा
( Self-less Violence )
( परिमित मानवी प्रेमावर अधिष्ठित )

केवळ विश्वासघाताने आक्रमण झालें असतां, इतर कोणत्याहि हेतूने नाही, तर केवळ आत्मरक्षणार्थ जी हिंसा होते ती. उदाहरणार्थ, जेव्हा एखाद्या विषयांधाकडून, एखाद्याच्या मातेचा अवमान होण्याच्या बेतांत असतो, आणि तो आपल्या मातेचें रक्षण करतो. त्याचप्रमाणें, मातृभूमीची इभ्रत ( honour ) इरेस पडली आहे, अगर तिच्यावर शत्रूंचें आक्रमण झालें आहे, अशा वेळचा तिचें संरक्षण करण्याचा निःस्वार्थी राष्ट्रीय प्रयत्न, ही निःस्वार्थ हिंसा होय.

---

## स्वार्थी हिंसा
( Selfish Violence )
( द्वेष आणि वासना यांवर अधिष्ठित )

सत्ता आणि स्वार्थांची प्राप्ती, या स्वार्थी हेतूंनी जेव्हा एखाद्या व्यक्तीकडून अगर राष्ट्राकडून हिंसा होते, तेव्हा ती या श्रेणींत येते.

शुद्ध आणि अमिश्रित अहिंसा म्हणजेंच अनंत प्रेम. हेंच जीवनाचें ध्येय आहे. शुद्ध आणि अनंत प्रेमाच्या या स्थितीला पोचल्यावर, साधक परमात्म्याशीं युक्त होतो. या ध्येयाप्रत पोचण्यासाठी, तीव्र उत्कंठेची आवश्यकता आहे; आणि ज्या साधकास या उच्चतम स्थितीस पोचण्याची आकांक्षा असते, त्याला ' वीराची अहिंसा ' आचरणांत आणण्यापासूनच प्रारंभ करावा लागतो. प्रत्यक्ष ज्ञानाने सर्वांशीं एकरूप जे झालेले नाहीत, व सर्वांठायीं आत्मभाव ज्यांना दिसूं लागलेला नाही, परंतु, जे कोणासहि शत्रूवत् लेखीत नाहीत, आणि आक्रमण करणाऱ्यास देखील प्रीतीनेच वश करण्याचा प्रयत्न करतात, व आक्रमण झालें असतांना, ( भीतीने नव्हे, तर प्रीतीने ) प्राणत्यागासहि तयार होतात, अशांना हें लागूं आहे.

वर दर्शविल्याप्रमाणे ' वीराची अहिंसा ', ही उच्चतम स्थितीच्या प्राप्तीची आकांक्षा असणाऱ्यांना आचरणीय आहे. सर्वसाधारण जनतेंत, ही आकांक्षा आढळत नाही. म्हणून, सर्वसाधारण जनतेस जर ' शुद्ध अहिंसे ' साठी तयार करावयाचें असेल, तर त्यांची प्रथम ' वीराच्या अहिंसे ' साठी तयारी करावी लागेल. हें ध्येय व्यवहारांत साध्य होण्यासाठी, त्यांच्याकडून 'अहिंसात्मक हिंसे'चे म्हणजे कोणताहि स्वार्थपर हेतू न धरतां, केवळ दुर्बलांच्या रक्षणार्थ, हिंसेचें आचरण होणें, आवश्यक आहे. प्रत्यक्ष युद्धाच्या काळीं, सर्वसाधारण जनतेस अनपेक्षित परिस्थिति दिसते, आणि सर्वश्रेष्ठ ध्येयाबद्दल आस्था ठेवण्याचा उपदेश ऐकून घेण्याच्याहि मनःस्थितींत ती नसते; तेव्हा, त्यांना अंतिम ध्येयाप्रत नेण्याचा व्यवहार्य मार्ग, म्हणजे त्यांच्यांत प्रथम, ' अहिंसात्मक हिंसे ' चें तत्त्व रुजवून, नंतर त्यांना ' वीराच्या अहिंसे ' कडे हळूहळू नेणें हा होय. आध्यात्मिक तयारी नसलेल्या सर्व-

साधारण जनतेस युद्धकाली ' वीराच्या अहिंसे 'चा अवलंब करावयास लावले, तर तो असमयोचित प्रयत्न ठरेल. तो साध्य होणार नाही, इतकेंच नव्हे, तर उलटपक्षीं त्या प्रयत्नांत सर्वनाशी अशी ' भित्र्याची अहिंसा ' येण्याची अतिशय भीति राहील. सारांश, जनता केवळ भयभीत होऊन, आक्रमणाचा प्रतिकार करणार नाही. अहिंसेचें आचरण करण्याकरता, जनता प्रतिकारशून्य बनेल, असें नव्हे.

' अहिंसात्मक हिंसे'ऐवजी ' निःस्वार्थ हिंसे ' चें तत्त्व आचरणांत आणूनहि जनतेस ' वीरांच्या हिंसे ' प्रत नेतां येईल. विश्वासघाताच्या आक्रमणामध्ये, आत्मरक्षणार्थ जी हिंसा होते, ती निःस्वार्थ हिंसा. येथे कोणत्याहि स्वार्थपर हेतूने, हिंसेला न्याय्य ठरविली जाण्याचा प्रयत्न होतां कामा नये. उदाहरणार्थ, जेव्हा एखाद्या विषयांधाकडून एखाद्याच्या मातेचा मानभंग होण्याच्या बेतांत असतो, आणि प्रतिकाराकरिता हिंसेचा अवलंब करून, तो तिचें रक्षण करतो, तेव्हा त्याने ' निःस्वार्थ हिंसे ' च्या तत्त्वाचें पालन केलें, असें म्हणतां येईल. त्याचप्रमाणें, मातृभूमीची इभ्रत धोक्यांत असेल, आणि तिच्यावर शत्रूचें आक्रमण झालें असेल, तर मातृभूमीच्या रक्षणार्थ केलेला राष्ट्राचा निःस्वार्थ प्रयत्न, म्हणजे निःस्वार्थ हिंसा होय. माता किंवा मातृभूमि ही स्वतःची असल्याने, येथे स्वार्थाची छटा असते, व याठिकाणीं व्यक्त झालेलें प्रेम, हें मर्यादित मानवी प्रेम असतें. ' भित्र्याची अहिंसा ' व त्याचप्रमाणें ' स्वार्थी हिंसा ' सर्वनाश करणारी असते. उदाहरणार्थ, व्यक्तीने अगर राष्ट्राने, सत्ता अगर इतर स्वार्थ, यासाठी केलेली हिंसा.

यावरून असें दिसून येईल की, ' शुद्ध आणि अमिश्रित अहिंसा ' हेंच जीवनाचें ध्येय असलें, तरी तें ' वीराच्या अहिंसे ' चा अवलंब

करूनच प्रत्येक आध्यात्मिक साधकास साध्य करून घ्यावें लागतें. सर्वसाधारण जनतेस ईश्वराशीं ऐक्य पावण्याची तितकीशी तीव्र इच्छा नसते. म्हणून जनतेला हळूहळू व परिस्थितीप्रमाणें, 'अहिंसात्मक हिंसे'च्या अगर 'निःस्वार्थ हिंसे'च्या द्वारा, त्या ध्येयाकडे न्यावें लागतें. शेवटी, हें अगदी स्पष्टपणे समजून घेतलें पाहिजे की, अहिंसात्मक हिंसा' अगर 'निःस्वार्थ हिंसा', हीं जीवनाचें अंतिम ध्येय असलेली 'शुद्ध आणि अमिश्रित अहिंसा' अथवा 'अनंत प्रीति' साध्य करण्याचीं केवळ साधनें आहेत. त्यांना प्रत्यक्ष ध्येय समजण्याचा घोटाळा होऊं देतां कामा नये. उदाहरणार्थ, 'वीराची अहिंसा' आणि 'भीरूची अहिंसा' या दोन्हीहि अहिंसाच होत; परंतु, त्यांमागे असलेल्या हेतूंमुळे, 'वीराची अहिंसा' ही प्रेमांतून उगम पावते, आणि 'भीरूच्या अहिंसे'चा उगम भीतींत असतो. भीति ही प्रीतीच्या अगदी उलट आहे. केवळ अहिंसेच्या दृष्टीने, प्रीति व भीति ह्या परस्परविरुद्ध नसल्या, तरी त्यांचे हेतू पूर्णपणे परस्परविरुद्ध असतात. 'वीराच्या अहिंसे' मधील हेतु अनंत प्रीतीसाठी आत्मार्पण करणें हा आहे; तर 'भीरूच्या अहिंसे' मधील हेतु असीम तिरस्कारास पात्र होऊन, आत्मरक्षण करणें हा आहे. म्हणून 'भित्र्याची अहिंसा', ही 'प्रीतिशून्यता', या शीर्षकाखाली व 'शूराची अहिंसा', 'प्रीति' या शीर्षकाखाली घालणें योग्य आहे.

'अहिंसात्मक हिंसा' ही प्रीती या सदराखालीं न्याय्य ठरत नसून, कर्तव्य या सदराखालीं न्याय्य ठरते. कारण, निःस्वार्थबुद्धीने दुसऱ्यासाठी केलेलें कर्मयोगपर कर्तव्य अनंत पण मानवीच असलेल्या प्रेमाशीं संयुक्त (linked) असतें.

हिंसा व अहिंसा या, दोन परस्परविरुद्ध शक्तींमधील भेद नाहीसा होऊं शकत नाही; परंतु योग्य रीतीने आणि योग्य मार्गाने अभि-

व्यक्त केल्यास, एका शक्तीचें दुसऱ्या शक्तींत रूपांतर होऊं शकतें. चुकीच्या पद्धतीने अन्नग्रहण केल्यास, त्याचें विष बनूं शकतें; आणि सोमलासारखें विष पुष्टिवर्धक म्हणून व कमी प्रमाणांत दिलें असतां, मज्जातंतूंना शक्ति देऊं शकतें. जरी प्रत्यक्ष अन्नाचें विष बनत नाही, अगर याउलटहि होत नाही, तथापि अभिव्यक्तिमुळे, क्रियेचें व परिणामांचें स्वरूप बदलून जातें.

वरील विविध परिस्थितींच्या सूक्ष्म परिक्षणावरून असें दिसून येतें की त्यांच्यांत हिंसा आहे की अहिंसा आहे, व ती न्याय्य आहे की अन्याय्य आहे, तसेच त्याचें मूल्य खरें आहे की खोटें इ. प्रश्न केवळ तत्संबंधी एखादा सार्वत्रिक कायदा करून सुटणार नाहीत. त्या परिस्थितींमध्ये, अनेक आध्यात्मिक स्वरूपाच्या नाजूक बाबी आणि गुंतागुंत आहे; आणि अहिंसा व हिंसा यांचें आध्यात्मिक मूल्यांतील स्थान समजण्यासाठी, परिस्थितींतील वस्तुगत खरा अर्थ पाहण्याचा दृष्टिकोन पाहिजे. यासाठी, केवळ हिंसा अगर केवळ अहिंसा, या संबंधीच्या अर्धवट कल्पनांवर आधारलेल्या घोषणांनीच (slogans)—मग त्या कितीहि नादयुक्त असोत—क्रिया निश्चित होऊं नये. **नियमातीत असणाऱ्या आध्यात्मिक ज्ञानांतून आणि द्वंद्वातीत असणाऱ्या दिव्य प्रेमांतून, कृति (action) ही स्वाभाविकपणे उत्स्फूर्त झाली पाहिजे.**

# १३ : आध्यात्मिक उन्नतीची गतिप्रक्रिया

संसारासक्त मनुष्याच्या दृष्टिकोनामध्ये आमूलाग्र परिवर्तन झालें, म्हणजे आध्यात्मिक उन्नतीस सुरवात होते. संसारासक्त मनुष्य बव्हंशी शरीराकरिताच जगत असतो. त्याच्या कांही व्यवसायांचा देहाशीं सरळ संबंध दिसला नाही, तरी अंतिम पृथ:-करणात्मक निरीक्षणामध्ये, असें आढळून येतें, की अखेरीस त्याचीहि प्रेरणा देहविषयक वासनांशींच संबद्ध आहे. उदाहरणार्थ, तो खाण्याकरिता जगतो, जगण्याकरिता खात नाही. देहाहून स्पष्टपणे उच्चतर असलेलें एखादें उद्दिष्ट त्याला सांपडलेलें नसतें. तेव्हा, सहजच त्याची सर्व धडपड देह व तद्विषयक सुखसोयी यांच्या भोंवती केन्द्रित होते. परंतु, त्याला जेव्हा आत्म्यास प्राधान्य देणारी सारभूत महत्ता आढळते, तेव्हा देह एकदम गौण होतो; व श्रेष्ठतर ध्येयाच्या प्राप्तीकरिता देह हा केवळ साधन बनतो. जो देह आतापर्यंत अध्यात्मजीवनामध्ये अड-थळा होता, त्याच देहावर श्रेष्ठतर जीवनाच्या विमोचना-करिता ताबा मिळवण्यांत येतो. दृष्टिकोनामध्ये हा बदल घडून आला, म्हणजे देहाचा आत्मविरोधी व्यापार क्षीण होत जाऊन, अखेरीस तो आत्म्याचें केवळ सहायक साधन बनतो. यानंतर, मनुष्य

श्रेष्ठतर जीवनाकरिता देहास स्वाधीन ठेवणें.

देहाच्या गरजांकडे लक्ष देत राहिला, तर असें करतांना, तो देहाशीं तादात्म्य पावत नाही. आगगाडीचा सारथी केवळ एंजीन चालू रहावें, याच हेतूने त्यांत कोळसा व पाणी टाकतो, तद्वतच तो मनुष्य देहयात्रा चालण्याकरिता, देहाच्या गरजांकडे लक्ष देतो.

ध्येयाचा शोध.

ज्याकरिता मनुष्याचें जीवन आहे, त्या ध्येयाचा तीव्र शोध चालू असल्याशिवाय, आध्यात्मिक उन्नतीला सुरवातहि होऊं शकत नाही. मनुष्याच्या प्रेमाच्या व द्वेषाच्या व निरनिराळ्या सुख-दुःखांच्या अनुभवांच्या मागे, न कळत, हा ध्येयाचा शोधच असतो. परंतु, मनुष्य या दिव्य भवितव्यतेच्या अगम्य व अनिवार्य ओढीने आंदोलित झाला, तरी सत्यानुभूतीरूपी गिरिशिखरावर आरोहण करण्याकरिता, त्याला बराच वेळ लागतो. शिवाय, अखेरपर्यंत, पथामध्ये खळगे व पाय घसरविणारे सुळके विखरलेले असतातच. जे या गिरिशिखरावर जाण्याचा प्रयत्न करतात, त्यांना अधिकाधिक उंच चढावें लागतें. तसेच, एखाद्या माणसाला, अत्युच्च स्थानी चढण्यांत यश आलेंच, तरीहि त्याच्या हातून एखादी लहानशी देखील चूक झाल्यास, त्याला तितक्याच उंचीहून खाली पडावें लागतें, व आपल्या चढण्याच्या उपक्रमाला पुनः प्रारंभ करावा लागतो. तेव्हा, पूर्ण सद्‍गुरूच्या मार्गदर्शनाचा व सहाय्याचा लाभ नसेल, तर साधकास कधीहि खरी सुरक्षितता नसतेच. पूर्ण सद्‍गुरूला पथांतील बारीक-सारीक व अंतर्बाह्य माहिती असते. व तो साधकाचे अधःपतनापासून रक्षण करूं शकतो, इतकेंच नव्हे, तर त्याची टाळतां येणारी अवनति टाळून, त्याला अनुभूतीच्या ध्येयापर्यंत नेऊं शकतो.

ध्येयप्राप्तीस बद्धपरिकर झालेला साधक स्वतःचे भूतकालांतून

आणलेले संस्कार बरोबरच ठेवतो; व त्याच्या तीव्र आध्यात्मिक तळमळीमुळे, त्याचे ते संस्कार, कांही कालपर्यंत, क्षीण होऊन तरंगत राहतात. परंतु, मधून मधून, जेव्हा आध्यात्मिक प्रयत्न शिथिल होतो, तेव्हा, आतापर्यंत क्रियाप्रवण नसलेले संस्कार अधिक प्रबल बनून, व नवीन रीतीने व्यवस्थित होऊन, साधकाच्या उन्नतीमध्ये दुर्गम अडथळा उत्पन्न करतात.

उन्नतीमधील अडथळे.

हें नदीच्या उदाहरणाने स्पष्ट होईल. नदीचा प्रबल प्रवाह आपल्या उगमस्थानांतील व किनाऱ्यांमधील झिजलेल्या मातीचें ढीग घेऊन जातो. जोंवर ही माती पाण्यांत मिसळून वहात राहते, तोंवर तिच्यामुळे नदीचा प्रवाह फार तर मंद होतो, पण अडून रहात नाही. परंतु, पुढे सपाट प्रदेशामध्ये, प्रवाहाचा आवेग कमी होतो, तेथे व विशेषत: मुखाजवळ, ही माती नदीतलावर बसूं लागून, तिच्यामुळे मोठमोठी बेटें व दोआब बनतात. व त्यांच्यामुळे, नदीचा प्रवाह अवरुद्ध होतो, किंवा त्याची दिशा बदलते, किंवा तो भंग पावून, त्याच्या अनेक धारा बनतात; व त्याची पूर्वीची प्रचंड शक्ति कमी होते. तसेच, नदीला पूर आलेला असल्यास, त्याच्याबरोबर मार्गांतील झाडें, झुडपें व कचरा हे सर्व वाहून जातात; परंतु, हे सर्व, कांही प्रमाणांत एकत्रित झाले, म्हणजे त्यांचा प्रवाहास मोठाच अडथळा होऊं शकतो. त्याचप्रमाणे, उन्नतिपथदेखील स्वयंनिर्मित अडथळ्यांनीच अवरुद्ध होऊं शकतो; व हे अडथळे केवळ सद्गुरूच्या मदतीनेच दूर होऊं शकतात.

नदीची उपमा.

जेव्हा साधक, सद्गुरूमध्ये प्रतीत होणाऱ्या असीम जीवनाकरता,

स्वतःच्या आहंकारिक जीवनाचा त्याग करतो, तेव्हा सद्‌गुरूची मदत अत्यंत प्रभावी होते. पूर्ण शरणागति ही अतिशय दुःसाध्य आहे; परंतु, अहंभाव निम्नतर पायरीपर्यंत उतरविणें, ही एक आध्यात्मिक उन्नतीची आवश्यक अट आहे. मोठमोठीं 'कार्यें' ( works ), हा कांही आध्यात्मिक उन्नतीचा प्रथम उद्देश नाही; तर आहंकारिक चेतनेने सीमित नसलेल्या जीवनाचें गुणवैशिष्ट्य मिळाविणें, हेंच आध्यात्मिक उन्नतीचें लक्ष्य आहे. साधकाने थोर व महान् कार्यें केलीं असतील; परंतु, सदासर्वकाळ तीं कार्यें माझीच आहेत, ही ममत्वबुद्धि जर त्याने ठेवली, तर त्याचा अहंकार या सर्व कर्मविपाकावर आरूढ होऊन, तो सीमातीत जीवनाच्या प्राप्तींतील एक भीषण बाधा बनतो. तेव्हा, विधिसमारंभांचे लोकाचार, परोपकाराची कृत्यें, बाह्य संन्यास व तप हे जर अहंभावमूलक असतील, तर ते सर्व व्यर्थ आहेत.

अभिमान नाहीसा झाला पाहिजे.

म्हणून, 'मी हें करतों', व 'मी तें करतों', अशी कल्पना साधकाने आपल्या मनास मुळीच शिवूं देऊं नये. परंतु ह्या प्रकारचा अभिमान वाढेल, या भीतीने साधकाने पूर्ण निष्क्रियतेचा अंगिकार करावा, असा कांही याचा अर्थ नाही. ज्या अभिमानाचें संवर्धन, त्याने आधीच करून ठेवलें आहे, तो विदीर्ण करण्याकरता, त्याला क्रियापूर्ण जीवनहि स्वीकारावें लागेल. साधक दुहेरी आपत्तीमध्ये सापडतो. निष्क्रियता स्वीकारली, तर ज्या आहंकारिक जीवनाच्या पिंजऱ्यामध्ये, तो अडकलेला असतो, तो मोडून टाकण्याकरता, त्याचा कोणताहि प्रयत्न होत नाही; व जर तो उद्योगशील बनला,

दुहेरी आपत्ति.

तर त्याचा अहंकार, त्याच्या ह्या नवीन उपक्रमांवरच, संक्रमित होऊन आरूढ होण्याची शक्यता असते.

आध्यात्मिक उन्नतीकरता, साधकाला हे दोन्हीहि अतिरेक टाळावे लागून, रचनात्मक क्रियाशीलतेचें जीवन चालू ठेवावें लागतें.

अध्यात्मपथावरील प्रगति ही तलवारीच्या धारेवर चालण्याप्रमाणे आहे.

अध्यात्मपथ आक्रमण करणें, म्हणजे खोगीर असलेल्या घोड्यावर बसण्यासारखें नसून, तलवारीच्या धारेवर चालण्यासारखें आहे. घोडेस्वार एकदा घोड्यावर बसला, की नंतर पुढच्या प्रगतीकरता, त्याला फारसें लक्ष द्यावें लागत नाही; व तो घोड्यावर आरामाने बसला तरी चालतें. पण, अध्यात्मपथावर चालतांना, अत्यंत दक्षतेने व काळजीपूर्वक लक्ष्य ठेवण्याची आवश्यकता असते. कारण, या मार्गांत, विश्रामस्थानें किंवा आहंकारिक जीवनविस्तारास कोणत्याहि दिशेने अवकाश देणाऱ्या जागा नाहीत. पथप्रविष्ट पथिक, आहे त्या जागीच थांबूं शकत नाही; व स्वतःचा तोलहि इकडे तिकडे जाऊं देऊं शकत नाही. हें तलवारीच्या धारेवर चालण्यासारखेंच आहे.

एका बाजूला निष्क्रियता व दुसऱ्या बाजूला कर्तृत्वाचा अभिमान, ह्या दोन्ही आपत्ति टाळण्याकरता, साधकाला, खाली वर्णिलेल्या रीतीने, सद्‌गुरूस पूर्णपणे वश असणारा, एक तात्पुरता व कामचलाऊ, नवीन अहम्भाव निर्माण करावा लागतो.

सद्‌गुरूस वश राहणाऱ्या नवीन अहम्‌ची रचना.

कोणताहि व्यवसाय सुरू करण्यापूर्वी, साधक असा विचार करतो, की तो स्वतः हें कार्य करीत नसून, सद्‌गुरूच तें त्याच्या द्वारां करून घेत आहे. आणि तो व्यवसाय पूर्ण झाल्यावर, तो त्याचें फल सद्‌गुरूला अर्पण करून मुक्त

होतो; व कर्मफलाचें कर्तृत्व स्वतःकडे घेण्यास किंवा कर्मफलाचा उपभोग घेण्यास, तो थांबत नाही. ही वृत्ति अंगांत बाणली, म्हणजे नवीन प्रकारचा अहम् ( ego ) निर्माण करण्यामध्ये, त्याला यश येतें; व हा अहम् जरी तात्पुरत्या व कामचलाऊ स्वरूपाचा असला, तरी तो खऱ्या क्रियाशीलतेमध्ये व्यक्त होणारा आत्मविश्वास, उत्साह व स्फूर्ति, यांचें उगमस्थान बनू शकतो. हा नवीन अहम्भाव अध्यात्मदृष्ट्या हानिकारक नसतो. कारण, त्याचें अस्तित्व व जीवन अनंततेचें प्रतिनिधित्व करणाऱ्या सद्गुरूमधून उदयास येतें; व योग्य वेळ आली, म्हणजे त्या अहम्भावाला, वस्त्राप्रमाणे फेकूनहि देतां येतें.

तेव्हा अहम् दोन प्रकारचा असतो. एक प्रकारचा अहम् केवळ आत्म्याचीं बंधनेंच वाढवीत जातो; व दुसऱ्या प्रकारचा अहम् विमोचनास मदत करतो. संसारासक्त मनुष्य जेव्हा, बंधनकारक अहंभाव सोडून, सीमातीत व निरहंकार जीवनांत प्रविष्ट होण्याचा प्रयत्न करतो, तेव्हा, त्याच्या मार्गांत, सद्गुरूमध्ये पूर्णपणे निष्ठावन्त असणाऱ्या अहंभावाची रचना होणे जरूर असते.**आध्यात्मिक उन्नतीच्या गतिप्रक्रिये(dynamics)मध्ये, सद्गुरूस पूर्णपणे वश असणाऱ्या नवीन अहंभावाच्या रचनेची अनिवार्य आवश्यकता आहे.**

साधकाला जीवनांतील सारा उत्साह अहंप्रेरित असण्याची सवय झाली असल्यामुळे, आहंकारिक क्रियाशीलतेमधून, अहंतारहित क्रियाशीलतेमध्ये, एकदम परिवर्तन करणें, त्याला कंटाळवाणें व अशक्य होतें. **अहंचेतनेचे सर्वच प्रकार अगदीच टाळावयाचे, असा एकदम आग्रह धरल्यास, साधकाला, एकतर निषेधात्मक क्रियाशून्यते (Negative passivity) चा आश्रय घ्यावा लागेल, व अशा क्रियाशून्यतेमध्ये आत्माभि-**

अहंकारशून्य जीवनामध्ये एकाएकी प्रवेश मिळणें शक्य नसतें.

व्यक्तीच्या आनंदास जागा राहणार नाही; किंवा, त्याला निर्जीव यंत्राप्रमाणे, केवळ निसर्गप्रेरित क्रिया कराव्या लागतील, व त्यांत आत्मतृप्तीचा अभाव राहील. साधकासमोर मुख्य प्रश्न असतो, तो हा की, त्याला सीमित अहंजीवन टाकून, अहंकाररहित जीवनाच्या अनंततेमध्ये प्रवेश करायचा असतो, पण असें करतांना, जीवनास ओहटी आणणारी गतिशून्य जडता टाळायची असते. अशा प्रकारच्या विमूढ जडतेमुळे, साधकाची अहंकारमय जीवनाच्या सीमाबद्धतेपासून, फार तर कांही कालपर्यंत, सुटका होईल. परंतु, केवळ जडतेच्याच द्वारा, साधक निरहंकार क्रियाशीलतेच्या अनंततेमध्ये, प्रवेश करूं शकत नाही. जडता किंवा मंदता, यांच्यामुळे सीमित जीवनाचा कोंडमारा होईल, पण अहंशून्य जीवनाची परिपूर्णता प्राप्त होणार नाही.

आध्यात्मिक उन्नति क्रमशः होत असते.

ह्याच कारणामुळे, बऱ्याचशा साधकांची आध्यात्मिक उन्नति क्रमाक्रमानेच होऊन, तिला बहुधा कित्येक जन्म घ्यावे लागतात. केव्हा केव्हा, साधकाने आध्यात्मिक उन्नतीचा बराच मोठा टप्पा गांठला असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. परंतु, या सर्व उदाहरणांमध्ये, एक तर साधकाने पूर्वीच्या जन्मांमध्ये केलेल्या आत्मोन्नतीची तो केवळ उजळणी व पुनःप्राप्ति (recapitulation) करीत असतो; किंवा, त्याला सद्‌गुरूचें विशेष सहाय्य मिळालेलें असतें. पण, साधारणतः सर्व उन्नति क्रमशःच व्हावी लागते. अभिमानाच्या जागीं नम्रता, उद्वेगपूर्ण वासनांच्या जागीं स्थैर्याने वाढत जाणारा संतोष, व स्वार्थपरतेच्या जागीं स्वार्थरहित प्रेम उत्पन्न होत असतांना, अहंकाराचें, निरनिराळ्या अवस्थांमधून, क्रमिक रूपांतर व्हावें

लागतें; व ह्याच रीतीने, सीमित अहंजीवन व सीमातीत अहंशून्य जीवन यांमधील महदंतर काटलें जाणें शक्य होतें.

सद्गुरूस पूर्णपणे वश असलेला अहंकार, अनिवार्यतः आवश्यक असून, आध्यात्मिकदृष्ट्या नुकसानकारक नसतो, इतकेंच नव्हे, तर तो साधकाच्या आध्यात्मिक उन्नतीला, प्रत्यक्षपणे पोषक होतो; कारण, त्याच्या द्वारा, निःस्वार्थ प्रेम व सेवा करून, साधक सद्गुरूच्या अधिकाधिक सन्निध जातो. यामुळे सद्गुरूचा आंतरिक सहवास त्याला प्राप्त होतो, व जी सहायता केवळ सद्गुरूच देऊं शकतो, ती मिळविण्याची त्याला संधि मिळते. जो साधक निरंकुश व भेदप्रवण अहंभावाचा त्याग करून, सद्गुरूसमोर शरणागति स्वीकारतो, तो या नवीन, सद्गुरूस वश असणाऱ्या अहंभावाच्या द्वारां, सद्गुरूचें साधन बनतो. वास्तविक पाहतां, सद्गुरूच त्याच्या द्वारां कार्य करीत असतो. ज्याप्रमाणे, कार्य करीत असताना, एखादें साधनीभूत उपकरण नादुरुस्त होऊं शकतें, त्याचप्रमाणे, साधकामध्येंहि, तो जगांत कार्य करीत असतांना, बिघाड उत्पन्न होण्याचा संभव असतो. वेळोवेळीं, उपकरणाची डागडुजी करावी लागेल, तें स्वच्छ ठेऊन व त्याची पुनर्घटना करून, त्याला दुरुस्तहि करावें लागेल. त्याचप्रमाणे, कार्य करीत असतांना, जर साधकाने नवीन विकृती, गुंतागुंत किंवा व्यक्तिपर अहमूची आश्रयस्थानें निर्माण केलीं, तर पुढच्या आध्यात्मिक प्रवासाकरता सामर्थ्य यावें, म्हणून त्या साधकासहि पुनः सुव्यवस्थित व सुकार्यक्षम बनविण्याची आवश्यकता असते.

अहंकार सद्गुरूच्या स्वाधीन झाला म्हणजेच सद्गुरूची मदत निश्चितपणे मिळूं शकते.

जो साधक गुरुसेवेच्या व्रताचा अंगिकार करतो, तो एकप्रकारचा सद्गुरूच्या हातांतील जगांतील घाण साफ करण्याचा फडा आहे.

घाण साफ करीत असतांना, फळ्यामध्येहि बरीच घाण सांठवली जाणारच; व वेळोवेळीं, त्या फळ्याला नवीन केलें नाही, तर कालांतराने त्याची कार्य-क्षमता कमी होत जाते. जेव्हा जेव्हा साधक सद्गुरूकडे जातो, तेव्हा तेव्हा, त्याच्याजवळ नित्य नवीन आध्यात्मिक समस्यांचा बोजा असतोच. कीर्ति, संपत्ति किंवा इतर सांसारिक आकर्षणामध्ये तो फसला गेला असेल. ह्या वस्तूंच्या मागे तो लागला, तर त्याला ह्या वस्तू मिळतील; परंतु, त्याला अत्यंत प्रिय असलेल्या परमात्म्याचा अनुभव त्याला मिळणार नाही. अशा प्रकारच्या आध्यात्मिक व्याधी केवळ सद्गुरूच्या हस्त-क्षेपानेच दुरुस्त होऊं शकतात. आध्यात्मिक व्याधी हरण कर-ण्याचें कार्य शस्त्रवैद्याच्या शस्त्रक्रियेप्रमाणे असतें. शस्त्रवैद्य रोग्याच्या प्राणशक्तीस घातक असलेल्या कारणांचें चिकित्सात्मक निदान चटकन करतो. जर माणसाला शारीरिक आधिव्याधी असतील, तर त्याने डॉक्टर किंवा शस्त्रवैद्य यांच्याकडे गेले पाहिजे; व जर त्याला आध्यात्मिक आधिव्याधी असतील, तर आध्यात्मिक उन्नतीच्या सर्व अवधीमध्ये, त्याने वारंवार सद्गुरुसमागमाचा आश्रय घेतला पाहिजे.

सद्गुरूचा सहवास वारंवार प्राप्त करून घेण्याची आवश्यकता.

ज्या अजेय मार्गांनी, सद्गुरु साधकाला वश करून घेतो, त्यांना जगरहाटीमध्ये तुलनाच नाही. पण, साधकाला जर सद्गुरूचें सहाय्य मिळवावयाचें असेल, तर त्याने सद्-गुरूच्या ईश्वरी इच्छेस शरण जाण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सद्गुरूला प्रथम आत्मसमर्पण करण्यामध्ये, साधकानें ज्या वैयक्तिक अहंकाराचा त्याग केला असतो, तो नवीन रूपांत, पुन्हा प्रगट होऊं शकतो. व साधकाने जो

जेव्हा जेव्हा व्यक्तिपर अहंकार पुनः जिवंत होतो, तेव्हा तेव्हा सद्गुरूप्रत नवीन शरणागतीची आवश्यकता असते.

सद्गुरूस वश असलेला, कृत्रिम अहंकार निर्माण केला असतो, त्यांत तो वैयक्तिक अहंकार शिरून, त्याच्या व्यवस्थित कार्यात गोंधळ व विघ्नें आणतो. तेव्हा, ह्या सीमित व वैयक्तिक अहंकाराच्या पुनरुत्थापनाचा प्रतिकार करण्याकरता, सद्गुरूप्रत नवीन शरणागतीची आवश्यकता असते. जेव्हा जेव्हा वैयक्तिक अहंकाराचें पुनर्जीवन होतें, तेव्हा तेव्हा, सद्गुरूस पुनरपि शरण जाण्याच्या त्यागपर प्रक्रियेची आवश्यकता असतेच.

एक शरणागति मागे टाकून, अधिकतर शरणागतीचा स्वीकार करणें, म्हणजे एक विजय मागे टाकून, महत्तर विजय मिळविणें होय. शरणागतींच्या अधिकाधिक पूर्ण प्रकारांमध्ये, जाणिवेच्या श्रेष्ठतर अवस्था व्यक्त होतात; कारण, त्यांच्या द्वारां, साधक व सद्गुरु यांच्यामध्ये, अधिकाधिक संवादित्व (harmony) प्रस्थापित होऊन, सद्गुरूचें सीमारहित जीवन, साधकाच्या द्वारां, वाढत्या विपुलतेमध्ये प्रवाहित होतें. आध्यात्मिक उन्नति, म्हणजे क्रमाक्रमाने एका शरणागतिरूप आत्मसमर्पणानंतर दुसरें शरणागतिरूप आत्मसमर्पण, अशा प्रकारच्या निरन्तरतेची कथा आहे. पृथग्भावरूपी अहंजीवनाचा अंतिम व पूर्ण परित्याग करण्याचें ध्येय गांठीपर्यंत ही प्रक्रिया चालूच राहते. हें अखेरचें समर्पण, म्हणजेच पूर्ण समर्पण असतें. ज्या मीलनांत, साधक सद्गुरूशीं पूर्णैक्य पावतो, त्याचीच ही उलट बाजू आहे. म्हणून, एका अर्थानें पाहता, सद्गुरूस अहंकारसर्वस्वाचें अर्पण करणें, म्हणजे आध्यात्मिक प्रगतिपथाचें ध्येय असलेल्या सत्याची प्राप्तीच होय.

अखेरचा त्याग म्हणजे पृथग्भावाचा त्याग होय.

---

# १४ : : : चांगलें व वाईट

मानवी मन अनुभव घेत राहतें, इतकेंच नव्हे, तर तें सारखें या अनुभवांचें महत्त्वमापनहि करीत असतें. कांही अनुभव प्रिय असतात, व कांही अप्रिय असतात; कांही सुख देतात, तर कांही दुःख देतात; कांही अनुभवांमध्ये आनंद असतो, तर कांहीमध्ये यातना असते; कांही अनुभवांमध्ये, मानवी जीवन संकुचित झाल्याचें आढळून येतें, तर कांही अनुभव परिपूर्णता व मुक्तता, यांच्याकडे नेणारे दिसतात; व कांही अनुभवांना चांगलें व काहींना वाईट मानण्यांत येतें. जेव्हा मानवी कल्पना कोणता तरी दृष्टिकोण घेऊन, जीवनाचा परामर्श घेते, तेव्हा ती अशा प्रकारचीं द्वंद्वें निर्माण करतें.

द्वंद्वांच्या द्वारा अनुभवांचें मूल्यमापन.

ग्राह्य काय व त्याज्य काय, याबद्दलच्या माणसाच्या कल्पना, ह्या त्याच्यामध्ये त्या विशिष्ट वेळीं, ज्या इच्छेचें प्राधान्य असतें, तिच्या गुणविशेषांना अनुसरून, वेळोवेळीं बदलत व उत्क्रान्त होत जातात. परंतु, जोंवर त्याच्या मनांत कोणत्याहि प्रकारची इच्छा आहे, तोंवर तो स्वतःच्या अनुभवाचें महत्त्व, त्या इच्छेच्या सापेक्षतेने

ग्राह्य व त्याज्य हे दोन्हीहि वासनासापेक्ष आहेत.

निश्चित करण्यास प्रेरित होतो; व तो स्वतःच्या अनुभवामध्ये, विभागणी करून, इच्छापूर्ती करणारा व म्हणून ग्राह्य, असा एक भाग व इच्छापूर्तीस विरोधक व म्हणून त्याज्य, असा दुसरा भाग करतो. जीवन व जीवनामधील सर्व गोष्टी यांच्याशीं संबद्ध न होतां, किंवा त्यांचा तिरस्कार न करतां, त्यांच्याशीं निरपेक्षतेने सम्मुख होण्याऐवजी, मन कोणता तरी एखादा मानदंड (standard) निर्माण करून, त्याच्या द्वारां जीवनाला दुभंग करतें; व त्यांतील एक भाग ग्राह्य होतो व दुसरा भाग त्याज्य होतो.

मन जीं नाना द्वंद्वें निर्माण करतें, त्यांमध्ये चांगलें व वाईट हें द्वंद्व सर्वांत अधिक महत्त्वाचें आहे. मनुष्यांतील वासनाबंधांतून मुक्त होण्याच्या वासनेवर तें आधारलेलें आहे. ज्या कृतींमुळे व अनुभवांमुळे, वासनाबंध दृढ होतात ते सर्व वाईट समजले जातात; व ज्या कृतींमुळे व अनुभवांमुळे, मन बंधनकारक वासनांपासून मुक्त होतें, ते सर्व चांगलें समजले जातात. परंतु, चांगल्या कृती व अनुभव, ह्यांचाहि वासनेशीच संबंध असल्यामुळे, वाईट कृती व अनुभव, यांच्याप्रमाणेच त्यांचेंहि बंधन होतें. सर्व बंधन नष्ट होण्याकरता, सर्व वासना नष्ट झाल्या पाहिजेत, व म्हणून, वासनाप्रेरित बद्ध जीवात्म्याच्या निवडीकरता, यत्किंचित अवकाश न ठेवतां, चांगलें व वाईट जेव्हा समतोल होऊन, एकमेकांत विलीन होतात, तेव्हांच खरी मुक्तता लाभते.

चांगलें देखील इच्छेला सापेक्ष असतें.

मानवी जाणीव पूर्णपणे अस्तित्वांत आली, म्हणजे तिच्यांत वाईट घटक असतातच; कारण उत्क्रान्ती (evolution) मधील उपमानव

(subhuman) अवस्थांमध्ये, जाणीव कामक्रोधलोभादि बंधनकारक प्रवृत्तींनीच प्रेरित होत असते.

अधिकांशाने वाईट असलेल्या पाशवी संस्कारांपासून मानवी जीवन सुरू होतें.

अशा अहंकेंद्रित प्रवृत्तींनी निर्माण होणाऱ्या अनुभवांचे व कृतींचे संस्काररूप ठसे वाढत्या मनावर उमटलेलेच असतात. सिनेमाफिल्मवरील नटांच्या अभिनयादि क्रियांच्या उमटण्याप्रमाणे, मनावरहि हे संस्कार आधीच सांचलेले असतात. म्हणून वाईट होणें सोपें असून, चांगलें होणें कठिण असतें. कांही पशूंमध्ये, स्वार्थत्याग प्रेम व तितिक्षा, या सद्गुणांची क्वचित् वाढ झालेली असली, तरी ज्या पशुजीवनांतून मानवी चेतना विकास पावते, तें बव्हंशी पाशवी कामवासना, पाशवी क्रोध व पाशवी लोभ, यांच्यामुळेच निर्धारित झालेलें असतें. सर्वच पशुसंस्कार वाईट असते व त्यांतील कांहीच चांगले नसते, तर मानवी चेतनेमध्ये, सत्प्रवृत्तींचा उदय होणें, अशक्यच झालें असतें.

कांही पशुसंस्कार चांगले असले, तरी बरेचसे वाईटच असतात; म्हणून, मानवी चेतनेंतील प्रारंभीची प्रेरक शक्ति बव्हंशी वाईटच असते. चांगले संस्कार, सांचलेल्या वाईट संस्कारांवर पूर्णपणे पसरून, त्यांच्यामुळे वाईट संस्कारांचा निरास व्हावा, म्हणून मानवी उत्क्रान्तीच्या प्रारंभापासूनच, चेतना विमुक्त करण्याची समस्या, म्हणजे उत्तम संस्कार वाढविण्याचा प्रश्न बनते. ज्या अनुभवांचें व कृतींचें पशुजीवनामध्ये प्राधान्य असतें, त्यांच्या विरुद्ध असलेल्या अनुभवांचा व कृतींचा परिपोष केला, म्हणजे चांगले संस्कार उत्पन्न होतात. कामाच्या विरुद्ध प्रेम, लोभाच्या विरुद्ध

चांगले संस्कार वाढविण्याची आवश्यकता.

औदार्य, व क्रोधाच्या विरुद्ध सहिष्णुता, यांच्या आचरणाने, मनुष्य काम, लोभ व क्रोध, यांच्या प्रवृत्ती निरस्त करूं शकतो.

संस्कारांच्या दास्यांतून मोकळे होण्याचा सामान्य क्रम, म्हणजे वाईट टाकून, चांगल्याचा स्वीकार करणें हा होय. परंतु, एखाद्या विशिष्ट वेळीं, मनुष्य चांगला राहील, की वाईट राहील, हें त्याच्या अनिवार्य संस्कारांच्या नियतीवर अवलंबून असतें. ह्या दृष्टीने पाहतां, विश्वांतील नियमांनीच नियत होऊन, कोणी पापी बनतो, तर कोणी पुण्यवान बनतो. पापी व पुण्यात्मा, यांचा दोघांचाहि प्रारंभ व अंत सारखाच असतो. साधूला स्वतःच्या नैतिक विजयाबद्दल अभिमान बाळगण्याची आवश्यकता नाही; व पाप्यावर अवनतीचें व अधमतेचें चिरंतन लांछनहि असण्याची आवश्यकता नाही. एखाद्या माणसांत कितीहि साधुत्व असलें, व त्याने सद्‌गुणराशीचें शिखरहि गांठलें असलें, तरी त्याला हें सर्व नैतिक दुर्बलतेच्या जीवनानंतरच साध्य झालेलें असतें. स्वतःची सुधारणा करून, स्वतःला कधीच चांगला बनवूं शकणार नाही, इतका वाईट कोणीच नसतो. अत्यंत दुराचारी मनुष्यहि हळूहळू सुधरत जाऊन, अखेरीस सर्व मानवांना आदर्श बनूं शकतो. सर्वांच्याबद्दल आशा करण्यास जागा आहेच. कोणीहि सर्वथैव पतित किंवा बेकाम नसून, कोणीहि हताश होण्याची आवश्यकता नाही; पण त्याबरोबरच हेंहि सत्यच आहे, की वाईटाचा त्याग करून, चांगल्याचा स्वीकार करण्याच्या द्वारांच, ईश्वरत्वाकडे नेणारा मार्ग पुढे जातो.

पापी व पुण्यात्मा.

चांगुलपणाचें क्रमिक अनावरण झालें, म्हणजे प्रेम, औदार्य व शांति प्राप्त होतात. व ह्या गुणांच्या अभिव्यक्तीने उत्पन्न होणारे उत्तम

संस्कार, तद्विरुद्ध असलेल्या, काम, लोभ व क्रोध, यांच्या वाईट संस्कारांना सर्वथा झाकतात, व तुल्यबल होतात. जेव्हा चांगले व वाईट संस्कार समभार व तुल्यबल होऊन, परस्परानुप्रवेश करतात, तेव्हा दोन्हीहि प्रकारचे संस्कार एकदम नष्ट होतात; व चेतना बंधनांतून मुक्त स्थितीमध्ये प्रविष्ट होते. हिशेब संपुष्टांत आणायचा असल्यास, जमाखातें व खर्चखातें, हीं ठीक बरोबरीचीं झालीं पाहिजेत. पण बहुधा खर्च तरी अधिक असतो, किंवा जमा तरी असते; व हिशेब चालूच राहतो. खर्च अधिक असल्याने हिशेब चालू राहतो, इतकेंच नव्हे, तर जमा अधिक असल्यानेहि हिशेब चालू राहतो, हें लक्षांत ठेवणें फार महत्त्वाचें आहे. दोन्हीहि बाजू समतोल झाल्या, तरच हिशेब बंद करतां येतो. पण संस्कारक्षेत्रांत अशा प्रकारचा समतोल क्वचितच घडून येतो. कोणत्याहि विशिष्ट वेळीं, एक तर वाईट संस्कारांचें प्राधान्य राहतें, किंवा चांगल्या संस्कारांचें प्राधान्य राहतें. व जमा किंवा खर्च अधिक असल्याने, हिशेब चालू राहतो, त्याप्रमाणे, वाईट किंवा चांगले संस्कार अधिक असल्याने, सीमित जीवभावाचें जीवन चालू राहून, पोषित होतें. वाईट संस्कारांप्रमाणेच, चांगल्या संस्कारांच्या द्वारांहि, सीमित अहंभाव जिवंत राहतो, व त्याचा पूर्ण व अंतिम उच्छेद होण्याकरिता, चांगले व वाईट संस्कार एकमेकांवर पडून ( overlap ), समभार ( balance ) झाले पाहिजेत.

वाईट संस्कारांप्रमाणेच, सीमित जीवभाव चांगल्या संस्कारांतहि निवास करतो.

चांगल्या व वाईट संस्कारांमध्ये समीकरण व समतोल करण्याचा प्रश्न हा केवळ दोन संख्यापरिमाणांना ( mathematical quantities ) समान करण्यापुरताच नाही. वाईट संस्कार उत्पन्न होणें

बंद किंवा मंद झाले, व त्याबरोबरच चांगल्या संस्कारांचा अविरत संचय केला, तर आज ना उद्या, चांगले संस्कार सांचलेल्या वाईट संस्कारांच्या बरोबरीचे होऊन समभार होतील. परंतु, चेतना विमुक्त होण्याकरता, चांगले व वाईट संस्कार समभार व तुल्यबल तर झालेच पाहिजेत, पण प्रत्येक बाबतींत व बिंदुबिंदूमध्ये ( point to point ), परस्परविरोधी द्वंद्वांनी एकमेकांना व्यापून टाकलें पाहिजे. तेव्हा प्रत्येक चेतनाकेंद्राची समस्या, गुणभेदांच्या विविधतेप्रमाणे, स्वतंत्र समस्या असते.

चांगल्या व वाईट संस्कारांचें समीकरण व त्यांचा परस्परानुप्रवेश.

चांगल्या संस्कारांचा संग्रह होत असतांना; प्रस्तुत संस्कारांचे गुणविषयक घटनावैशिष्ट्य ध्यानांत घेतलें गेलें नाही, तर एका बाजूला, चांगल्या संस्कारांचें विशिष्ट दिशेने आधिक्य प्राप्त झालें, तरी दुसऱ्या बाजूला, निराळ्या प्रकारचे वाईट संस्कार राहूं शकतात. उदाहरणार्थ,आत्मपीडन ( self-mortification ) किंवा खडतर तपश्चर्या, यांच्या द्वारा, कांही प्रकारच्या आसक्तींचें निराकरण होईल; परंतु, अशा अभ्यासाने अन्य प्रकारच्या आसक्तींना धक्काहि बसणार नाही व त्या कायमच राहण्याचा संभव आहे. या, वांचून राहिलेल्या आसक्तिप्रकारांकडे, साधकाचें दुर्लक्ष्य होण्याचा संभव असतो, इतकेंच नव्हे, तर हाच आत्मपीडनाचा व तपाचा अभ्यास, तज्जन्य संस्कारांच्या गतिमत्तेमुळे, पुढेहि चालूच ठेवण्याचा संभव असतो. या सर्व बाबतींत, चांगल्या संस्कारांचें आधिक्य निर्माण होऊनहि, सीमित 'अहं' चा अंत होत नाही. व नंतर, वांचून राहिलेल्या आसक्तिप्रकारांचे जरी निराकरण

अहंभावाचे सत्प्रवृत्तींमध्ये स्थित्यंतर.

झालें, तरी अहंभाव या नवीन, चांगल्या संस्कारांवर आरूढ होऊन, त्यांच्या द्वारा जिवंत राहतो.

मुक्ति म्हणजे केवळ सद्गुणांचा संग्रह नव्हे; मुक्तीकरता संस्कारांचें कुशल व्यवस्थापन (intelligent adjustment) झालें पाहिजे. सत्यानुभूतीच्या मुक्तावस्थेकडे, प्रत्येक चेतनाकेंद्र न कळत आकर्षण पावत असून, आध्यात्मिक दृष्टीने, ज्या द्वंद्वांची आवश्यकता असते, तेंच स्वतःवर ओढून, घेण्याची प्रवृत्ति मनामध्ये निसर्गतःच असते. परंतु, ही प्रक्रिया यंत्रवत् व स्वभावप्रेरित (automatic) नसून, ती साधकाच्या बुद्धिपुरस्सर सम्यक्प्रयत्नांवर अवलंबून असते. बहुधा, साधकांला, स्वतःकरतां वास्तविकपणें काय आवश्यक आहे, हें उमगत नाही. त्याकरता गुरूचें नित्यप्रभावी साहाय्य पाहिजे, कारण, सद्गुरूला साधकास विशिष्ट परिस्थितीमध्ये काय आवश्यक आहे, याचें यथार्थ व प्रत्यक्ष ज्ञान असतें.

संस्कारांच्या कुशल व्यवस्थापनेची आवश्यकता.

चांगले संस्कारहि रेंगाळणाऱ्या जीवभावाचे माध्यम बनूं शकतात, हें वर स्पष्ट झालेंच आहे. मनुष्य जेव्हा स्वतःला मी वाईट नसून चांगला आहे, असें मानतो, तेव्हा तो द्वंद्वाच्या द्वारा अहंप्रतिष्ठापन (self-affirmation) करीत असतो. एक सोडून, तो दुसऱ्याशीं तादात्म्य पावतो; व स्वतःची पृथक् सत्ता (separative existence) कायम ठेवतो. केव्हा केव्हा, 'अहं' चें हें स्वयंनिर्मित गृह मोडून टाकण्यास अधिक दुष्कर असतें; कारण वाईटाशीं होणाऱ्या तदात्मकतेपेक्षा, चांगल्याशीं होणारी तदात्मकता (self-

सद्गुणांचा पिंजरा.

identification) अधिक पूर्णपणें होत असते. वाईटाशीं झालेलें तादात्म्य अधिक सुलभतेने निस्तरता येतें. वाईटाचा वाईटपणा ध्यानांत आल्याबरोबर, वाईटाची चेतनेवरील मगरमिठी शिथिल होते. परंतु, चांगुलपणाची मगरमिठी शिथिल होणें दुष्प्राप्य असतें; कारण, वाईटाशीं असणाऱ्या चांगुलपणाच्या संतोषदायी वैधर्म्यामुळे, चांगुलपणामध्ये आत्मसमर्थना(self-justification) चा आभास असतो. परंतु कालांतराने, साधकाला या नवीन कारागृहाचाहि कंटाळा येतोच; व हें दिसून आलें, म्हणजे तो चांगल्यावाईटाच्या द्वंद्वांच्या पलीकडे जाऊन, स्वतःच्या निराळ्या अस्तित्वाचें व पृथग्भावाचें विसर्जन करतो.

वाईटाशीं तद्रूप होण्याचें घर सोडून, चांगल्याशीं तद्रूप होण्याच्या नवीन घरांत, 'अहम्' स्थापित होण्याचें मुख्य कारण, म्हणजे त्याला त्यांत अधिक विस्तारा ( expansion ) चा अनुभव येतो. तरी, आज ना उद्या, साधकाला हें नवीन गृहहि बंधनकारकच असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. परंतु, हें नवीन गृह मोडून टाकणें, त्याला वाईटाशीं तद्रूप होण्याच्या गृहापेक्षा, कमी कठीण जातें. वाईटपणाच्या गृहासंबंधीची अडचण, मुख्यतः तें बंधनरूप आहे, हें ओळखण्याच्या बाबतींत नसून, ओळखल्यानंतरहि तें जमीनदोस्त करण्यामध्ये आहे; आणि चांगुलपणाच्या गृहासंबंधीची अडचण, मुख्यतः तें उखडून टाकण्याच्या बाबतींत नसून, तें वस्तुतः बंधनच आहे, हें ओळखण्याच्या बाबतींत आहे. हा फरक होण्याचें कारण असें आहे की, पाशवी संस्कारांचा उगम फार पुरातन असून, त्यांचा संग्रह अधिक कालपर्यंत होत आलेला असतो,

चांगले व वाईट याची तुलना.

व त्यामुळे ते अधिक दृढमूल बनले असतात. परंतु, चांगुलपणाची शृंखला, ही तिची जखडून टाकण्याची शक्ति ओळखल्यावर तोडण्यास अधिक सुलभ असली, तरी बंधनकारकच असते, हें लक्ष्यांत ठेवणें फार महत्त्वाचें आहे.

वाईट संस्कारांच्या द्वारा, किंवा चांगल्या संस्कारांच्या द्वारा, किंवा त्यांच्या संमिश्रणाच्या द्वारा, 'अहम्' ( ego ) जिवंत राहतो. म्हणून चेतनेचें सर्व संस्कारांपासून विमोचन होण्याकरता, चांगल्या संस्कारांनी वाईट संस्कारांना आच्छादून ( overlapping ), ते त्यांच्याशीं समभार झाले पाहिजेत; किंवा कांही चांगले संस्कार कांही वाईट संस्कारांवर, व कांही वाईट संस्कार कांही चांगल्या संस्कारांवर पडून, त्यांच्याशीं तुल्यबल ( balancing ) झाले पाहिजेत. भांडें घाण असेल, तर ते स्वच्छ करण्याकरता, त्याला प्रथम साबणाने घासून, नंतर पाण्याने धुतां येते. ही प्रक्रिया वाईट संस्कारांवर चांगल्या संस्कारांचें आवरण घालण्यासारखी आहे. परंतु भांड्याच्या घाणींत चिकटपणा असेल, तर तो चिकटपणा जाण्याकरता, त्या भांड्याला प्रथम माती लावून, नंतर धुवावे लागते. मातींत चिकटपणा मुळीच नसतो व ती चिकटपणाला विरुद्ध व मारक असते; म्हणून, चिकट भांड्याला मातीचा लेप दिल्यावर, तें लवकर स्वच्छ होतें. हें चांगल्या संस्कारांना वाईट संस्कारांनी आच्छादून टाकण्यासारखें आहे.

चांगल्या व वाईट संस्कारांच्या परस्परानुव्यापीला दृष्टान्त.

ज्यावेळीं चांगले व वाईट संस्कार एकमेकांना व्यापून (overlapping) समभार होतात, तेव्हा ते दोन्हीहि नाहीसे

होतात; जिच्यावर कांहीच लिहिलेलें नाही, अशी मनःस्थितीची कोरी पाटीच शिल्लक राहते; व ह्या अवस्थेंत, सत्याचे विकृतिरहित प्रतिबिंब पडतें. प्रत्यक्ष आत्म्यावर कोणतेच छाप बसत नसतात. सर्व संस्कारांची रचना

अनुभूतीची अवस्था संस्कार-रहित असून, चांगल्या-वाईटाच्या पलीकडे असते.

आत्म्यावर होत नसून, मनावर होत असते. आत्मा हा नित्य शुद्धच असतो, पण जेव्हा मन स्वच्छ आरशाप्रमाणे होतें, तेव्हाच त्याच्यांत सत्य प्रतिबिंबित होतें. चांगल्यावाईटाच्या समग्र संस्कारांचा लोप झाला, म्हणजे मनाला आत्मदर्शन होतें. ही ज्ञप्ति (Illumination) आहे. पण आत्मा, हा मनाहून भिन्न व मनापलीकडचा परमात्मा असल्यामुळे, मनाला आत्मदर्शन होणें व आत्म्याला स्वानुभूति होणें, ह्या गोष्टी एकमेकांहून निराळ्या आहेत. सत्यस्वरूप आत्म्याला जर स्वतःचें यथार्थ ज्ञान करून घ्यावयाचें असेल, तर मनाला आत्मदर्शन झाल्यानंतरहि, तें मन आत्म्यांत लय पावलें पाहिजे. हीच स्वानुभूति होय. ह्या अवस्थेंत, चांगल्या व वाईट संस्कारांसह, मनच विलुप्त होऊन जातें. ही पापपुण्यातीत व मनापलीकडील अवस्था आहे. ह्या अवस्थेच्या दृष्टीने, अनंत प्रेम, शांति, आनंद व ज्ञान यांचा जणू सागरच, अशी एकच अविभाज्य सत्ता राहते. ह्या अवस्थेंत, चांगलेंहि राहात नाही, व वाईटहि राहत नाही, तर या दोहोंचा समावेश करणारें, खंडरहित परमात्मजीवनच उरतें. व म्हणून या अवस्थेमध्ये, चांगल्यावाईटांमधील निरंतर संग्रामाचा अंत होतो.

---

# १५ : परमेश्वराचें अंतरहित प्रेमस्वरूप

जे लोक ईश्वराला, केवळ बुद्धीच्या द्वारा, जाणण्याचा प्रयत्न करतात, त्यांना ईश्वराच्या स्वरूपाविषयी, एखादी निर्जीव व रूक्ष कल्पना करण्यापलीकडे यश मिळत नाही; व अशा कल्पनेमध्ये, ईश्वरस्वरूपाचें खरें सार ग्रहण केलें जात नाही. परमात्म्याच्या स्वरूपांत, अनंत ज्ञान, अनंत अस्तित्व, अनंत शक्ति व अनंत आनंद यांचा समावेश होतो, हें खरें आहे. पण जोंपावेतों, परमेश्वराचे अंतरहित प्रेमस्वरूप समजलें नाही, तोंपावेतों, त्याची खरी ओळख पटली, असें आपणास म्हणतां येत नाही. ज्या परात्पर स्थितीमधून, सर्व विश्वाचा उगम होतो व जिच्यांत त्याचा लयहि होतो, त्या स्थितीमध्यें, परमेश्वर हा सदाचा अनंत प्रेमस्वरूपच आहे. जेव्हा ईश्वरीय प्रेम, मध्येंच उत्पन्न होणाऱ्या भ्रमरूप द्वैतमय सृष्टींतील नामरूपात्मक साच्यांत पाहिलें जातें, तेव्हाच त्या प्रेमाची अनंतता भंग पावल्याचा भास होतो.

प्रेम हेंच ईश्वराचें सार आहे.

ईश्वराचे प्रेम जेव्हा नामरूपात्मक विश्वांत अभिव्यक्त होऊन, स्वतःचा अनुभव घेतें, तेव्हा तें खालील तीन अवस्थांतून जातेंः—

(१) प्रेम, प्रथम स्वतःच्या आत्यंतिक सीमाबद्धतेचा अनुभव घेते, नंतर (२) प्रेमाची स्वतःची मर्यादितता कमी कमी होत जाऊन, तें अधिकाधिक अंतरहित प्रेमासारखे बनत असल्याचे अनुभवास येतें, व अखेरीस (३) प्रेमाचें जें वस्तुतः व तत्त्वतः अनंत स्वरूप आहे, तें जसेच्या तसें अनुभवास येतें. संस्कारजन्य अज्ञानामुळेच, प्रेम सीमित झाल्याचा अनुभव येतो; व हे संस्कार चेतनाविकासाचे पार्श्वपरिणाम ( side-products ) असतात. प्रेम अनंत होण्याच्या क्रमांत, हे संस्कारबंध क्रमशः गळून जातात.

अभिव्यक्त प्रेमाचा विकासक्रम.

धातुमय जगतांतील, जवळ जवळ अचेतन स्थिति पार केल्यावर, प्रेम पशुयोनींतील कामवासनेच्या स्वरूपांत अभिव्यक्त होऊन, स्वतःचा त्या स्वरूपांत अनुभव घेते. मानवी जाणिवेंत सुद्धां, प्रेमाचे प्रथम प्रादुर्भवन कामवासनेच्या स्वरूपांतच होते. कामवासना, हे मानवी चेतनेतील प्रेमाचें अत्यंत मर्यादित स्वरूप आहे. कामवासनेमध्ये, इतर व्यक्तींचा स्पष्ट संबंध अभिप्रेत असला, तरी ती मुळांतच केवळ निर्भेळ स्वार्थपरता आहे; कारण, ज्या ज्या विषयांवर ती आसक्त होते, ते सर्व विषय पृथक् जीवभावाच्या दृष्टीनेच व पृथक् अहंजीवनाकरताच कमनीय बनतात. पण असे असले, तरी कामवासना हें एक प्रेमाचेंच रूप आहे, कारण, तिच्यांत दुसऱ्या व्यक्तीबद्दल एक प्रकारची गुणग्राहकता ( appreciation ) असतें. पण ही गुणग्राहकता खऱ्या आत्मतत्त्वाबद्दलच्या घोर अज्ञानामुळे, पूर्णपणे दूषित व विकृत झाली असते.

प्रेमाची कामवासनेच्या रूपांत अभिव्यक्ति.

मानवी चेतना जेव्हा स्थूल जगताच्या द्वैतांत फसलेली असते, तेव्हा प्रेम कोणत्यातरी प्रकारच्या विषयवासने (lust) च्या रूपांतच व्यक्त होऊं शकते; दुसऱ्या रूपांत व्यक्त होऊ शकत नाही. माणसाला कढी आवडते, कारण तींत जिभेचे चोचले पुरविले जातात. ह्यांत उच्चतर विचारांचा अभाव असल्यामुळे, हा विषयवासनेचाच एक प्रकार आहे. ती रसनेची स्वादसंवेदनेची तृष्णा आहे. त्याचप्रमाणे, मनाला शब्दस्पर्शरूपगंधादि इंद्रियसंवेदनांच्या रसास्वादनाची तृष्णा असते. व ह्या संवेदनेने होणाऱ्या उत्तेजना ( excitement ) च्या द्वारां मन कनिष्ठ प्रकारच्या अहंजीवनाचा परिपोष करते. कोणत्याहि प्रकारची विषयवासना घेतली, तरी ती आंतील आत्मतत्त्व सोडून, स्थूलरूपाशीं संबद्ध होत असते. ती केवळ इंद्रियांच्या पदार्थांवरील आसक्तीचें रूप आहे; व सर्व प्रकारच्या विषयवासनेमध्ये, हृदय अतृप्त व अनभिव्यक्त ( unexpressed ) रहात असल्यामुळे, त्यांत चिरस्थायी रिक्तता ( emptiness ) उत्पन्न होऊन, विफलता व दुःख यांचा सतत अनुभव येतो.

स्थूल जगतांतील प्रेम

शंभर टक्के किंवा निर्भेळ विषयवासनेच्या स्वरूपांत, जेव्हा प्रेम अभिव्यक्त होतें, तेव्हा तें अत्यंत सीमित असतें, कारण तें निरन्तर तृष्णेच्या कचाट्यांत सांपडलेलें असते. अंतःकरणावर, जेव्हा विषयवासनेची पकड बसते, तेव्हा आत्म्यावर एक प्रकारची भ्रमरूपी झांपड पडते. अज्ञानबंधनामुळे अंतःकरणाचे व्यापार घटतात, व दूषितहि होतात; त्याच्या श्रेष्ठतर क्षमतां ( potentialities ) ना, अभिव्यक्ति व परिपूर्णता

निर्भेळ विषयवासना ही अत्यंत ससीमतेची स्थिति आहे.

(fulfilment) मिळत नाही, आणि आत्मजीवना (life of the spirit) ची जी ही अवरोधनरूप गळचेपी होते, तिच्यामुळे घोर बद्धावस्था अवश्य निर्माण होते.

विषयवासनेमध्ये अनंततेचें आत्मप्रतिष्ठापन अप्रत्यक्ष असते.

अज्ञानशृंखलेमध्येच क्रियाशील होणाऱ्या प्रेमाचे विषयवासना एक अत्यंत सीमित स्वरूप आहे. परंतु, विषयवासनेवर अपर्याप्ततेचा जो स्पष्ट शिक्का मुद्रित असतो, त्यावरून ती कोणत्यातरी विशाल, अनंत व गंभीरतर तत्त्वाची अपूर्ण व व्यंगपूर्ण अभिव्यक्ति आहे, हें स्पष्टपणें सूचित होतें.

प्रेमीच्या तीन अवस्था.

स्थूल क्षेत्रांतील अत्यंत हीन काममय जीवनांत देखील, ईश्वर स्वतःचा प्रेमी म्हणूनच अनुभव घेत असतो; पण त्या प्रेमीला, स्वतःच्या व प्रियतमाच्या खऱ्या स्वरूपाविषयी अज्ञान असते. त्या स्थितींत, प्रेमी प्रियतमापासून, ज्याचें स्वरूप अद्याप मुळीच आळखले गेले नाही, अशा द्वैतरूपी अपारदर्शक पडद्यामुळे, विलग्न केला गेला असतो; तरी, ही स्थिति, म्हणजे ज्या विकासक्रमाने, प्रेमी अज्ञानाचे आवरण तोडून, स्वतःच्या असीम व अनिरुद्ध प्रेमाची सत्यता अनुभवतो, त्या विकासक्रमाची सुरुवातच असते. परंतु, अनंत प्रेमांत प्रविष्ट होण्याकरता, प्रेमीला सूक्ष्म (subtle) व मनोमय (mental) जगतांतील, अशा आणखी दोन अवस्थांतून जावें लागतें.

सूक्ष्म क्षेत्रांतील प्रेम कामरहित नसतें; पण ही कामवासना, स्थूल क्षेत्रांतील कामवासनेप्रमाणे, निर्भेळ किंवा अमिश्रित नसते. सूक्ष्म

क्षेत्रांतील कामाची तीव्रता, ही स्थूल क्षेत्रांतील कामाच्या जवळ जवळ निम्मी असते. शिवाय स्थूल क्षेत्रांतल्याप्रमाणे, सूक्ष्म क्षेत्रांत, कामाला स्थूल अभिव्यक्ति (gross expression) मिळत नाही. स्थूल जगांतला प्रेमी जड पदार्थांशीं संबद्ध असतो; व म्हणून, त्याचा काम स्थूल रूपाने व्यक्त होतो. पण सूक्ष्म क्षेत्रांतील प्रेमीची जड पदार्थांवरील आसक्ति गळून गेली असल्यामुळे, त्याचा काम स्थूल रूपांत अनभिव्यक्त राहतो. त्याच्या कामवासनेला सूक्ष्म प्रादुर्भवन मिळते, परंतु स्थूल अभिव्यक्ति मिळत नाही. शिवाय, जड जगतांतील कामवासनेच्या जवळ जवळ अर्ध्या भागाचे सूक्ष्म क्षेत्रामध्ये उन्नयन किंवा उदात्तीकरण (sublimation) होत असल्यामुळे, सूक्ष्म क्षेत्रांतील प्रेमीला, स्वतःचे प्रेम अमिश्रित कामवासनेच्या स्वरूपांत अनुभवास न येतां, तें प्रेम तो प्रियतमाशीं ऐक्य पावण्याच्या आकांक्षे (longing) च्या स्वरूपांत अनुभवतो.

सूक्ष्म क्षेत्रांतील प्रेम.

ह्या प्रमाणे, स्थूल क्षेत्रांत, प्रेम कामरूपाने व्यक्त होतें; व सूक्ष्म क्षेत्रांत तें आकांक्षे (longing) च्या रूपाने व्यक्त होते. काम ही इंद्रियसंवेदने (sensations) करता तृष्णा आहे; व म्हणून, त्याचा हेतु पूर्णपणे स्वार्थपर असतो. त्यांत, प्रियतमाच्या कल्याणाबद्दल, यत्किंचित्‌हि आस्था नसते. पण आकांक्षेमध्ये, स्वार्थाचे प्रमाण कमी असते; व आकांक्षादेखील, एकप्रकारे ग्रहणशील (possessive) असली, तरी तिच्यामध्ये प्रियतमाचें स्वतःचें महत्त्व व त्याचा गौरव, यांची साक्ष पटलेली असते. कामवासनेपेक्षा, आकांक्षा प्रेमाचें कमी सीमित स्वरूप आहे. आकांक्षेमध्ये, द्वैतरूपी पडदा अधिक पारदर्शक व कमी

आकांक्षेच्या रूपांत प्रेम.

अवरोधक बनतो; कारण, आकांक्षेमध्ये, प्रियतमाचे सान्निध्य संपादन करून, प्रेमी व प्रियतम यांच्यामधील द्वैतावर, विजय मिळविण्याचा ज्ञानपूर्वक प्रयत्न होत असतो. कामवासनेंत, सीमित अहंतेलाच महत्त्व असतें; व प्रियतमाला आहंकारिक स्थूल गरजांच्या पूर्तीचें साधन म्हणून, गौण स्थान असतें. पण आकांक्षेंत, अहंतेला व प्रियतमाला समान महत्त्व मिळून, प्रियतमाचें अस्तित्व ज्याप्रमाणे स्वतःकरता आहे, त्याचप्रमाणे स्वतःचें अस्तित्वहि प्रियतमाकारिताच आहे, ही जाणीव प्रेमीला असते.

मनोमय क्षेत्रांतील प्रेमीच्या प्रेमाची याहूनहि श्रेष्ठतर व मोकळी अभिव्यक्ति होत असते. त्याच्याहि बाबतींत काम पूर्णपणें नष्ट झालेला नसला, तरी त्याचे बव्हंशीं उदात्तीभवन ( sublimation ) झालेलें असतें. मूळच्या स्थूल क्षेत्रांतील कामवासनेंतून, जवळ जवळ एक-चतुर्थांश कामवासना उरलेली असते; पण ती सुप्तच राहून, कोणत्याहि स्वरूपांत व्यक्त होत नाही. मनोमय क्षेत्रांत, कामाला सूक्ष्म अभिव्यक्तिहि मिळत नाही. मनोमय क्षेत्रांतील प्रेमी सूक्ष्म पदार्थांविषयींही अनासक्तच राहतो; व तो सूक्ष्म जगांतील प्रेमीच्या प्रियतम प्रियतम-प्राप्तीच्या ग्रहणशील लालसेपासून मुक्त होतो.

मनोमय क्षेत्रांतील प्रेमी.

मनोमय क्षेत्रामध्ये, प्रेम प्रियतमाच्या इच्छेचा पूर्ण स्वीकार करण्याच्या द्वारा व्यक्त होतें; त्याच्यांत प्रियतमाच्या सान्निध्याची व तशीच इतर सर्व प्रकारची लालसा लुप्त झाली असते. आता, प्रियतमाच्या गौरवाला व इच्छेलाच प्रधानता दिली जाते; व स्वार्थपरतेचें पूर्ण प्रक्षालन होऊन, शुद्ध स्वरूपांत, प्रेमाचें यथेष्ट विमोचन होतें.

प्रेमाची शरणागतीच्या रूपांत अभिव्यक्ति.

परंतु, मनोमय क्षेत्रांत सुद्धा, द्वैताचा पातळ पडदा, प्रेमी व प्रियतम यांना विलग करीत असतो; व म्हणून, प्रेम अनंत बनत नाही. आता, प्रेम स्वार्थपरतेच्या पंजांत सांपडलेलें नसतें. परंतु ज्याप्रमाणे, खालील क्षेत्रांत, प्रेम जडसूक्ष्म देहांच्या माध्यमांतून अनुभविलें जातें, त्याचप्रमाणे मनोमय क्षेत्रामध्ये, तें प्रेम सीमित मनाच्या द्वारा अनुभाविलें जातें. व म्हणून, तें अजूनहि अंतरहित झालेंच नसतें.

व्यष्टिमन समाक्रान्त (transcend) झालें, म्हणजे प्रेमाला जाणीवयुक्त अनंतसत्ताविस्तार व अभिव्यक्ति प्राप्त होते. ज्या स्थितीमध्ये, द्वैतावर पूर्ण विजय मिळविला असतो, अशा परमात्मस्थितींतील ह्या प्रेमालाच, ईश्वरीय प्रेम अशी संज्ञा देतां येईल. ईश्वरीय प्रेमामध्ये, विषयवासनेचा लेशहि शिल्लक राहिला नसतो; त्या प्रेमामध्ये, विषयवासना सुप्तस्वरूपांतहि राहत नाही. मूलतः व अभिव्यक्तीमध्येहि, ईश्वरीय प्रेम सीमातीत असतें; कारण आतां, आत्मा स्वतःच्याच द्वारां त्या प्रेमाचा अनुभव घेतो. जडसूक्ष्म व मनोमय क्षेत्रामध्ये, प्रेमीला आपण स्वतः प्रियतमापासून अलग असल्याची जाणीव असते; परंतु, ह्या सर्व क्षेत्रांचें संक्रमण केल्यावर, प्रेमीला प्रियतमाशीं असलेल्या स्वतःच्या ऐक्याची जाणीव प्राप्त होते. प्रेमी, हा प्रियतमाच्या सत्ताविस्तारांत लय पावून, आपण स्वतः त्या प्रियतमाशीं एकरूप आहोत, हें जाणतो. ईश्वरी प्रेमांत, सीमित अहंकाराचें किंवा वासनांचें दास्य नसतें. या अंतरहित स्थितीमध्ये, प्रेमीला प्रियतमाहून निराळें असें स्वतंत्र अस्तित्वच उरत नसून, तो स्वतः प्रियतमच बनतो.

ईश्वरीय प्रेमाला अंतच नाही.

याप्रमाणे, ईश्वराचें अंतरहित प्रेमस्वरूप, प्रथम रूपमय सृष्टीमध्ये

स्वतःस ससीम करते; व नंतर, सृष्टीच्या निरनिराळ्या अवस्थांमधून, स्वतःची अनंतता पुनः प्राप्त करते. सीमित प्रेमी असल्याच्या अनुभवाच्या सर्व अवस्थांचें संक्रमण होत जाऊन, अखेरीस ईश्वर स्वतःला एकमात्र प्रियतम ( sole beloved ) असल्याचें अनुभवतो.

दैवी प्रेमलीला.

आत्म्याचा प्रवास, म्हणजे एक अद्भुतरम्य व दिव्य प्रेमलीला आहे. ज्या प्रेमीला सुरवातीस केवळ रिक्तता, विफलता, फोलपणा व जखडून टाकणाऱ्या बंधनशृंखला, यांचीच जाणीव असते, त्यालाच क्रमाक्रमाने, प्रेमाची अधिकाधिक पूर्ण व मुक्त अभिव्यक्ति लाभते; व अखेरीस, तो प्रेमी दिव्य प्रियतमा (divine beloved) मध्ये, लय व अंतर्धान पावून, परमश्रेष्ठ व चिरंतन सत्य असलेल्या ईश्वराच्या अंतरहित प्रेमस्वरूपामधील प्रेमी व प्रियतमाच्या मूलभूत ऐक्याचा त्याला आत्मप्रत्यय येतो.



भाग १ ला

## साधक व ईश्वरप्राप्त पुरुष

ईश्वरानुभूतीपूर्वीहि, उन्नत साधकांना ज्या अवस्थांचा अनुभव घ्यावा लागतो, त्या, कांही बाबतींत, ईश्वरानुभूती ( God-realisation ) सारख्या असतात. उदाहरणार्थ, उन्मत्त स्थितींतील 'मस्त' व उच्च भूमिकेंत आरूढ झालेले संतगण, हे पूर्णपणें निःस्पृह असून, ईश्वरोन्मादाच्या आनंदांत मग्न असतात. त्यांचें सर्व लक्ष्य ईश्वराकडेच असतें; म्हणून, आनंदरूप ईश्वरी अवस्थेप्रमाणेच, तेहि अद्वितीय आनंदाचे भागीदार बनतात. ईश्वराशिवाय त्यांना दुसरा प्रियतम नसतो; व ईश्वराव्यतिरिक्त त्यांना आणखी दुसरी कशाचीहि इच्छा नसते. त्यांच्या दृष्टीने, ईश्वर हा एकमात्र प्रियतम असतो, इतकेंच नव्हे, तर त्यांच्याकरिता, ईश्वर हीच एकमात्र सत्य व महत्त्वपूर्ण वस्तु असते. ईश्वर सोडून इतर सर्व वस्तुजाताबद्दल, ते अनासक्त राहतात; व जगांतील इतर माणसांप्रमाणे, ते सुखदुःखांच्या आघातांनी विकल होत नाहीत. आनंदाचा सागरच असलेल्या आपल्या ईश्वरी प्रिय-

ईश्वरोन्मादाचा आनंद.

तमाशीं सर्व काल सम्मुख असल्यामुळे, तेहि आनंदमयच असतात.

उन्नत साधकांना दैवी अवस्थेंतील कांही विशेष अनुभव तर मिळतातच; परंतु, त्याबरोबरच, त्यांना महान गुप्त शक्ति किंवा सिद्धीहि प्राप्त असतात. ह्या नियंत्रित शक्तींच्या प्रकाराप्रमाणेच, त्या शक्ति मिळविलेल्या साधकांच्याहि भिन्न भिन्न श्रेणी आहेत. उदाहरणार्थ, प्रथम भूमिकेवर, साधकाला सूक्ष्म जगतांतील प्रकाश, रंग, सुवास व संगीत यांचा अनुभव येतो. जे याहून पुढे जातात, त्यांना दूरवरच्या गोष्टी दिसतात व ऐकूं येतात. कांही साधकांना, सर्व स्थूल सृष्टि मृगजलवत् भासते. कांही उन्नत साधक, मृत्यूनंतर, एकदम दुसरें नवीन शरीर धारण करतात. सद्गुरूच्या कांही कार्यकर्त्यां (agents) चा स्थूल जगावर इतका ताबा असतो, की ते स्वेच्छेने देह बदलूं शकतात; त्यांना सूफी परंपरेमध्ये 'अब्दल' म्हणतात. परंतु, साधकांच्या या सर्व सिद्धींचा संबंध भासमान (phenomenal) जगताशींच असून, त्यांचा व्यापार भ्रममय क्षेत्रांत होत असतो. जे असाधारण चमत्कार हे साधक करतात, त्यावरून, ते ईश्वरावस्थेच्या अधिक जवळ असतातच, असें मात्र सिद्ध होत नाही.

उन्नत साधकांचे सामर्थ्य.

चेतनास्थितीच्या दृष्टीनेहि, साधकांचे ते ज्या मार्गांनी पुढे गेले असतील, व ज्या प्रमाणांत ईश्वरावस्थेच्या सन्निध गेले असतील, त्यावरून निरनिराळे प्रकार पडतात. कांहींना, आपल्या असाधारण शक्तींचा मद चढून, व त्या शक्तींचा उपयोग करण्याच्या सोहास वश होऊन, ते आपल्या ईश्वराकडील प्रगतिपथावर, बराच वेळ विश्रान्ति घेतात. मधील भूमिकांच्या चेतना-

साधकांच्या भिन्न अवस्था.

वस्थेंतच ते अटकून जातात. कांही साधक चकित होतात, गोंधळून जातात किंवा आत्मसंभ्रमांत फसतात. कांही एखादी शारीरिक क्रिया पुनःपुनः करून, किंवा एखादें विशिष्ट वाक्य अनेक वेळां उच्चारून, तद्वारां स्थूल जाणिवेंत उतरण्याचा प्रयत्न, अत्यंत कष्टाने करतात. कांही साधक, ईश्वरोन्मादामुळे, स्थूल-जीवनाविषयी इतके उदासीन होतात, की त्यांचे बाह्य व्यवहार वेड्यासारखे दिसतात; व कांही आपलीं व्यवहारांतील कर्तव्यें करीत, मोक्षमार्गाचें आक्रमण करतात.

आपल्या उत्तान अवस्थेमुळे, कांही उन्नत साधक पूज्य होतात परंतु आध्यात्मिक सौंदर्य, किंवा अंतस्थ चेतनेची पूर्णता, किंवा सामर्थ्य—या बाबतींत, ईश्वरप्राप्त पुरुषाशीं त्यांची तुलना कोणत्याहि दृष्टीने होऊं शकत नाही. सहाव्या भूमिकेपर्यंतच्या सर्व साधकांची जाणीव मर्यादित असते; व ते सर्व द्वैतमय व भ्रमात्मक क्षेत्रांतच असतात. साधक बहुधा आनंदांत असतात; व तो आनंद ईश्वराचें सान्निध्य व ईश्वराशीं होणारें त्यांचें हितगुज (communion), यांतून निर्माण होतो. कांही साधकांचा ईश्वरी प्रियतमाशीं अंतस्थ सख्यसंबध जुळतो; व आनंदातिरेकाने त्यांचा तोल नाहीसा होतो. ईश्वरमस्तीच्या अदम्य अवस्थेंत, ते लोकांना शिव्या देतात, किंवा त्यांच्यावर दगड फेकतात; व त्यांची बाह्य वर्तणूक अगदी भुतासारखी असते. या स्थितीला उन्मत्त अवस्था म्हणतात. ईश्वरी प्रियतमाशीं आंतरिक सहवास प्राप्त झाल्यामुळे, कांही साधकांमध्ये हर्षोद्रेकाचा अतिरेक होऊन, ते व्यावहारिक मर्यादा व सांसारिक मूल्यें, यांची अवहेलना करतात. पूर्ण अनासक्तीमुळे अगदी भयरहित होऊन, त्यांचें बाह्य वर्तन इतकें उच्छृंखल होतें, की लोक त्याला मर्यादारहित स्वेच्छाचार किंवा तऱ्हेवाईकपणा समजण्याची चूक करूं शकतात.

उन्मत्त अवस्था.

सातव्या भूमिकेवर जेव्हा आत्म्याला ईश्वरानुभूति होते, तेव्हाच त्याला आपल्या आनंदातिशयावर पूर्ण ताबा येतो. अद्वैतांतील समस्थितींत तो नेहमीकरता स्थिर झाल्यामुळे, सदैव मिळणारा त्याचा असीम आनंद त्याला अस्थिर करूं शकत नाही. त्याच्याकरिता, नूतनप्राप्त प्रेम व आनंद, यांचा अतिरेक राहत नाही; साधकाचे स्थितींतील निकटतर सान्निध्य मिळाल्याबद्दलचा वर्धमान आल्हादाचा प्रचंड प्रवाह त्याला प्रसंगानुसार अस्थिर करीत नाही; कारण, आता त्याने ईश्वराशीं अविच्छेद्य एकता प्राप्त केली असते. आपल्या दैवी प्रियतमामध्ये विलीन झाल्यामुळे; त्याचें स्वत्व नष्ट झालें असतें; व ईश्वराशीं ऐक्य पावून, तो आनंदाचा मर्यादारहित महासागरच बनतो.

पूर्ण साम्यावस्था सातव्या भूमिकेंत येते.

ईश्वरप्राप्त पुरुषाचा आनंद उपाधिरहित व आत्मनिर्भर असतो; त्यामुळे तो नित्य सम असतो; व त्यांत चढउतार राहत नाही. त्याला असंदिग्ध अंतिम ज्ञान व अचल समता प्राप्त होते. संतांचा आनंद दैवी प्रियतमाशीं वर्धमान सामीप्य व सख्य मिळाल्यामुळे उत्पन्न होतो; तरीहि त्यांच्याकरिता, त्यांचा प्रियतम बहिर्भूत द्वितीयच (externalised another) बनलेला असतो. परंतु, ईश्वरप्राप्त पुरुषाचा आनंद ईश्वरावस्थेंतील अविभेद्य अंग असतो; व त्यांत द्वैत उरत नाही. संतांचा आनंद परतंत्र असतो; तर ईश्वरपुरुषाचा आनंद स्वयंसिद्ध असतो. संतांचा आनंद ईश्वराच्या अनुग्रहाच्या वर्धमान प्राप्तीवर अवलंबून असतो; परंतु ईश्वरप्राप्त पुरुषाचा आनंद नुसता जसाच्या तसा असतो.

ईश्वरप्राप्त पुरुषाचा आनंद अन्याश्रित नसून, स्वयंभू असतो.

ईश्वरानुभूतीनंतर, मनुष्याला अनंत शक्ति, ज्ञान व आनंद प्राप्त होतात; व आंतरिक अनुभवाच्या ह्या अंगभूत लक्षणांच्या बाबतींत, सर्व ईश्वरप्राप्त पुरुष सारखेच असतात. परंतु, त्यांच्यांत जे गौण व वरवरचे भेद आहेत, त्यामुळें त्यांचे कांही प्रकार होतात. ईश्वरप्राप्त पुरुषांतील प्रकार वास्तविकपणें केवळ बाह्य भेदच असतात; व ते भेद त्यांच्या ईश्वराशीं असणाऱ्या संबंधामध्ये नसून, त्यांच्या सृष्टीशीं असणाऱ्या संबंधामध्ये असतात. सत्या ( truth ) च्या दृष्टीने, हे भेद इतके क्षुल्लक असतात की, त्यामुळे त्यांचें आध्यात्मिक पद ( status) न्यूनाधिक होत नाही. सर्व ईश्वरप्राप्त पुरुष पूर्ण असतात. खरें पाहतां, त्यांच्यांतील भेद बाहेरच्या निरीक्षकांच्या करिताच असतात; त्यांचें एकमेकांशीं तर ऐक्य असतेंच, पण शिवाय ते अखील जीवनाशीं व अस्तित्वाशीं एकरूप असतात

सृष्टिशीं असणाऱ्या संबधाचे प्रकार.

परंतु सृष्टीच्या दृष्टीने, ईश्वरप्राप्त पुरुषांतील प्रकारभेद सुनिश्चित असून, शिवाय ते विचारार्हहि आहेत. ईश्वरानुभूतीनंतर, कांही आत्मे आपल्या सर्व देहांचा त्याग करून, आपल्या ईश्वरानुभूतीमध्ये निमग्न राहतात. त्यांच्याकरता, परमात्माच सत्य वस्तु असून, सर्व विश्व शून्यरूप असतें. सद्वस्तूच्या निर्गुण भागाशीं, ते इतके समरस झालेले असतात, की रूपमय सृष्टीशीं त्यांचा कोणताहि प्रत्यक्ष संबंध राहत नाही.

कांही ईश्वरप्राप्त पुरुष सर्व देहांचा त्याग करतात.

काही ईश्वरप्राप्त पुरुष आपली स्थूल, सूक्ष्म व कारण शरीरें कायम ठेवतात; परंतु ईश्वरानुभूतींत निमग्न राहिल्यामुळे, त्यांना आपल्या देहांच्या अस्तित्वाचें मुळीं भानच नसतें. [illegible] कुणाला

आत्म्यांना त्यांचे देह दिसूं शकतात; व ते दुसरे आत्मे त्यांना मूर्तरूप मानतात. पण त्यांचे देह केवळ निरीक्षकांच्या दृष्टीनेच अस्तित्वांत असतात. सूफी भाषेंत अशा ईश्वरप्राप्त पुरुषांना 'मज्झूब' म्हणतात. 'मज्झूब' आपल्या शरीरांचा उपयोग जाणीवपूर्वक करीत नाहीत, कारण त्यांची जाणीव सर्वस्वी ईश्वराकडेच वळलेली असते व ती देहाभिमुख किंवा विश्वाभिमुख नसते. त्यांच्या स्वतःच्या दृष्टीने, त्यांच्या शरीरांना किंवा रूपमय सृष्टीला मुळी अस्तित्वच नसतें; तेव्हा त्या रूपमय सृष्टींत, आपल्या शरीरांचा उपयोग करण्याचा मुळी प्रश्नच उत्पन्न होऊं शकत नाही. परंतु 'मज्झूब' जरी जाणीवपूर्वक आपल्या शरीरांचा उपयोग करीत नाहीत, तरी त्यांना प्राप्त असलेल्या असीम आनंद, ज्ञान व प्रेम, यांच्या स्वभावतःच होणाऱ्या नित्य प्रसरणक्रियेचे, त्यांचे देह हे विसर्जन-बिंदू बनतात; व जे त्यांच्या देहांची पूजा करतात, त्यांना त्यांच्यांतून प्रवाहित होणाऱ्या ईश्वरत्वामुळे, महान् आध्यात्मिक लाभ होतो.

'मज्झूब.'

कांही ईश्वरप्राप्त पुरुषांना, ईश्वरानुभूतीबरोबरच इतर बद्ध स्थितींतील आत्म्यांचीहि जाणीव असते; पण ते सर्व परमात्म्याचेच अंश असून, त्यांना कधीतरी मोक्ष व ईश्वरानुभूति मिळणारच, हेंहि त्यांना माहीत असतें. व त्या ज्ञानांत पक्के आरूढ झाल्यामुळे, बद्ध स्थितींतील आत्म्यांच्या नशिबीं येणाऱ्या अल्पजीवी व परिवर्तनशील वांट्याकडे ते दुर्लक्ष करतात. त्यांनी स्वतः ईश्वर मिळविला, त्याचप्रमाणे इतर आत्मेहि, कधी काली, ईश्वर मिळविणारच, हें ते जाणतात. बद्ध जीवांना ईश्वरानुभूति लवकर मिळवून देण्याची घाई त्यांना नसते; व सृष्टीतील कालप्रवाहांत ते फारसे [illegible] [illegible] घालीत नाहीत.

कांही ईश्वरप्राप्त पुरुष सृष्टीविषयीं उदासीन असतात.

काही ईश्वरप्राप्त पुरुषांना, ईश्वरानुभूतीबरोबरच सृष्टीची व स्वतःच्या देहांचीहि जाणीव असते. बद्ध स्थितींतील जीवांबद्दल ते सक्रिय सहानुभूति ठेवतात; व इतर जीवांना, ईश्वराकडे जाण्याच्या कार्यांत, मदत व्हावी, म्हणून ते सृष्टीमध्ये स्वतःच्या देहांचा ज्ञानपूर्वक उपयोग करतात. ईश्वरानुभूति असलेल्या अशा महात्म्यास 'सालिक,' 'सद्‌गुरु,' किंवा 'ईश्वरपुरुष' म्हणतात. सालिक किंवा सद्‌गुरूला, स्वतः आपण विश्वाच्या केन्द्रस्थानीं असल्याचें आढळून येतें; व उच्चनीच किंवा भलेबुरे सर्व आत्मे त्याच्यापासून सारख्याच अंतरावर असतात. सूफी परंपरेमध्ये, ह्या केन्द्राला 'कुतुब' म्हणतात. कुतुब, आपल्या कार्यकर्त्यांच्या द्वारें, अखिल विश्वाचें संचालन करतो.

ईश्वरपुरुष.

जो सद्‌गुरु, उत्क्रान्तीमधून, सर्वांच्या आधी ईश्वरपुरुष बनून निघाला, व जो पुढे इतर जीवांना मदत करीत राहिला, त्याला 'अवतार' म्हणतात. साधारण सद्‌गुरु व अवतार, यांच्यामध्ये आणखी एक फरक आहे. सद्‌गुरु जेव्हा विश्वकार्य करीत नसेल, तेव्हा त्याचें मन अनंततेकडे प्रवृत्त होतें; व सृष्टींत अवतीर्ण होणें, त्याला फार जड जातें. अशा वेळीं, स्थूल वस्तू व क्रियांच्या क्षेत्रांत उतरण्यास प्रवृत्त होण्याकरता, त्याला आपल्या मनावर सक्ति करावी लागते. अशा प्रसंगीं, देहारूढ राहण्याकरता, सद्‌गुरु खाद्य पदार्थ मागतात, किंवा स्वतःचे केस ओढतात, किंवा स्वतःला मारून घेतात; त्यांना खाली ठेवण्यास, अशा प्रकारच्या कोणत्या तरी शारीरिक क्रियेची आवश्यकता असते. परंतु अवताराला, तो सृष्टींतील एखादें कार्य करण्यांत गुंतलेला नसला, तरी स्वतःची साधारण जाणीव कायम ठेवण्यांत कष्ट पडत नाहीत. खालच्या भूमिके-

अवतार.

वर राहण्याकरिता, त्याला शारीरिक क्रियांची मदत घ्यावी लागत नाही.

जाणिवेच्या मूलभूत लक्षणांच्या दृष्टीने, व सृष्टींतील कार्याच्या स्वरूपाच्या दृष्टीने, अवतार हा इतर सद्गुरु व ईश्वरपुरुषांप्रमाणेच असतो. अवतार व सद्गुरु, ह्या दोघांनाहि मर्यादित व्यष्टिमन नसतें, कारण,अनंतांत विलीन झाल्यावर, त्यांचें मन सर्वगामी (universal) होतें. अवताराप्रमाणेच सालिक, सद्गुरु व ईश्वरपुरुषांची ईश्वरानुभूति, ते सृष्टींतील आपापलें नानाविध कार्य करीत असतांना, क्षणभरहि लुप्त किंवा खंडित होत नाही; व जेव्हा ते इतर जीवांना साहाय्य देऊं इच्छितात, तेव्हा ते आपल्या सर्वगत समष्टिमनानेच कार्य करितात.



## १७ : : : ईश्वरपुरुष

### भाग २ रा

## ईश्वरपुरुषाची अवस्था

सर्व क्षेत्रांतील विषयांमध्ये, ईश्वर हाच अभ्यासाचा सर्वश्रेष्ठ विषय आहे. परंतु, ईश्वराविषयी उदासीन राहण्यापेक्षा, त्याच्याबद्दल जिज्ञासा ठेवणें, हें केव्हाहि उत्तम असलें, तरी ईश्वरविषयक केवळ बौद्धिक ज्ञान मिळवून, साधक जीवनाच्या खऱ्या ध्येयाप्रत फारशी प्रगति करूं शकत नाही. केवळ संशयात्मा किंवा अज्ञेयवादी यांच्यापेक्षा, बुद्धीच्या द्वारा ईश्वराचा शोध करणारा मनुष्य कितीतरी अधिक श्रेष्ठ असतो. परंतु, ईश्वराच्या बौद्धिक आकलनापेक्षा, त्याचे हृदयाने आकलन करणें, ( feel ) हें खात्रीने अधिक चांगलें असून ईश्वराचा अनुभव घेणें, हें त्याहूनहि उत्तम आहे. परंतु, ईश्वर हा अनुभवाचा विषय होतो, तेव्हाहि ईश्वरत्वाचें खरें स्वरूप अज्ञातच राहतें; कारण, अनुभवाचा विषय झालेला ईश्वर, साधकास बहिर्भूत बनून, त्याच्याहून

ईश्वरानुभूति ईश्वराविषयीच्या बौद्धिक ज्ञानाहून निराळी आहे.

निराळा राहतो. जेव्हा साधक ईश्वरामध्ये लय पावून, त्याच्याशीं एकरूप होतो, तेव्हाच त्याला ईश्वराचें खरें स्वरूप समजतें. म्हणून, **ईश्वराबद्दल पूर्ण अज्ञान असण्यापेक्षा, त्याबद्दलचें बौद्धिक ज्ञान बरें; त्याच्या बौद्धिक ज्ञानापेक्षा, त्याचें हृदयाने आकलन करणें बरें; त्याचें हृदयाने आकलन करण्यापेक्षा, त्याचा अनुभव घेणें बरें; व त्याचा अनुभव घेण्यापेक्षा, त्याच्याशीं ऐक्य पावणें बरें.**

बद्धावस्थेंतील मनामध्ये उसळणाऱ्या नानाप्रकारच्या शंकाकुशंका ईश्वरानुभूतीच्या अवस्थेंत उद्‌भवत नाहीत. बंधनांत असलेले जीव, आपण स्वत: कोठून आलों व कुठे जाणार, या बाबतींत नेहमी शंकाग्रस्तच राहतात. ह्याउलट, ईश्वरप्राप्त पुरुष सृष्टीच्या अंतर्यामीच्या केंद्रस्थानीं असल्यामुळे, त्यांना सृष्टीचे आदि व अंत ज्ञात असतात. साधारण मनुष्य जसा स्वत:स कुत्रा न मानता, मनुष्यच असल्याचें खात्रीपूर्वक जाणतो, त्याचप्रमाणे, ईश्वरप्राप्त पुरुषास स्वत: ईश्वरच असल्याचें निश्चयात्मक ज्ञान असतें. त्याच्या मनांत याबद्दल शंका, अंधविश्वास, आत्मसंभ्रम किंवा गृहीत कल्पना नसते; तर त्याचें याबद्दलचें ज्ञान नि:संदिग्ध, निश्चयात्मक व स्थिर असतें. हें त्याचें ज्ञान, आत्मानुभूतीच्या आधारावर निरंतर अधिष्ठित असल्यामुळे, त्याला बाहेरून पुष्टी देण्याची आवश्यकता उरत नाही; व त्याच्यावर विरोधी मतांचाहि परिणाम होत नाही. त्यांच्या अंतिम नि:संदिग्धतेला, कांहीहि व कोणीहि अस्थिर करूं शकत नाहीं. ज्याप्रमाणें, साधारण मनुष्य स्वत:ला मनुष्याहून व्यतिरिक्त दुसरें कांहीं समजूं शकत नाही, त्याचप्रमाणे ईश्वरप्राप्त पुरुषहि, स्वत:स ईश्वराव्यतिरिक्त दुसरें कांहीहि समजूं शकत नाही.

अंतिम नि:संदिग्धता.

परंतु, मनुष्य स्वतःस तो जें वास्तविकपणें नसतो, तें समजतो; व ईश्वर-प्राप्त पुरुषाला स्वतःबद्दल यथार्थ ज्ञान असतें.

ईश्वरानुभूतीचा गौरव.

ईश्वरानुभूति हें अखिल सृष्टीचें ध्येय आहे. ऐहिक सुख कितीहि मोठें असलें, तरी तें ईश्वरानुभूतीच्या शाश्वत आनंदाची केवळ क्षण-भंगुर छाया आहे; भूलोकचें ज्ञान कितीहि व्यापक असलें, तरी तें ईश्वरानुभूतीमध्ये प्रतीत होणाऱ्या केवल सत्याचें विकृत प्रतिबिंब मात्र आहे; व मानवी शक्ति कितीहि भव्य असली, तरी ती ईश्वरानुभूतींतील अनंत सामर्थ्याचा अणुमात्र अंश आहे. विश्वांत जें जें कांही श्रेष्ठ, सुंदर व आकर्षक आहे, व जें जें महान् , शुभ व स्फूर्तिप्रद आहे—तें सर्व ईश्वरानुभूतीमधील अक्षय व अवर्णनीय गौरवाचाच अत्यंत सूक्ष्म भाग आहे.

ईश्वरानुभूतीचे मोल.

ईश्वरानुभूतीमधील अमर आनंद, केवल सत्य, अनंत सामर्थ्य, व अक्षय गौरव, हे फुकट मिळत नाहीत. व्यष्टिभूत आत्म्याला ( individualised soul ) म्हणजे जीवाला, सृष्टीच्या गर्भांत प्रच्छन्न असलेला हा निधि मिळविण्यापूर्वी, उत्क्रान्ति व जन्मपरंपरेंतील द्वंद्वसंग्रामाच्या प्रसवयातनांचा अनुभव घ्यावा लागतो; व हा निधि प्राप्त करण्याकरता, जीवाला स्वतःच्या पृथक् आहंकारिक अस्तित्वा (separative ego ) ची किंमत द्यावी लागते. ईश्वरत्वाच्या मर्यादारहित अवस्थेंत प्रवेश करावयाचा असेल, तर तत्पूर्वी मर्यादित व्यक्तिमत्व समूळ नष्ट झालें पाहिजे. जगांतील साधारण मनुष्यामध्ये, एका विशिष्ट नामरूपाशीं संबद्ध झालेल्या मर्यादित व्यक्तित्वाच्या प्रभावामुळे, अंतस्थ परमात्म्यावर अज्ञानरूपी आवरण पडतें; व हें नाहीसें होण्याकरिता,

जीवाला स्वतःच्या सीमित व पृथक् सत्तेचें निःशेष विसर्जन करावें लागतें. जेव्हा तो स्वतः आपला यत्किंचितहि अवशेष न ठेवतां, पूर्णपणें नाहींसा होतो, तेव्हा जो बाकी राहतो तोच परमात्मा. सीमित व्यष्टिजीवनाचें विसर्जन, म्हणजे पृथक् सत्तेच्या दृढमूल भ्रमाचें विसर्जन आहे. त्यांत एखाद्या सत्य वस्तूचा त्याग होत नसतो; तर त्यांत असत्याचा त्याग होऊन, सत्या ( truth ) ची प्राप्ति होते.

ईश्वरपुरुषाच्या दोन बाजू.

साधक जेव्हा आंतरिक भूमिकांचें उल्लंघन करून, ईश्वरानुभूतीकडे जात असतो, तेव्हा तो क्रमशः स्थूल, सूक्ष्म व कारण देहाबद्दल पूर्णपणें अचेतन होत जातो. परंतु ईश्वरानुभूतीनंतर, स्वतःच्या ईश्वरानुभूतीमध्ये किंचित्हि उणीव न पडूं देतां, कांही आत्मे पुनः खाली अवतरित होतात; व त्यांना सर्व सृष्टीची व स्वतःच्या स्थूल, सूक्ष्म व कारण शरीरांची जाणीव पुनः प्राप्त होते. त्यांनाच ईश्वरपुरुष म्हणतात. ईश्वर हा स्वयमेव ईश्वराच्या दृष्टीने जाणीवपूर्वक ( consciously ) मनुष्य नसतो; व मनुष्य हा स्वयमेव मनुष्याच्या दृष्टीने जाणीवपूर्वक ईश्वर नसतो; परंतु ईश्वरपुरुष हा जाणीवपूर्वक ईश्वर व मनुष्य–दोन्हीहि असतो.

ईश्वरपुरुष सृष्टिप्रपंचांत फसून जात नाहीं.

सृष्टीची जाणीव पुनः आली, तरी ईश्वरपुरुष आपल्या आध्यात्मिक परमपदापासून किंचित्हि भ्रष्ट होत नाही. केवळ सृष्टीची जाणीव आध्यात्मिक दृष्ट्या घातुक नाही; तर संस्कारांमुळे सृष्टींत गुरफटून गेलेल्या जाणिवेवर, अज्ञानाचा पडदा पडल्यामुळे, आपणांत असलेल्या ईश्वरत्वाचा अनुभव घेतां येत नाही. त्याचप्रमाणे, केवळ

शरीराची जाणीव आध्यात्मिक दृष्ट्या घातुक नाही, तर संस्कारांमुळे उत्पन्न होणारा देहात्मभाव घातुक असतो. जो अखिल सृष्टीचें आदिकारण व अंतिम सत्य असून, ज्यांत सकलसृष्टीचा परमहेतु पूर्ण होतो, असा अनंत परमात्मा संस्कारांमुळेच अनुभवांत येत नाही.

संस्कारांमुळे मनांत 'मी देह आहें', असा भ्रम उत्पन्न होतो; व ह्याच आत्म्यास दृश्य जगताला बांधणाऱ्या साखळ्या आहेत. संस्कारांमुळे उत्पन्न होणाऱ्या देहात्मभावामुळेच, इच्छाशक्ति विपरीत रितीनें प्रगट होते व जाणिवेंत विसंगतपणा उत्पन्न होतो; केवळ शरीरविषयक जाणिवेने होत नाही. सद्‌गुरु संस्कारांपासून मुक्त असल्यामुळे, स्वतः शरीरांहून भिन्न असल्याची त्यास सतत जाणीव असते; व ईश्वरी इच्छा शुद्ध स्वरूपांत व्यक्त करण्याकरिता, तो स्वतःच्या देहांचा केवळ साधन म्हणून सुव्यवस्थित उपयोग करतो. त्याचे देह, म्हणजे डोक्यास टक्कल पडलेल्या माणसाच्या कृत्रिम केसांच्या टोपा (wig) प्रमाणे होत. दिवसा कामावर जातांना, टक्कल असलेला मनुष्य केसांचा टोप डोक्यावर चढवितो व रात्रीं निजतांना काढून टाकतो. त्याचप्रमाणे, कार्य करीत असतांना, ईश्वरपुरुष आपल्या देहांचा उपयोग करतो; परंतु स्वतःचें खरें परमात्मरूप अस्तित्व, या सर्व देहांहून अगदी निराळें असल्याचें तो जाणत असल्याने, त्या देहांची त्याला आवश्यकता नसेल त्या वेळीं, तो त्या देहांच्यापासून वियुक्त असतो.

ईश्वरपुरुषाला, स्वतः अनंत असून भासमान जगताच्या पलीकडे असल्याचें ज्ञान असतें; आणि सृष्टीची जाणीव कायम असूनहि, तो पूर्ण अनासक्त असल्यामुळे, सृष्टींत गुरफटून जात नाही.

दृश्य जगत् ज्या अनंत आत्म्याचें मायामय रूप आहे, त्याला पूर्णपणें विसरून, तें स्वतःसिद्ध समजण्यांतच अज्ञान आहे. सद्‌गुरूला सद्वस्तूचें, म्हणजे परमात्मा व सृष्टि, यांच्या सत्य स्वरूपाचें ज्ञान असतें. परंतु त्याच्या जाणिवेंत, यामुळे द्वैतभाव उत्पन्न होत नाही. कारण, सृष्टि ही केवळ परमात्म्याची बदलती छाया असून, परमात्मा हाच सृष्टीचें मध्यवर्ति व अनंत असें एकमेव, सत्य आहे, हें तो जाणतो. म्हणून, आत्मसाक्षात्काराला कोणत्याहि प्रकारचा कमीपणा येऊं न देतां, सद्‌गुरूला सृष्टीची जाणीव कायम ठेवतां येते; व प्रत्येक जीवास आत्मज्ञान अथवा ईश्वरसाक्षात्कार करण्याचा जो सृष्टीचा आदिहेतु आहे, तो साधण्याकरता, तो नामरूपात्मक सृष्टींत कार्य करीत राहतो.

परमात्म्याच्या बदलत्या छायेमुळे ईश्वरानुभूतीला बाध येऊं शकत नाही.

ईश्वरपुरुष जेव्हा ईश्वराच्या रूपातीत स्थितींतून, रूपमय सृष्टींत अवतीर्ण होतो, तेव्हा त्याला सर्वगत समष्टिमन (universal mind) प्राप्त होतें; व त्याचे विचार, भावना व सर्व क्रिया या समष्टिमनांतून होतात. त्याच्याकरिता, मर्यादित व्यष्टिमनाचें जीवन नेहमीकरिता समाप्त झालें असतें; द्वंद्वमूलक सुखदुःखेंहि त्याच्याकरता उरत नाहीत; व पृथक् आहंकारिक जीवनाची सारशून्यता किंवा व्यर्थ दंभ, यांचाहि त्याच्याकरिता निःशेष अंत झाला असतो. अखिल जीवनाशीं त्याचें जाणीवपूर्वक ऐक्य असतें. स्वतःच्या सर्वगत समष्टिमनाच्या द्वारा, ईश्वरपुरुष सर्व व्यष्टिमनांच्या सुखाचा व त्याचप्रमाणे दुःखाचा अनुभव

ईश्वरपुरुष सर्वगत समष्टिमनांतून कार्य करतो.

घेतो; व बहुतेक व्यष्टिमनांमध्ये, सुखापेक्षा दुःखाचेंच विशेष आधिक्य असल्यामुळे, दुसऱ्यांच्या अवस्थेमुळे ईश्वरप्राप्त पुरुषास होणारें दुःख, तज्जन्य सुखापेक्षा, अनंतपटीने जास्त असतें. ईश्वर-पुरुषास होण्याऱ्या यातना, याप्रमाणे अतिशय असल्या, तरी ईश्वरानुभूतीचा जो असीम आनंद, तो सहज व सतत आस्वादितो, त्याच्या बळावर, त्या सर्व यातना तो सहन करतो; व त्यांच्यामुळे तो प्रभावित किंवा अस्थिर होत नाही.

ईश्वरपुरुष आपलें अवतारकार्य संपल्यावर, आपले समष्टिमन टाकून देतो.

व्यष्टीभूत जीवात्मा ईश्वरानुभूतीच्या असीम आनंदाचा आस्वाद घेऊं शकत नाही; व अज्ञानवश होऊन, सीमित मनाशीं तादात्म्य पावत असल्याने, तो संस्कारजन्य सुखदुःखांमुळे अत्यंत विचलित होतो. परंतु ईश्वरपुरुष, त्यास अवतरणसमयीं प्राप्त होणाऱ्या सर्वगत समष्टिमनाशींहि तादात्म्य पावत नाही. केवळ जगांतील आपल्या अवतारकार्याकरतांच, त्याने तें समष्टिमन धारण केलें असतें; व त्याच्याशीं तादात्म्य न पावतां, तो त्याचा केवळ उपयोग करीत असल्यामुळे, तद्द्वारां येणाऱ्या सुखदुःखांचा त्याच्यावर मुळीच परिणाम होत नाही. आपलें कार्य संपल्यावर, तो आपल्या समष्टिमनाचा त्याग करतो; परंतु, जगांत समष्टिमनाच्या द्वारां कार्य करीत असतांना सुद्धा, तो स्वतःस समष्टिमनाहून भिन्न, असा अमर परमात्माच असल्याचें जाणतो.

ईश्वरपुरुष दुःखाने विचलित होत नाही.

ईश्वरपुरुषाचें ईश्वराशीं जें ऐक्य असतें, तें पूर्ण असतें; व आपल्या जागतिक कार्याकरता, तो द्वैतांत उतरतो, तेव्हा सुद्धा तो ईश्वरापासून क्षणभरहि दुरावत नाही. त्याच्या मनुष्यत्वाच्या साधारण स्थितींत, त्याला इतरांप्रमाणेच खावें प्यावें लागतें व

दुःखहि सहन करून, त्यांच्या पातळीवर यावें लागतें; परंतु, हें सर्व करीत असतां, तो आपलें ईश्वरत्व कायम ठेवीत असल्यामुळे, त्याला शांति, आनंद व सामर्थ्य, यांचा निरंतर अनुभव येतो. उदाहरणार्थ, सुळावर चढल्यानंतर, ख्राइस्टला यातना झाल्याच; परंतु त्या यातनांनी चलायमान झाला नाही, कारण एक तर द्वैतसृष्टींतील प्रत्येक गोष्ट भ्रमात्मकच आहे, हें जागृत ईश्वरत्वामधील ज्ञान त्याला होतें, व शिवाय ईश्वरैक्याच्या आनंदाचा त्याला आधार होता.

आत्मसमर्पण.

ईश्वरपुरुषाला सर्वात्मभाव असतो. तो स्वतःस सर्व वस्तूंमध्ये पाहतो; व त्याच्या सर्वगत समष्टिमनांत, इतर सर्व मनांचा समावेश होतो. बंधनांत असलेल्या सर्व जीवात्म्यांशीं आपण एकरूप असल्याची सद्गुरूस जाणीव असते. परंतु, परमात्म्याशीं असलेल्या स्वतःच्या ऐक्याच्या ज्ञानामुळे, तो जरी नित्य मुक्त असतो, तरी इतर बद्ध जीवात्म्यांशीं असलेल्या एकत्वाच्या अनुभवामुळे, त्यांच्याकरिता तो बंधनांत येतो; व आत्मज्ञानाचा नित्य आनंद तो सतत अनुभवीत असला, तरी इतर जीवात्मे स्वतःचींच रूपें असल्याची जाणीव त्यास असल्यामुळे, त्यांच्या स्थितीबद्दल त्याला दुःख होत असतें. ख्राइस्टच्या आत्मत्यागाचें हेंच मर्म होय. सद्गुरूचा जीवनहेतु पूर्णपणें सफल झालेला असतो; तरी तो स्वतःचे देह तसेच कायम ठेऊन, अज्ञानांत असलेल्या इतर सर्व जीवात्म्यांच्या मुक्तीकरिता व त्यांना आत्मानुभव मिळविण्यास मदत करण्याकरिता, त्यांचा उपयोग करीत असतो.

द्वैतमय सृष्टींत कार्य करीत असतांना देखील, ईश्वरपुरुष द्वैताच्या बंधनांत येत नाही. त्याच्या परमात्मस्थितींत, 'मी' व 'तूं' हें द्वैत

सर्वगामी ईश्वरी प्रेमामध्ये लुप्त झालें असतें. ईश्वरपुरुषाची पूर्ण

द्वैतांत अद्वैतसिद्धि.

अवस्था सर्व प्रकारच्या द्वैतांच्या व द्वंद्वांच्या पलीकडे असते; त्या स्थितींत अनिर्बंध स्वातंत्र्य, अविकृत संपूर्णता, अमर माधुरी, शाश्वत आनंद, निर्मल दिव्यता व अनिरुद्ध निर्मायकता असते. ईश्वरपुरुषाची ईश्वराशीं अभेद्य एकता चिरकाल असते; द्वैतमय सृष्टींत वावरत असतांना सुद्धा, तो अद्वैतस्थितींत सुप्रतिष्ठित झाला असतो; व इतर सर्वांशीं आपलें ऐक्य असल्याचें तर तो जाणतोच, पण आपण स्वतःच एकमेवाद्वितीय असल्याचेंहि ज्ञान त्याला असतें. ज्या अवस्थेंत, ईश्वराशिवाय दुसरें कांहीहि सत्य दिसत नाही, त्या अवस्थेंतून सर्व वस्तुमात्रांमध्ये ईश्वरच पाहण्याच्या स्थितीमध्ये, तो जाणून उतरलेला असतो; त्यामुळे द्वैतसृष्टींतील त्याचें वर्तन त्याला बंधनकारक तर होतच नाही, परंतु उलट त्याच्या त्या वर्तनांत, एकमेव व सत्यस्वरूप परमात्म्याची प्राचीन गौरवश्री प्रतिबिंबित होते व तें इतरांना त्यांच्या बंधनांतून मुक्त करण्यास कारणीभूत होतें.



भाग ३ रा

## ईश्वरपुरुषाचें कार्य

ईश्वरानुभूति अखिल सृष्टीचें अंतरहित अंतिम उद्दिष्ट असून, ती ज्ञानयुक्त व बंधनरहित कर्मांची कालातीत सिद्धि अथवा परिपाक आहे. ईश्वरानुभूतीनंतर आत्म्याने जन्म घेतला, म्हणजे अहंप्रेरित मना (ego mind) ऐवजी, सर्वगत समष्टिमन (universal mind) सशरीर होत असतें; व जन्मपरंपरेंत अटकलेल्या अहंप्रेरित मनाप्रमाणे, त्याच्यावर कर्मबंधनाचा लेप नसतो. साधारण मनुष्य, आपल्या अदम्य तृष्णेने प्रेरित होऊन, देह धारण करतो; परंतु ईश्वरपुरुष, जगांतील भ्रमांत व बंधनांत फसलेल्या लोकांबद्दल असीम व सहज करुणेने संपन्न होऊन, अवतीर्ण होतो. बद्ध स्थितींतील जीवांचे देहधारी बनण्याहून ईश्वरपुरुषाचें अवतरण, हें मूलत: भिन्न स्वरूपाचें असतें.

ईश्वरपुरुषाचें अवतरण कर्मबंधनाने नियत नसते.

ज्यांना ईश्वराची अनुभूति नसते, ते आपले [illegible]

राहतात; व निरनिराळ्या क्षेत्रांतील त्यांच्या परस्परामधील देण्याघेण्याने, कर्मजन्य ऋण किंवा घेव यांच्या शृंखला निर्माण होतात; व या शृंखलांमधून निसटणें त्याला अशक्य होतें. परंतु, ईश्वरपुरुष अद्वैताच्या ज्ञानांत आरूढ असतो; व तो जें कांही करतो, त्यानें तो स्वतः तर बंधनांत पडतच नाही, पण उलट तें इतर बद्धांच्या विमोचनास कारणीभूत होतें. ईश्वरपुरुषाच्या सत्तें ( being ) तून कोणीहि बहिर्भूत राहूं शकत नाही; तो स्वतःस सर्वांमध्ये पाहतो; व त्याचें सर्व कार्य अद्वैताच्या जाणिवेंतून उत्स्फूर्त होत असल्यामुळे, त्याने कितीहि अनिर्बंध देण्याघेण्याचा व्यवहार केला, तरी तो त्याला स्वतःला किंवा इतरांना बंधनकारक होत नाही.

स्वतंत्रतेंतील बंधनरहित देणेंघेणें.

ईश्वरपुरुष आपल्या अनुग्रहनिधीचा वर्षाव करीत असतांना, त्या निधीचें निस्संकोच ग्रहण करणाऱ्या माणसाचा जो संबंध जडतो, तो संबंध, त्याला मोक्ष व ईश्वरानुभूतीचें ध्येय प्राप्त होईपर्यंत, उपकारक होतो. आणि जो मनुष्य आपलें सर्व जीवन व स्वकीयसर्वस्व ईश्वरपुरुषास अर्पण करून, त्याच्या सेवेस स्वतःला वाहून घेतो, त्याचाहि त्या ईश्वरपुरुषाशीं संबंध जडतो; व तो संबंध त्या ईश्वरपुरुषाची कृपा व मदत त्याच्यावर आमंत्रित करून, त्याच्या आध्यात्मिक उन्नतीची गति वाढवितो. खरें पाहतां, ईश्वरपुरुषास केला जाणारा विरोध देखील बहुधा अशा घटनेस कारणीभूत होतो, की ज्यामुळे त्या विरोधक मनुष्याची न कळत ईश्वराकडे प्रवृत्ति होते. कारण, ईश्वरपुरुषाच्या कार्यास विरोध करीत असतांना, त्या मनुष्याला त्यांचा सहवास मिळतो, किंवा त्याचा त्याच्याशीं संबंध जडतो. यांप्रमाणे, जो कोणी

ईश्वरपुरुषाचा समागम सर्वांनाच कल्याणप्रद होतो.

स्वेच्छेने किंवा अनिच्छेने, ईश्वरपुरुषाच्या कार्यक्षेत्रांत खेचला जातो, त्याच्या अध्यात्मजीवनास नवीन गति ही मिळतेच.

ईश्वरपुरुष व पुरोहित-वर्ग.

ईश्वरपुरुषाचें जगांतील कार्य बहुतेक धर्मपुरोहितांना (priests) प्रिय असलेल्या कार्याहून अगदी भिन्न असतें. बहुतेक सुसंघटित धर्मांचे पुजारी, बाह्य विधि व समारंभ, यांना वाजवीपेक्षा अधिक महत्त्व देतात; व स्वतः ते स्वार्थ, संकुचित वृत्ति व अज्ञान, यांविरहित नसल्यामुळे, ते दुर्बल व श्रद्धाळू लोकांना, स्वर्गाचें आमिष व नरकाची भीति दाखवून लुबाडतात. ह्या उलट, ईश्वरपुरुष प्रेम, पावित्र्य, व्यापकता व ज्ञान, यांनी विभूषित असलेल्या अनंत जीवनांत, चिरकाल प्रविष्ट झाला असतो; व म्हणून, ज्यांना साहाय्य करावयाचें, त्यांच्या आंतरिक आत्मविकासास आवश्यक असणाऱ्या व वास्तविक महत्त्वाच्या, अशा गोष्टींतच ईश्वरपुरुष लक्ष घालतो. अज्ञानांत असलेले लोकसुद्धा, कित्येक वेळा, आत्मसंभ्रमा (self-delusion) ने किंवा बुद्धिपुरस्सर स्वार्थपर हेतूने, ईश्वर-पुरुषाचीच भाषा बोलणें शक्य असतें; ईश्वरपुरुषाच्या जीवनांतील फक्त काही बाह्य गोष्टींचेंच अनुकरण ते करूं शकतात. परंतु पूर्ण ज्ञान, असीम आनंद, व अमर्याद सामर्थ्य, ह्या बाबतींत, ते स्वतः आध्यात्मिक बंधनांमध्येच असल्यामुळे, ईश्वरपुरुषाचें अनुकरण करूं शकत नाहीत; कारण, हे सर्व सद्गुण ईश्वरपुरुषामध्ये परमात्म्याशीं युक्त झाल्यामुळे येतात.

अज्ञानी लोकांत ईश्वरपुरुषाची मूलभूत लक्षणें नसतात; व आत्मसंभ्रम (Self-delusion) होऊन, किंवा ढोंग म्हणून, ते ईश्वरपुरुषाचें सोंग करतात. पण त्यांच्या आत्मसंभ्रमाचा किंवा

सोंगाचा भोपळा कधी तरी फुटतोच. मनुष्य जर या जीवनचाकोरींत आत्मसंभ्रमामुळे फसला, तर तें त्याचें दुर्दैव समजावें. तो जें वास्तविक नाही, तें आपण आहों, अशी त्याची समजूत झालेली असते; व ज्ञान झालेलें नसतांना स्वतःस ज्ञान झालें आहे, असें त्याला वाटतें. परंतु, त्याच्यामुळे इतरांना कांही प्रमाणांत धोका असला, तरी तो स्वतःच्या विचारांत व कृतींत प्रामाणिक असल्यामुळे, त्याला दोष देतां येत नाही. ढोंगी माणसाला आपण स्वतः अज्ञानी असल्याचें माहित असतें, व तो स्वार्थाकरिता आपण जें वास्तविक नाही, त्याचें सोंग करतो. पण असें करीत असतांना, तो स्वतःभोवती दृढ कर्मबंध निर्माण करतो; आणि तो जरी दुर्बल व श्रद्धाळु लोकांना कांही कालपर्यंत हानिकारक झाला, तरी त्याची ती बुद्धिपुरस्सर फसवणूक चिरकाल टिकूं शकत नाही. स्वतःचें विधान सिद्ध न करूं शकल्यामुळे, त्याचें ढोंग लवकरच उघडकीस येतें.

आत्मसंभ्रम व ढोंग.

आपल्या सार्वलौकिक कार्याकरिता, परिस्थितीस अनुरूप जुळवाजुळव करण्यामध्ये, ईश्वरपुरुष अत्यंत व्यवस्थापनक्षमता दाखवितो. इतरास साहाय्य करितांना, तो कोणत्याहि एका प्रणालीशीं आसक्त होत नाही. तो परंपरागत विधिनिषेधांचें अनुसरण करीत बसत नाही; तर तो स्वतःच स्वतःकरिता नियम बनतो. तो कोणत्याहि उपस्थित प्रसंगास तोंड देऊन, त्या परिस्थितींत आवश्यक असलेली भूमिका धारण करूं शकतो; पण तो त्या भूमिकेने सीमित होत नाही. एकदा एका भक्ताने स्वतःच्या गुरूला त्याच्या उपोषणाचा हेतु विचारला, तेव्हा त्याने त्याला सांगितलें, कीं "मला पूर्णता

ईश्वरपुरुष भक्ताची भूमिका घेऊं शकतो

प्राप्त झाली असल्यामुळे, माझें उपोषण मुमुक्षूप्रमाणे पूर्णता मिळविण्याकरिता नाही. मी इतरांच्याकरिता उपोषण करतों". साधक पूर्ण पुरुषाप्रमाणे वागूं शकत नाही; कारण, पूर्ण पुरुषाचें अनुकरण अनन्यसाध्य असतें. परंतु, **पूर्ण पुरुष इतरांच्या हिताकरिता साधकाप्रमाणे वागूं शकतो.** विश्वविद्यालयांतील सर्वांत मोठी परीक्षा पास झालेला मनुष्य मुलांच्याकरिता, मूळाक्षरें सहज लिहूं शकतो; पण तो करूं शकतो, तें मुलें करूं शकत नाहीत. ईश्वरपुरुषाचें ईश्वराशीं पूर्णैक्य झालेलें असलें, तरी भक्तांना ईश्वरत्वाचा मार्ग दाखविण्याकरिता, तो कित्येक वेळां, भक्ताची भूमिकाहि धारण करूं शकतो. ईश्वरानुभूतीनंतरहि तो भक्तासारखा वागतो; व त्यांत, त्याचा उद्देश त्यांना मार्ग दिसावा, हाच असतो. परंतु, कोणतीहि एखादी विशिष्ट भूमिका घेण्याकरिता तो बांधला गेला नसतो; व तो आपली मदत करण्याच्या पद्धतींत, साधकांच्या जरूरीप्रमाणे योग्य तो फेरफार करूं शकतो. तो जें काही करतो, तें दुसऱ्यांच्या अंतिम कल्याणाकरिताच करतो; व तो स्वतः सर्वरूप झालेला असल्यामुळे, त्याला स्वतःला कांहीहि प्राप्तव्य नसतें.

इतरांना आध्यात्मिक साहाय्य देण्याच्या कार्यांत, ईश्वरपुरुष कोणत्याहि एखाद्या विशिष्ट पद्धतीस तर बांधला जात नाहीच; पण शिवाय, तो चांगुलपणाविषयींच्या परंपरागत मानदंडानेहि बांधला जात नाही. तो पापपुण्यातीत असतो; परंतु, त्याचे वर्तन जगाच्या दृष्टीने नियमबाह्य भासलें, तरी त्यांत इतरांचें अंतिम कल्याणच उद्दिष्ट असतें. तो निरनिराळ्या लोकांकरिता, निरनिराळ्या रीतींचा उपयोग करतो. त्याला स्वतःचा

मायानिरास करण्याकरता ईश्वरपुरुष मायेचाच उपयोग करतो.

वैयक्तिक हेतु किंवा स्वार्थ नसून, दुसऱ्यांच्या खऱ्या हिताकरिताच तो करुणासंपन्न असतो; व म्हणून, तो आपल्या सर्व कार्यांमध्ये निर्लेप राहतो. शिष्यांना मायेंतून काढण्याकरता तो मायेचाच उपयोग करतो; व आपल्या आध्यात्मिक कार्याकरता, तो अनंत मार्गांचा व रीतींचा अवलंब करतो. प्रत्येक व्यक्तीच्या बाबतींत, त्याची पद्धत अलग असतेच; पण एकाच व्यक्तीच्या संबंधीहि तो आपली पद्धत सदासर्वकाल एकच ठेवीत नाही. त्याच्या वागण्याने कधीकधी इतरांच्या मनास धक्का बसतो. त्याचें वर्तन त्यांच्या अपेक्षेस धरून नसतें; परंतु, त्यांत नेहमी कांहीतरी आध्यात्मिक हेतु असतो. एखाद्या बऱ्याच लांब चाललेल्या सुखस्वप्नांत, मध्येंच कांही मनास धस्स करणारा दुःस्वप्नाचा भाग असला, तर तो मनुष्य जागा होतो; व दुःस्वप्नाप्रमाणेंच, कांही काल अप्रिय वाटणारें, पण अंतीं हितकर, असे धक्के ईश्वरपुरुषहि स्वेच्छेने व मुद्दाम देतो.

बुडत्यास वाचविणें.

कधीकधी, कांही माणसांच्या बाबतींत, ईश्वरपुरुष निष्कारण कठोरसा वाटतो; परंतु बाहेरून पहाणाऱ्यांना आंतील परिस्थितीची जाणीव नसल्यामुळे, त्याच्या बाह्यतः कठोर दिसणाऱ्या वर्तनाचें खरें समर्थन त्यांच्या ध्यानांत नीटपणें येत नाही. परंतु खरें पाहतां, त्या परिस्थितीमध्ये आध्यात्मिक दृष्टीनें, ती कठोरता अत्यंत आवश्यक असते; व ज्यांच्या बाबतींत तो कठोर भासतो, त्यांच्याच खऱ्या हिताकरिता त्यांचें तें वर्तन असतें. एक ह्याकरता उत्तम दृष्टान्त आहे. कसलेल्या पोहणारांना, बुडत्यास वाचविण्याकरिता, बाह्यतः कठोर वर्तन करावें लागतें. एखादा मनुष्य जर पाण्यांत बुडत असला, तर जवळ असलेल्या कोणत्याहि मनुष्यास

तो आवळून धरतो; व परिणामाचा विचार न करतां, तो त्या पोह-णाऱ्यास असे वांकडेतिकडे पकडतो, कीं त्याला वाचविण्यास आलेला पोहणारा तर त्याला वांचवूं शकतच नाही, पण स्वत: त्याच्या मिठीमुळे बुडतो. म्हणून, ज्याला बुडत्याला वाचवावयाचें असेल, त्याने फार दक्ष राहिलें पाहिजे; व बहुधा बुडत्यास वाचविणारा कुशल पोहणारा, प्रथम त्या बुडत्याच्या डोक्यांत टोला देऊन, त्याला बेशुद्ध करतो, म्हणजे तो बुडणारा मनुष्य त्याला गैर रीतीने पकडूं शकत नाही. ह्या त्याच्या बाह्यत: कठोर दिसणाऱ्या कृतीच्या द्वारां, बुडत्यास उत्पन्न होणारा धोका कमी करून तो त्यास यशस्वी साहाय्य देऊं शकतो. त्याचप्रमाणे, ईश्वरपुरुषाचा बाहेरून भासणारा कठोरपणा इतरांच्या अंतिम निःश्रेयसास कारणीभूत होतो.

भ्रममय जाणिवेच्या अवस्था कापून काढणें.

बद्ध जीवात्मा सृष्टींत अडकलेला असतो; व सृष्टि ही केवळ कल्पनाच आहे. परंतु कल्पनेला अंत नसल्यामुळे, तो अनंत काल-पर्यंत खोट्या भ्रमजालांत भ्रमण करीत राह-ण्याचा संभव असतो. **भ्रमाच्या निर-निराळ्या अवस्था टाळण्याकरिता, सद्‌गुरु त्यास सत्यस्वरूपाचें ज्ञान देऊन मदत करूं शकतो.** सत्य-स्वरूपाचें ज्ञान नसल्यामुळे, मन नानाप्रकारच्या कल्पना करीत असतें. उदाहरणार्थ, आत्मा स्वत:स भिकारी किंवा राजा, पुरुष किंवा स्त्री समजतो.

ईश्वरानुभूतीचे बीज

याप्रमाणे आत्मा द्वंद्वांचा अनुभव गोळा करीत जातो. जेथे जेथे द्वंद्व आहे, तेथे तेथे समतोलता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न, विरुद्ध भावाच्या साहाय्याने होत असतो. जर एखाद्यास खून करण्याचा अनुभव असला, तर त्याची पूर्ति स्वत: खुनाचा विषय होऊन करावी लागते; व

त्यास राजपदाचा अनुभव असल्यास, त्याची पूर्ती भिकारी होऊन करावी लागते. स्वतःचा भ्रम नाहीसा न करूं शकल्यामुळे, आत्मा द्वंद्वांच्या दोन टोकांमध्ये अनिश्चित कालपर्यंत भ्रमण करीत राहण्याचा संभव असतो. जे कल्पनातरंग एरव्ही अनंत कालपर्यंत चालले असते, त्यांना आळा घालून व सत्यस्वरूपाचें ज्ञान देऊन, सद्गुरु आत्म्यास सद्वस्तु मिळविण्याकरिता मदत करितो. बद्ध जीवात्म्यात सद्गुरु ईश्वरानुभूतीचें बीज पेरीत असला, तरी त्यास ईश्वरानुभूति येण्याकरिता, कांही काल जावा लागतो. सृष्टींतील प्रत्येक वस्तूचा विकास होण्यास वेळ लागतो.

परंतु, सद्गुरूच्या द्वारा मिळणारी मदत, उन्नत साधकाच्या मदतीपेक्षा, अधिक परिणामकारक असते. जेव्हा साधक मदत करतो, तेव्हा तो फार तर तो स्वतः जेथपर्यंत गेला असेल, तेथपर्यंतच दुसऱ्याला घेऊन जाऊं शकतो; परंतु हें त्याचें सीमित साहाय्य देखील, अगदीं क्रमशःच फलद्रूप होतें,—म्हणजे ह्या साहाय्याच्या द्वारा उन्नति करणाऱ्या पुरुषाला, पहिल्या भूमिकेंत कांही काल स्थित व्हावें लागतें, मग दुसऱ्या भूमिकेंत कांही काल रहावें लागतें, व याप्रमाणें पुढेहि तो विश्रान्ति घेत घेत प्रगति करतो. परंतु जेव्हा ईश्वरपुरुष प्रसन्न होऊन मदत करतो, तेव्हा स्वतःच्या कृपाशक्तीने, तो साधकाला एका क्षणांत सातव्या भूमिकेवरसुद्धा घेऊन जाऊं शकतो; पण अर्थातच त्या एका क्षणांतसुद्धा, साधकाला मधल्या सर्व भूमिका उल्लंघन कराव्या लागतातच.

सद्गुरूचें साहाय्य.

साधकाला सातव्या भूमिकेमध्ये नेण्यांत, सद्गुरु त्याला स्वतःच्या

बरोबरीचें पद देतो; याप्रमाणे श्रेष्ठतम पद प्राप्त होऊन, साधक स्वतःच ईश्वरपुरुष बनतो. ईश्वरपुरुषापासून त्याच्या शिष्यांमध्ये होणारें हें आत्मज्ञानाचें संक्रमण, एका दिव्याने दुसरा दिवा लावण्यासारखें आहे. मूळ दिव्याप्रमाणेच, हा त्यापासून लावलेला दुसरा दिवाहि इतराना प्रकाश देऊं शकतो; दोन्ही दिवे सारखेच महत्त्वाचे व उपयोगी असतात; व ह्या बाबतींत त्या दोहोंत कांहीच फरक उरत नाही. ईश्वरपुरुषाची वटवृक्षाशीं तुलना करतां येईल. वटवृक्ष विशाल व भव्य होऊन व पांथस्थास छाया व आश्रय देऊन, त्यांचें रविताप, पर्जन्य व वादळ यांपासून संरक्षण करतो. त्याची वाढ पूर्ण झाल्यावर, त्यांतून अवतीर्ण होणाऱ्या पारंब्या पडीत जमीनींत दूरवर शिरतात; आणि त्यांतून कालांतराने उत्पन्न होणारा पूर्ण विकसित वटवृक्षहि, तितकाच भव्य व विशाल होऊन व पांथस्थास छाया व आश्रय देऊन, त्यांचें रविताप, पर्जन्य व वादळ यांपासून संरक्षण करतो. इतकेंच नव्हे, तर ह्या नवीन वटवृक्षांत, तसलाच आणखी दुसरा पूर्ण विकसित वटवृक्ष निर्माण करण्याची सुप्त शक्ति असते. ईश्वरपुरुष हा वटवृक्षाप्रमाणे असून, तो दुसऱ्यामधील सुप्त ईश्वरपुरुष जागृत करतो. ईश्वरपुरुषांची अविरत परंपरा म्हणजे मानवजातीला चिरकाल टिकणारें वरदानच आहे. कारण, ईश्वरपुरुष मानवजातीला तिच्या तिमिराच्छादित व प्रयासपूर्ण यात्रेंत पुढे पाऊल टाकण्यास साहाय्य देतात.

वटवृक्षाचा दृष्टान्त.

ईश्वरपुरुष हा एकाच वेळीं विश्वाचा प्रभु व सेवक दोन्हीहि असतो, असें म्हणतां येईल. आपल्या आध्यात्मिक अनुग्रहनिधीचा सर्वांवर

मुक्तहस्ताने भरपूर वर्षाव करणारा, या दृष्टीने तो विश्वाचा स्वामी असतो; परंतु दुसऱ्यांचा भार स्वतःवर घेऊन, त्यांना अनेक आध्यात्मिक अडचणींमधून पार पडण्यास मदत करणारा, या दृष्टीने तो विश्वाचा सेवक असतो. ईश्वरपुरुष स्वामी असून सेवकहि असतो, तसाच तो परम प्रेमी व अद्वितीय प्रियतमहि असतो. त्याने प्रदान केलेलें किंवा ग्रहण केलेलें प्रेम आत्म्यास अज्ञानापासून मुक्त करतें. तो जेव्हा प्रेम करतो, तेव्हा तो अन्यरूपधारी स्वतःवरच प्रेम करतो; व तो जेव्हा प्रेमाचा स्वीकार करतो, तेव्हा त्याने ग्रहण केलेलें तें प्रेम, त्यानेच सर्वांवर केलेल्या भेदरहित अनुग्रहाच्या वर्षावांतून निर्माण झालेलें असतें. पडीत किंवा पेरलेल्या सर्व प्रकारच्या जमीनीवर समतेने पडणाऱ्या पर्जन्याप्रमाणेच, ईश्वराची कृपाहि सर्वांनाच प्राप्त असते; पण ती कृपा चिकाटीने व परिश्रमपूर्वक पेरलेल्या भूमिकेंतच फलद्रूप होते.

प्रभु व सेवक.



# १८ : अध्यात्मजीवनांतील गूढविद्येचें स्थान

## भाग १ ला

## गूढ अनुभवांचें महत्त्व

जाणिवेची आध्यात्मिक दृष्टीने मुक्तता होत असतांना, मनुष्याच्या आत्म्यामध्ये सुप्त असलेल्या अनेक गूढ शक्ति अनावृत होतात. अशा रीतीने त्या शक्ति अनावृत झाल्या, म्हणजे जाणिवेचें तत्त्वग्राहकतेचें क्षेत्र अधिक विशाल होतें. कित्येक वेळा, जाणिवेंत येणाऱ्या या नवीन तत्त्वांमुळे, चेतनेच्या विमुक्त होण्याच्या प्रक्रियेला मदत किंवा अडथळा होतो.

असाधारण मानसिक गूढ शक्तींमुळे, मदत होऊं शकते व अडथळाहि होऊं शकतो.

म्हणून, असाधारण व महत्त्वपूर्ण स्वप्नें, दृश्यें, सूक्ष्म जगाचे अनुभव, पारलौकिक ( astral ) यात्रा, इत्यादि गूढ ( occult ) अनुभवांचें खरें महत्त्व साधकाने समजून घेतलें पाहिजे. इतकेंच नव्हे, तर अशा प्रकारचीं गूढ सत्यें आणि मनोभ्रम व आभास—यांच्या मधील फरकहि त्याने जाणून घेतला पाहिजे.

साधारणतः गूढ अनुभवांच्या महतीची अतिशयोक्ति होत असली,

तरी कित्येक वेळा, लोक त्यांच्या प्रामाण्या ( validity ) बद्दल साशंक असतात; व इतर मनोविषयक वैचित्र्य व विकृतींच्या बाबतींत, जसा साधारण मनुष्यास तिरस्कार वाटतो, तसाच तिरस्कार त्यांना गूढ (occult) अनुभवाबद्दलहि वाटतो.

गूढ अनुभवांबद्दलचा तिरस्कार हा अज्ञानजन्य आहे.

**गूढ तत्त्वांच्या ज्ञानप्राप्तींत ज्यांनी ओनाम्यासहि सुरवात केली नसते, त्यांच्यामध्येच गूढ तत्त्वां-( occult realities ) बद्दल केवळ तिरस्काराची भावना प्रामुख्याने आढळून येते.** विश्वाचा बराचसा विस्तीर्ण भाग फारच थोड्या लोकांना ज्ञात असून, स्वत:ला मात्र त्या थोड्या लोकांत स्थान नाही, हें कबूल करण्यांत अभिमानाला धक्का बसतो; व गूढविद्येबद्दल कांही लोकांना वाटत असलेल्या अकारण तिरस्काराच्या मुळाशीं, बहुधा गूढविद्या काय व कशाकरता आहे, याविषयींचें घोर अज्ञानच असतें. अर्थातच ही तिरस्काराची वृत्ति सावधपणा व चिकित्सकता, याहून भिन्न आहे. **ज्यांच्यामध्ये सावधपणा व चिकित्सकता आहे, त्यांच्यांत नम्रता व मनाचा खुलेपणाहि असतो; व जेव्हा त्यांच्या कक्षेंत गूढ सत्यें येतात, तेव्हा त्यांना ओळखून, त्यांना मान्यता देण्याकरता ते सदैव तत्पर असतात.**

साधारणत: सद्गुरु साधकाला साध्या मार्गांनीच मदत करतो; व त्याच्या डोळ्यांवर आवरण ( veil ) टाकून, त्याला पुढे नेण्याचे तो पसंत करतो. पण जेव्हा विशेष आवश्यकता असेल, तेव्हा तो त्याला गूढ माध्यमाच्या द्वारांहि मदत करूं शकतो. साधकाच्या गाढतर जीवनास उत्तेजित करण्याकरता उपयोगांत आणल्या जाणाऱ्या सर्वसाधारण साधनांमध्येच विशिष्ट प्रकारच्या स्वप्नांचाहि समावेश होतो.

कांही स्वप्नांना आध्यात्मिक महत्त्व असतें.

**कित्येक वेळां, साधकांना सद्गुरु आपली प्रथम भेट त्यांच्या स्वप्नांत जाऊन देतात.** परंतु, अशा व साध्या स्वप्नांतील फरक समजावून घेतला पाहिजे. साध्या स्वप्नांत, सूक्ष्म शरीर पाहणें, चव व वास घेणें, स्पर्श करणें व ऐकणें, वगैरे व्यापार करीत असतें; पण ह्या सर्व व्यापारांमध्ये, आत्मा सूक्ष्म शरीराचा जाणीवपूर्वक उपयोग करीत नसतो. साधारण स्वप्नांतील वरील अनुभव उपचेतन मनाने ( subconsciously ) ग्रहण केलेले असून, **मनोभासस्वरूप** ( subjective ) असतात. ह्या स्वप्नगत अनुभवांचा विषय स्थूल प्रकारच्या क्रिया असून, ते मनांत साचलेल्या उदयोन्मुख संस्कारांचे परिणाम असतात. मात्र कधीकधी, अगदी साधारण स्वप्नासारखेंच भासणारें स्वप्नहि सूक्ष्म शरीराच्या एखाद्या **वस्तुनिष्ठ** ( objective ) अनुभवाचे उपचेतन मनांत पडलेलें प्रतिबिंब असतें; व ते केवळ कल्पनानिर्मित नसतें.

विरळ प्रकारचें स्वप्न.

बहुतेक स्वप्नें सूक्ष्म शरीराचे उपचेतन ( subconscious ) अनुभव असून, भासमात्र असतात. परंतु त्यांना खास आध्यात्मिक महत्त्व नसतें. ह्या स्वप्नांच्या द्वारां, कांही नवे संस्कार उत्पन्न होतात; व कांही जुन्या संस्कारांचा व्यय होतो. त्याचप्रमाणे, ज्या प्रश्नांपासून व्यक्ति पराङ्मुख झालेली असते, अशा प्रश्नांवर व मनांत दडून बसलेल्या संस्कारगंड- ( complexes ) वर, ह्या स्वप्नांमुळे प्रकाश पडतो. परंतु, अशा स्वप्नांमध्ये, व्यक्तीच्या विगत अनुभवामध्ये नसलेला असा एकहि नवीन घटक असूं शकत नाही. गतानुभवांतील घटक निरनिराळ्या नवीन संबंधांत रचणें, या व्यतिरिक्त अशा स्वप्नांत दुसरें कोणतेंहि नावीन्य असूं शकत नाही. **विरल प्रकारच्या स्वप्नांत, अशीं**

माणसें व वस्तु येतात, की ज्यांचा अनुभव त्या मनुष्यांस या जन्मांत आलेला नसतो, पण पूर्वीच्या एखाद्या जन्मांत आलेला असतो. परंतु, या किंवा पूर्वीच्या जन्मांत, कधीहि अनुभवांत न आलेली, पण कधीतरी पुढे त्याच्या आयुष्यांत येणार असलेलीं माणसें व वस्तु ज्या स्वप्नांत दिसतात, तीं स्वप्नें याहूनहि विरळ असतात. याप्रमाणे, साधारण स्वप्नें गूढ रहस्य असलेल्या स्वप्नांहून मूलतः भिन्न असतात.

कित्येक वेळा, साधकाच्या मनांतील आंतरिक शक्ति प्रगट होत असतांना, त्याला रहस्यपूर्ण दृश्यें (visions), प्रकाश, रंग, नाद, गंध व स्पर्श, या स्वरूपांत सूक्ष्म जगताच्या मधून-मधून अनुभव येतो. सुरवातीला हे अनुभव तुटकतुटक येतात; व साधक त्यांना भ्रमरूप समजण्याचा संभव असतो. या अनुभवांना त्याने भ्रमस्वरूप मानलें, तरी त्यांचा स्वतःसिद्ध प्रभावच असा असतो, की तो त्यांच्या द्वारां येणाऱ्या मार्गनिदर्शनाचा प्रतिकार करूं शकत नाही. परंतु, गूढ अनुभवांचें यथार्थ मूल्यमापन करण्याची वृत्ति साधल्यास, साधकाचा आध्यात्मिक प्रवास अधिक सुगम होतो. मात्र साधकाला गूढ अनुभवांविषयीची ही समस्थिति ठेवणेंच प्रारंभीच्या अवस्थेंत अतिशय कठीण जातें.

गूढ अनुभवांची सुरवात

नवशिका साधक आंतरिक जगांतील आजपावेतो अज्ञात असलेल्या नवीन विषयांच्या नूतन ज्ञानाचें महत्त्व, वाजवीपेक्षा अधिक मानतो; व त्याच्या नवीन अनुभवांची पुनरावृत्ति होण्याची त्याची तृष्णा दुर्दम्य होते; किंवा तो त्या अनुभवांना विकारस्वरूप समजून, अत्यंत

गूढ अनुभवांविषयी समत्वाचें धोरण फारच थोड्या लोकांना साधतें.

गौण लेखतो. ह्या दोन प्रकारांपैकी, गूढ अनुभवांना वाजवीपेक्षा जास्त महत्त्व देण्याची वृत्ति अधिक लोकांत आढळते. कारण, गूढ अनुभव अगदीच नवीन व विरळ स्वरूपाचे असल्यामुळे, त्यांना अतिशय महत्त्व दिलें जातें.

गूढ अनुभवांविषयी तृष्णा.

वास्तविक पाहतां, या नवीन सापडलेल्या क्षेत्रावरच साधकाचा अहंकार आरूढ होऊं लागतो; व स्वतःस कांहीतरी विशेष व खास लाभ मिळाला असल्याची त्याला भावना राहते. ज्या मानाने त्याला या प्रकारचे अनुभव अधिकाधिक मिळतात, त्या मानाने त्यांचें क्षेत्र आणखी अधिकाधिक विस्तृत होतें. औषधाची सवय लागलेल्या मनुष्याला, या सवयीपूर्वी ज्या गोष्टी औषधाशिवाय करतां येत होत्या, त्या करण्याकरितासुद्धा, औषधांच्या उत्तेजनाची जरूर भासावयास लागते; त्याप्रमाणे, अध्यात्मपथांत प्रत्येक पाऊल टाकण्यापूर्वी, गूढ शक्तींच्या उत्तेजनावर अवलंबून राहण्याची साधकाला सवयच लागते. साधकाला या धोक्यापासून वांचविण्याकरिता, गूढ गोष्टींच्या विषयीची साधकाची तृष्णा वाढूं नये, म्हणून सद्गुरु अगदी दक्षतेने काळजी घेतो. साधकाला हवेसे वाटतील, त्यावेळीं त्याला गूढ अनुभव देण्यांत येत नसून, त्याच्या आध्यात्मिक प्रगतीकरिता जेव्हा ते अगदीच आवश्यक असतात, तेव्हाच देण्यांत येतात.

साधक गूढ अनुभवांना वाजवीपेक्षा जास्त महत्त्व देत आहे, किंवा ते सुव्यवस्थितपणे व सतत वाढतच जावे, अशी तृष्णा त्याच्या मनांत वाढली आहे, असें सद्गुरुला आढळून आल्यास, तो स्वतःच्या विशिष्ट रीतीनें, साधकाच्या मार्गातील हा अडथळा

दूर करण्याकरता, त्याचा शोध आडवाटेस जाण्यास कारणीभूत

गूढ अनुभवांच्या तृष्णेचें निराकरण.

झालेल्या गूढ अनुभवांना दुर्बल करतो किंवा त्यांचें निराकरण करतो. असें करणें, म्हणजे रोग्याच्या शरीरांत विकृति उत्पन्न करणारें मूलकारणच शस्त्रक्रियेने काढून, त्याला एकदम आराम देण्याप्रमाणे आहे; कारण, साधक स्वतःकरिता आणखी नवीन सीमाकारक शृंखला निर्माण करीत बसत नाही, हा एक त्यापासून लाभ होतो. कोणत्याहि परिस्थितींत, मिथ्या मूल्यें व खोटा शोध, यांमध्ये साधकाला फसूं देतां येत नाही. त्यामुळे वाट चुकून, खऱ्या अध्यात्म-जीवनांत प्रविष्ट होण्याच्या ध्येयाची प्राप्ति होण्याकरता, अनावश्यक विलंब होतो. गूढ सत्यांमध्ये साधकाचा प्रवेश हळूहळू होत जाऊन, त्याला दीर्घ काळच लागतो; व हा प्रवेश लवकर घडवून आणण्याकरता, सद्गुरुहि मुळीच उत्सुक नसतो. कारण, या नवीन दिशेने होणारा अनुभवक्षेत्राचा वाढलेला विस्तार सहन करण्याची शक्ति फारच थोड्या लोकांत असते.

प्रारंभिक अवस्थांमध्ये, गूढ तत्त्वांचा अनुभव हा अगदीच तुटकपणें येतो; व स्वतः भ्रमग्रस्त होण्याची शक्यता टाळण्याकरता,

गूढ अनुभवांचें प्रामाण्य.

साधक कधीकधी त्यांच्या प्रामाण्य-(validity) विषयी व विश्वसनीयतेबद्दल साशंक बनून, सावध राहण्याचा प्रयत्न करतो. परंतु, गूढ अनुभवांचा स्वतःच्या प्रामाण्यविषयक अधिकाराचा खात्रीचा पुरावा बहुधा त्यांच्यामध्येच साठवलेला असतो. हा पुरावा प्रथमदर्शनी स्पष्ट दिसला नाही, तरी गूढ अनुभवांत भरलेल्या असाधारण रहस्यपूर्णता, आनंद, शांति व मार्गदर्शकत्व, या गुणांमुळे त्यांच्याकडे लक्ष वेधलें जाऊन,

**त्यांची महति खात्रीने पटतेच.** ह्या गुणविशेषांच्या आधारानेच साधक खरे गूढ अनुभव व केवळ भास अथवा भ्रम, यांच्यांतील भेद जाणण्यास समर्थ होतो.

भास म्हणजे खोटीं दृश्यें असतात. वास्तविकपणे कोणतीहि वस्तु अस्तित्वांत नसतांना, ती प्रत्यक्षपणें ऐकल्यासारखी किंवा पाहिल्यासारखी वाटणें, याला भास ( hallucinations ) म्हणतात.

भास व भ्रम, यांच्याहून गूढ अनुभव कसे भिन्न आहेत, हे पाहिले पाहिजे.

वस्तूंची केवळ कल्पना करण्याहून भास अगदीच निराळे असले व साध्या इंद्रियज्ञाना( perceptions )शीं त्यांचें साम्य असलें, तरी त्यांच्या सत्यतेबद्दल मनांत शंका राहतेच. परंतु, भ्रमा( delusion )मध्ये अधिक फसवणूक होत असते, कारण त्यांत खरोखर अस्तित्वांत असलेली वस्तु दिसते, इतकेंच नव्हें, तर तिला सत्यता व खरें अस्तित्व आहे, असा संशयरहित व खात्रीचा विश्वास असतो. **गूढ अनुभव आणि भास व भ्रम, ह्यांच्यांतील फरक जाणण्याकरिता, एक साधारणत: न चुकणारी कसोटी आहे; व ती म्हणजे भास व भ्रम, यांच्यांत नसलेली आनंदयुक्त शांति, गूढ अनुभवांत प्रत्ययास येते.** भास व भ्रम हे जागृतींतील विकार आहेत.

भ्रम व भास, यांहून गूढ अनुभव स्पष्टपणें अलग जाणला, तरी

ज्याला गूढ साहाय्य मिळतें, त्याने आत्मविश्वास वाढविला पाहिजे.

कधीकधी त्यांत दुःखद शंकास्थान राहून, त्यांची शक्ति व प्रभाव कमी होऊं शकतात. उदाहरणार्थ, गूढ अनुभव आलेला आहे, असा मनुष्य, जेव्हा या बाबतींत कांहीच गम्य नसलेल्या, इतर लोकां-

बरोबर त्यांच्याविषयी चर्चा करतो, तेव्हा ते लोक सदिच्छेनेच प्रेरित होऊन, विरुद्ध विचार काढतात व त्या माणसाची खात्री डळमळीत करतात. याकरिताच, पूर्वीच्या काळीं, सद्गुरु शिष्याला स्वतःचे गूढ अनुभव अगदी गुप्त ठेवण्याची आज्ञा देत असत. लोकांना वाटो व ते कांहीहि म्हणोत, परंतु, आपण मात्र स्वतःच्याच आंतरिक अनुभवाचें अनुसरण करावयाचें, हें जोंवर साधक शिकत नाही, तोंवर, इतर लोकांच्या अश्रद्धेने व व्याघाताने, त्याचा गूढ अनुभव-मग तो कितीहि गाढ असो-कमी प्रभावशाली होण्याचा संभव राहतोच. गूढ साहाय्याचा शक्य तितका फायदा घेऊन, साधकाला शीघ्र प्रगति करावयाची असेल, तर त्याने स्वतःमध्ये व सद्गुरूमध्ये, गाढ व अविचल विश्वास ठेवला पाहिजे. इतरांच्याकडून त्याने मार्गदर्शनाची अपेक्षा करूं नये; कारण, त्याचे अनुभव व त्याच्या समोरील प्रश्न, यांचें यथार्थ आकलन करण्यास समर्थ असलेले लोक फारच कमी असतात. साधकाची विचारधारा व कृति, ज्या कारणांनी निश्चित होते, तीं कारणें त्याच्या मित्रांना व नातेवाइकांना माहीत नसतील; व म्हणून, त्यांना तो साधक अगम्य राहण्याची शक्यता असते. ह्या शक्यतेचा स्वीकार करण्याकरिता, साधकाने तयार असले पाहिजे.

गूढ अनुभवाच्या प्रभावावर शंकेचा परिणाम.

गूढ अनुभव येण्याच्या वेळीं, त्याच्यामुळे आध्यात्मिक प्रयत्नांना नवीन गति मिळण्याचा हेतु साधला गेला असल्यास, नंतरच्या विश्लेषणात्मक सिंहावलोकनामध्ये, तो भ्रमच होता, असें साधकाला वाटलें, तरी बहुधा त्यांत फारसा तोटा नसतो. परंतु, कांही गूढ अनुभव साधकाला, नेहमीकरिता व सतत, मार्गदर्शक व स्फूर्तिदायक व्हावे, या उद्देशानेच प्रदान केले असतात. [illegible]

विशिष्ट अनुभवांच्या प्रामाणिकतेबद्दल व अर्थपूर्णतेबद्दल साधकाने पूर्णपणें शंकारहित होण्याची आवश्यकता असते. पण गूढ अनुभवांच्याकारिता, सतत समर्थनपर पुष्टि मिळविण्याचा शोध खात्रीने अनुचितच आहे. सद्गुरूला अगदी जरूर वाटेल, तेव्हाच तो अशी समर्थनपर पुष्टि देतो. शिवाय, हें तो त्याला त्या परिस्थितीमध्ये सर्वोत्कृष्ट वाटेल, अशा रीतीने व स्वेच्छेनेच करतो. सद्गुरूची क्रियाशीलता, साधकाच्या सीमित ज्ञानामुळे उत्पन्न होणाऱ्या अपेक्षांवर, कोणत्याहि प्रकारें अवलंबून नसते; तर ती त्याच्या बंधनरहित मर्जीमध्ये उत्स्फूर्त होते. परंतु, जेव्हा आध्यात्मिक दृष्टीने आवश्यक असेल, तेव्हा **साधकाच्या नेहमीच्या कक्षेंत येणाऱ्या साधारण अनुभवांतून, त्याच्या गूढ अनुभवाकरिता समर्थनपर प्रमाण देऊन, सद्गुरु त्या गूढ अनुभवाचा प्रभाव वाढवितो.**

अध्यात्मपथांतील अधिक प्रगत अवस्थांमध्ये, सूक्ष्म जगातील शक्तींचा अनिर्बंध उपयोग करण्याची जबाबदारी स्वीकारण्याकरिता साधकाची आध्यात्मिक तयारी होते. तेव्हा तो झोपेत किंवा जागेपणीं, सूक्ष्म शरीराने अंतर्जगतांतील प्रवास (astral journeys) करूं शकतो. न कळत (unconsciously) केलेल्या अंतर्यात्रां (astral journeys) ना, बुद्धिपुरस्सर व पूर्ण जाणिवेने केलेल्या अंतर्यात्रांपेक्षा बरेंच कमी महत्त्व असतें. बुद्धिपुरस्सर अंतर्यात्रांकरिता, सूक्ष्म शरीराचा जाणीवयुक्त उपयोग ( conscious use ) करावा लागतो. स्थूल देहरूपी बाह्य माध्यमापासून, सूक्ष्म देहाला जाणीवपूर्वक अलग करण्याला फार महत्त्व आहे; कारण, त्यामुळे आत्मा स्वतःला स्थूल देहाहून भिन्न असल्याचें जाणतो, इतकेंच नव्हे तर तो स्थूल देहाचें अधिक

अतर्जगातील प्रवास.

उत्तम नियंत्रण करूं शकतो. एखाद्या वस्त्राप्रमाणे, तो स्वतःचें स्थूल शरीर, वाटेल तेव्हा टाकून देऊं शकतो, किंवा धारण करूं शकतो; व सूक्ष्म शरीराच्या द्वारा सूक्ष्म जगताचा अनुभव घेतो, किंवा जरूर तेव्हा, अंतर्यात्रा करतो.

उन्नतीकरता व कार्याकरिता विशालतर क्षेत्र.

स्थूल देहाच्या जाणीवयुक्त उपयोगाने मिळविलेल्या अनुभवाप्रमाणेच, सूक्ष्मदेहाच्या जाणीवयुक्त उपयोगाने मिळविलेलें शब्दस्पर्शरूपरसगंधांचे अनुभव देखील, अगदी स्पष्ट व निश्चित स्वरूपाचे असतात. स्वप्नसृष्टीप्रमाणे ते अनिश्चित किंवा मनोभासरूप नसून, जागृत स्थितींतील इतर अनुभवांप्रमाणे, ते वस्तुनिष्ठ ( objective ) व परिणामकारक असतात. तेव्हा अंतर्जगतांतील प्रवास करण्याच्या शक्तीमुळे, अनुभवाचें व कार्याचें क्षेत्र बरेंच वाढतें; आणि त्यामुळे स्वतःच्या उन्नतीकरिता व अद्याप अध्यात्मपथांत प्रविष्ट न झालेल्या इतर लोकांना मदत करण्याकरिता नवीन प्रकारची संधि मिळते.

अंतःप्रज्ञेकरिता गूढ अनुभवामुळे मदत होते; परतु गूढ अनुभव अंतःप्रज्ञेचें कार्य करूं शकत नाहीत.

गूढ ( occult ) अनुभवांचा कितीहि वर्षाव झाला, तरी साधकाने स्वतःच्या आंतरिक प्रयत्नाच्या द्वारा आत्मोन्नति साधण्याची आवश्यकता कमी होत नाही. प्रगत महात्म्यांनी किंवा सद्गुरूंनी दिलेल्या गूढ अनुभवांमुळे, आतांपर्यंत झांकली गेलेली अंतःप्रज्ञा अनावृत होते; पथांतील अडथळे दूर होतात; व पथांतील प्रत्येक टप्प्यांत आवश्यक असलेल्या नवीन गरजांकरिता लागणारा महान् आत्मविश्वास व उत्साह

साधकाला प्राप्त होतो. परंतु साधकाची जी खरी प्रगति होते, ती केवळ गूढ अनुभवांचा अक्रिय ग्राहक बनण्याने होत नसून, हृदयसंवेद्य उच्चतम अंत:प्रज्ञेला आचरणांत उतरविण्यानेच होते.



# १९ : अध्यात्मजीवनांतील गूढ विद्येचें स्थान

## भाग २ रा

## अध्यात्मजीवनाचा गूढ आधार

मानवाचें पृथक् व तुटक आस्तित्व केवळ कल्पनारचित आहे, हें सत्ताविस्तारांतील आंतरिक क्षेत्रांचें किंचितहि ज्ञान असणाऱ्यांना माहीतच आहे. लोकांची इच्छा असो वा नसो, व त्यांचा परस्परांशीं स्थूल जगामध्ये संबंध नसतांनाहि, त्यांच्या केवळ अस्तित्वामुळेच त्यांचें परस्परविषयक आदान-प्रदान किंवा आघात-प्रत्याघात ( actions and interactions ) सतत चालूच असतात. माणसाच्या प्रभाव-प्रसरणाला सीमाच नाहीत. सूक्ष्म क्षेत्रांतील वैद्युतिक प्रवाह देशसीमा किंवा इतर रूढ बंधनांनी सीमित होत नाहीत. चांगले व वाईट विचार, आल्हादयुक्त व उद्विग्न वृत्ति, उदात्त व भव्य भाव व तसेच क्षुद्र व संकुचित भाव, स्वार्थरहित आकांक्षा व स्वार्थपर लालसा हे सर्व, शब्दांत किंवा कृतींत व्यक्त झाले नसतांनाहि, फैलावून

अंतरस्थ भूमिकांवर, लोकांमध्ये परस्परसंबंधी आदान-प्रदान सतत चालूच असते.

इतरांना प्रभावित करतात. तेव्हा, **स्थूल जगाप्रमाणेच मनःसृष्टीहि एकसूत्रमय व्यवस्था** ( unified system ) **आहे.** अध्यात्म-जीवनाचे माध्यम, या दृष्टीने स्थूल जगालाहि स्वतःचेच असें निर्विवाद महत्त्व आहेच. परंतु, निरनिराळ्या माणसांचें परस्परांच्या-मधील केवळ स्थूल जगांतील घेणे देणेच लक्षांत घेतल्याने, त्यांच्या-मधील वास्तविकपणें अस्तित्वांत असणाऱ्या सर्व संबंधांचा पूर्ण आढावा घेतला जात नाही.

कांही गोष्टी अशा आहेत, की आंतरिक भूमिकांमध्ये घडणाऱ्या घटना लक्षांत घेतल्याशिवाय, त्यांचें पूर्ण रहस्यच समजून येत नाही; सत्पुरुष व सद्गुरु, याचे दर्शन म्हणजे अशीच एक गोष्ट आहे.

दर्शन व सहवास यांचे महत्त्व.

सत्पुरुष व सद्गुरु, यांच्या दर्शनाला प्राचीन ऋषींनी फार महत्त्व दिलें आहे. कारण, **त्यांचा शब्दांच्या द्वारा उपदेश मिळाला नाही, तरी त्यांच्यापासून प्रसृत होणाऱ्या प्रकाश व प्रेम, यांच्या सतत प्रवाहामुळे, साधकाच्या अंतःकरणाला अनिवार्य व प्रभावपूर्ण प्रेरणा होते.** दर्शनाचा परिणाम साधकाच्या ग्रहण-शीलतेवर व प्रत्युत्तरा ( response ) वर अवलंबून असतो; व दर्शनास होणारी साधकाची प्रतिक्रिया ही त्याच्या पूर्वसंबंधांनी व संस्कारानी निश्चित होत असते. पुष्कळ वेळां, गुरूच्या केवळ दर्शनानेच साधकाची पूर्ण तृप्ति होते; व त्याच्यापासून आणखी कांही मिळविण्याची त्याला इच्छाच राहात नाही. गुरूच्या दर्शनानेच समाधान व अत्यानंद लाभणे, यांत एक विशेष आहे; कारण त्यांत अध्यात्मजीवनास अत्यावश्यक असलेले, निरिच्छता व प्रेम, हे गुण साधकात उतरले असल्याचें दिसून येतें.

एकदा परम प्रियतमाचें दर्शन लाभल्यावर, साधकास एकच इच्छा उरते; व ती म्हणजे त्याचें दर्शन उत्तरोत्तर अधिक मिळण्याची इच्छा. आंतरिक आध्यात्मिक प्रेरणेमुळे, साधकाला सद्गुरूचें दर्शन व सहवास शक्य तितके अधिक हवेसे वाटतात. सद्गुरूच्या दर्शनाचा पावन परिणाम त्या सहवासाने अधिक पक्का व प्रभावपूर्ण होतो. शिवाय, सहवासामुळे, साधक जीवनांतील आंतरिक भूमिकांमध्ये सद्गुरूच्या अधिक सन्निध जातो.

सद्गुरूचे चरण.

दर्शनाप्रमाणेच सद्गुरूच्या चरणीं विनत होण्याचेंहि फार महत्त्व आहे. पाय हे स्थूल दृष्टीने शरीरामध्ये, सर्वांत खाली असले, तरी अध्यात्मदृष्टीने, त्यांचें स्थान फार मोठें आहे. स्थूलदृष्टीने, पाय चांगल्या व वाईट, सुंदर व विद्रूप, स्वच्छ व घाणेरड्या, अशा सर्व वस्तूंतून जात असले, तरी ते त्या सर्वांच्या वरच राहतात. त्याचप्रमाणे, अध्यात्मदृष्टीने, सद्गुरूचे पाय सर्व विश्वाहून श्रेष्ठ असतात; कारण, हे सर्व विश्व त्यांना मातीमोल असते. जेव्हा लोक सद्गुरुसन्निध येऊन, स्वतःच्या हाताने त्याच्या चरणांस स्पर्श करतात, तेव्हा ते आपल्या संस्कारांचें ओझें त्याच्यावर टाकतात. ज्याप्रमाणे, साधारण मनुष्य चालतांना जमीनीवरील धूळ आपल्या पायांवर घेतो, त्याचप्रमाणे, सद्गुरु अखिल विश्वांतले संस्कार स्वतःवर ओढून घेतो. सद्गुरूचें दर्शन घेतल्यानंतर, साधकाने त्याचे पाय मधुयुक्त दुधाने धुवून, त्याच्यासमोर एक नारळ ठेवण्याची, एक फार प्राचीन रूढि आहे. मधाने लाल संस्कार व दुधाने पांढरे संस्कार अभिप्रेत होत असून, नारळाने मन अभिप्रेत होतें. तेव्हा, सद्गुरूवर संस्कारांचें ओझें टाकून, त्याला आपलें मन अर्पण करणें, हाच या

कांही भागांत रूढ असलेल्या, सद्गुरूस अभिवादन करण्याच्या पद्धतींचा गर्भितार्थ आहे. अशा प्रकारे आपलें आंतरिक धोरण निश्चित करणें, म्हणजे अध्यात्मपथांत प्रविष्ट होण्याकरिता, पहिलें अत्यंत महत्त्वपूर्ण पाऊल टाकणें होय.

एक वेळेस सद्गुरूच्या दर्शनाचा आनंद साधकाला लाधला, म्हणजे तें दृश्य त्याच्या हृदयपटलावर कोरलें जातें. व व्यक्तिशः तो सद्गुरुसमागम करूं शकला नाही, तरी सद्गुरुची महत्ता समजाऊन घेण्याकरिता, त्याचे मन पुनःपुनः सद्गुरुकडे वळतें. गत अनुभवातील घटना आपल्या कल्पनाचक्षूसमोर आणण्याच्या प्रक्रियेहून, सद्गुरूशीं मनोमय संपर्क करण्याची ही प्रक्रिया मूलतःच भिन्न आहे. साध्या कल्पनाविलासातील गत गोष्टींच्या स्मरणांत विशिष्ट उद्देश नसतो; परंतु मानसिक संपर्क ( mental contact ) करण्यांत, विशिष्ट उद्देश असतो. उद्देशाच्या निर्देशक शक्तीमुळे, कल्पकता ही केवळ मनांतल्या मनांत चालणारा विचारांचा विलास न बनतां, ती सद्गुरुप्रत जाऊन त्याच्याशीं संपर्क प्रस्थापित करते. सद्गुरुच्या खऱ्या स्थूल दर्शनाइतकाच सद्गुरूचा मानसिक संपर्कहि परिणामकारक व प्रभावी असतो. अशा संपर्काची पुनः पुनः आंतरिक पुनरावृत्ति करण्याने, सद्गुरु व साधक या दोहोंमध्ये प्रवाहपथाची रचना होते; व त्यांच्यांत कितीहि दृश्यमान अंतर असलें, तर त्या प्रवाहपथांतून, साधकाला सद्गुरूपासून प्रसृत होणारी कृपा, प्रेम व प्रकाश, हे मिळतात. याप्रमाणे, **सद्गुरूच्या स्थूल सहवासांत असणाऱ्यांनाच त्याची मदत मिळते, असें नाही; तर ती त्याचें स्मरण करणाऱ्यांनाहि मिळते.**

मानसिक संपर्क.

शिष्याच्या व्यक्तिगत गरजांकडे, सद्गुरूचें दक्षतापूर्वक लक्ष

असतें; व शिष्याच्या प्रगतींत अडथळा आणणाऱ्या व त्याला पथभ्रष्ट करणाऱ्या गोष्टींपासून सद्‌गुरु त्याचें रक्षण करतो. कित्येक वेळीं, तो शिष्याला तात्पुरता एकान्तवास पतकरण्यास सांगतो; कारण, त्यामुळे, त्याच्या आध्यात्मिक उन्नतीस प्रतिकूल असणाऱ्या संपर्कापासून त्याचा बचाव होतो. पूर्वीचे योगी, गुरूच्या आज्ञेने स्वतःचें अन्न शिजवीत व भोजनसमयीं कोणालाही हजर राहूं देत नसत. कारण, त्यांना वाईट माणसांच्या दृष्टीचे संस्कार टाळावयाचे होते. स्वच्छ कपडा धुळीने लवकर घाण होतो, त्याप्रमाणे, शिष्यावर दुसऱ्याच्या कामवासनेचे संस्कार चटकन बसून, तो त्यांनी प्रभावित होतो. पथांत नसलेल्या इतर लोकांच्या सहवासामुळे उत्पन्न होणारी गुंतागुंत टाळण्याची साधकाला प्रथम अवस्थेमध्ये अत्यंत आवश्यकता असते. परंतु, एखाद्या विशिष्ट परिस्थितींत, अगदीच आवश्यक असेल, तेव्हा, सद्‌गुरु कांही लोकांचे संबंध व सहवास तोडण्याची खास आज्ञा देतो. शिष्य नेहमी सद्‌गुरूच्या सन्निध असला, तर ह्या सर्व गोष्टी आपोआप ,साधून, खास एकांतवासाची त्याला फारशी जरूरच राहात नाही. शिष्याचा जगाशीं बाहेरून संबंध राहिला, तरी त्याच्या सद्‌गुरूशीं 'असलेल्या आंतरिक संबंधामुळे, तो जगापासून मनाने अलिप्तच राहतो.

कांही गूढ परिस्थितींमध्ये विशेष सावधगिरीची आवश्यकता असूं शकते.

ज्याप्रमाणे, सद्‌गुरु जवळच्या शिष्याला अनिष्ट संबंध व संपर्क, यांपासून दूर ठेवतो, त्याचप्रमाणे, शिष्याच्या हितास पोषक असेल, तेव्हा, तो नवीन संबंध घडवूनहि आणतो. त्याला सर्वांच्या संस्कारांची व कर्मसंबंधांची गुंतागुंत पूर्णपणे टाऊक असते. म्हणून, त्याने

जाणीवपूर्वक घडवून आणलेल्या संबधांमुळे, महत्त्वपूर्ण पारस्परिक देवघेव व क्रियाशीलता उत्पन्न होऊन, अगदी जवळच्या मार्गाने, व थोड्या त्रासांत, त्या परिस्थितींतील सर्वांच्याच प्रगतीला मदत होते. **लोकांचे पूर्वीचे जन्म, त्यांचे संस्कार, व त्यांचे परस्परसंबंध, यांचे सद्गुरूला ज्ञान असतें; व त्यांच्या मानसिक शक्तीचा अपव्यय टाळून, तिला उत्कृष्टपणें फलदायी करण्याकरता, तो आपल्या ज्ञानाचा उपयोग करतो.**

साहाय्यक संबंध व सहवास.

आतारिक भूमिकेंत सातत्य व एकता असल्यामुळे, आपल्या कार्या-करिता, सद्गुरु शिष्याचा माध्यम म्हणून उपयोग करूं शकतो; व जेव्हा शिष्य, याप्रकारे सद्गुरूच्या विशालतर उद्दिष्टाचें साधन बनतो, तेव्हा त्याला त्याची जाणीव असतेच असें नाही. हें शक्य आहे; कारण, सद्गुरूविषयक शिष्यास असलेलें ज्ञान व प्रेम, यांच्यामुळे सद्गुरु व शिष्य, या दोहोंत संवादिता ( rapport ) व समस्वरता उत्पन्न होत असते. सद्गुरूच्या प्रत्यक्ष सहवासांत असणाऱ्यांना त्याची मदत प्रत्यक्षपणें मिळते; व ज्यांचा त्याच्या शिष्याशीं निकट संबंध येतो, त्यांना ती मदत अप्रत्यक्षपणे ( म्हणजे शिष्याच्या द्वारां ) मिळते.

शिष्याचा माध्यम म्हणून उपयोग.

आध्यात्मिक कार्यातील भागीदारी एकांगी नसते. सद्गुरूचें आध्यात्मिक व जागतिक कार्य चालू असतां, जे शिष्य त्याचे चिंतन व ध्यान करतात, त्याना सर्वांना त्या कार्यांत, एक प्रकारे, भाग घेण्याचें श्रेय मिळतें. अनंततेशीं ऐक्य पावल्यामुळे, सद्गुरु हा कालातीत राहून व कालगत बंधनाच्या पलीकडे असतो. परंतु, मानवतेची

सद्गुरु हा वितरण-केंद्र बनतो.

आध्यात्मिक उन्नति साधण्याकरिता, तो कालबंधनांचा स्वीकार करीत असल्यामुळे, त्याच्या कार्यांत शिष्यांच्या स्वेच्छाप्रेरित सहकारितेची मदत होऊं शकते. **शिष्यापासून मिळणाऱ्या प्रेमास सद्‌गुरु आत्मसात् करतो; व त्यांतून उत्पन्न होणाऱ्या आध्यात्मिक शक्तींचा उपयोग, तो आपल्या जागतिक कार्याकरता करतो.** एखादें गाणें स्वतः ग्रहण करून, नंतर सर्व जगांत फैलावणें ( broadcast ) हें वितरणकेंद्रा ( relaying station ) चें कार्य असतें; व उपरिनिर्दिष्ट दृष्टीने पाहतां, सद्‌गुरु हाहि एक प्रकारचें वितरणकेंद्र असतो. सद्‌गुरूवर प्रेम करणें म्हणजे सर्वांवर प्रेम करणें होय; व हें केवळ लाक्षणिक अर्थाने नव्हे, तर वस्तुतःच खरें आहे. सद्‌गुरूला, सूक्ष्मतर भूमिकांमध्ये, जे कांही मिळतें, त्याचें तो उदात्तीकरण करतो; व मग तो ते इतराना वांटून देतो. या प्रकारें, स्वतःशीं असलेले शिष्याचे संबंध सद्‌गुरु अधिक दृढ करतो; एवढेंच नव्हें, तर तो त्यांना आपल्या ईश्वरी कार्यामध्ये, साथीदार होण्याचा विशेष लाभ देतो.

विश्वरूपी भुलभुलय्यामधून बाहेर पडून, शिष्याने ईश्वरप्राप्तीची इच्छा करावी, या हेतूने, सद्‌गुरु, अनेक उपायांनी त्याला स्वतःच्या स्वरूपांत समाविष्ट करण्याचा प्रयत्न करतो. साधकामध्ये ईश्वराची इच्छा प्रथमपासूनच असते. परंतु साधकाचा अंतश्चक्षु

अंतश्चक्षु

उघडून, सद्‌गुरु त्याच्या त्या प्राथमिक इच्छेला अधिक तीव्र व स्पष्ट करतो. **अंतश्चक्षु उघडला, म्हणजे ज्या ईश्वराविषयी तळमळीचा शोध सुरू असतो, तो ईश्वर प्रत्यक्ष-पणें दिसतो.**

केवळ तर्काच्या किंवा कल्पनेच्या द्वारां ईश्वराचा शोध

करीत असतांना, आत्म्याला त्याच्याशीं ऐक्य पावण्याची इच्छा असते. परंतु अंतर्मुख होऊन, आत्म्याची दृष्टि परमतत्त्वावर खिळली, म्हणजे ही इच्छा अधिक तीव्र होते. योग्य वेळ आली, म्हणजे सद्गुरु हा अंतश्चक्षु एका क्षणात उघडूं शकतो.

ईश्वर हेंच एकमेव सत्य असून, आपण त्याच्याशीं वस्तुतः एकरूप आहोंत, हेंच अखेरीस साधकाने अनुभवावयाचें असतें. ह्याचा अर्थ असा, की अनेकविध जगताच्या दृष्यामुळे त्याने प्रभावित होतां कामा नये. खरें पाहिल्यास, अखिल विश्व आत्म्यामध्ये समाविष्ट झालें असून, त्याची उत्पत्ति आत्म्यांतील 'ॐ'ने निर्दिष्ट असलेल्या बिंदूपासून होते. परंतु, कोणत्या ना कोणत्या तरी माध्यमांतून अनुभव गोळा करण्याची आत्म्याला सवय लागली असल्यामुळे, त्याला हें विश्व स्वतःहून भिन्न, दुर्लंघ्य व प्रतिस्पर्धिस्वरूप भासतें. प्रत्येक व्यक्तीमध्ये असलेल्या ह्या 'ॐ' बिंदूपासून, सर्व विश्व उद्भूत होत आहे, असे ईश्वरप्राप्त पुरुषांना सतत दिसूं शकतें.

ॐ बिंदु

इंद्रियसंवेद्य ज्ञानाची प्रक्रिया ( process of perception ) ही सृष्टीच्या प्रक्रियेबरोबर समांतर चालते. जाणीव नष्ट न होऊं देतां, इंद्रियज्ञानाची प्रक्रिया उफराटी केली, म्हणजे विश्वाच्या पृथक् अस्तित्वाची शून्यता प्रतीत होते. आत्मा प्रथम मनांतून, मग सूक्ष्म चक्षूंनी व नंतर स्थूल नेत्रांनी पाहतो. आणि तो जें जें पाहूं शकतो, त्या सर्वांहून तो स्वतः विशालतर आहे. विस्तीर्ण महासागर व विशाल अंतराल, हे आत्म्याशीं तुलना केल्यास, अणुसमान आहेत. खरें पाहतां, आत्म्याला दृश्यमान

इंद्रियप्रत्यक्ष ज्ञानाची प्रक्रिया उफराटी करणे.

होणारें सर्व कांही सीमित आहे; पण स्वतः आत्मा मात्र सीमारहित आहे. जेव्हा जेव्हा, पूर्ण चेतना कायम ठेऊन, आत्म्याला कांहीच भासमान होत नाही, तेव्हा तो स्वयंनिर्मित सृष्टि पार करून, स्वतःचें सर्वात्मकत्व जाणण्याच्या बाबतींत महत्त्वाचे पाऊल टाकतो.

जगापासून चेतना परावृत्त करण्याची व आत्मचेतन होण्याची प्रक्रिया चालू असतांना, चेतनेच्या सर्व देहरूपी माध्यमांवर अधिकाधिक संयम प्राप्त होतो. आतांपर्यंत उपयोगांत न आलेल्या

सिद्धि

**संयमकेन्द्रां** ( centres of control ) ना जागृत व क्रियाशील करून, अशा प्रकारचा संयम शक्य होतो; व या नवीन केन्द्रांचा व्यापार सुरू झाला, म्हणजे त्यापासून निरनिराळ्या गूढ शक्ति प्राप्त होतात. ‘ सिद्धी ’ म्हणून ज्या ओळखल्या जातात, त्या ह्याच गूढ शक्ति असून, साधकास आध्यात्मिक पूर्णता प्राप्त होण्यापूर्वीहि त्या त्याला प्राप्त होऊं शकतात. खरें पाहतां, गूढ शक्तींच्या प्राप्तीने अहंकाराची वृद्धि देखील होऊं शकते. आणि सिद्धींच्या प्राप्तींत साधकाला आसक्ति वाटू शकते; इतकेंच नव्हे, तर तो ऐहिक वासनांपासून विमुक्त झालेलाच असतो, असें नसल्यामुळे, तो त्यांचा उपयोग त्या वासनाच्या परिपूर्तीकरिताहि करण्याचा संभव असतो. तेव्हा, सिद्धींना अनुभूतीच्या मार्गांतील अडथळा मानले आहे, तें योग्यच आहे. परंतु, ईश्वरप्राप्तीनंतर, या सर्व गूढ शक्तींचें महत्त्व एकदम कमी होते. विश्वरूप शून्यांतच सिद्धींचें क्षेत्र आहे; व ईश्वरप्राप्त पुरुष हा परम सत्यामध्ये, अचलपणे व नेहमीकरिता, सुप्रतिष्ठित झाला असतो. परंतु, स्वतः ईश्वरप्राप्त पुरुषाकरता,

विश्व शून्यस्वरूप असलें, तरी विश्वबंधनांत फसलेल्या, इतर जीवांची जबाबदारी तो स्वेच्छेने आपल्या शिरावर घेऊं शकतो; आणि मग इतरांच्या आध्यात्मिक हिताकरिता, तो आपल्या गूढ शक्तींचा, मोकळेपणाने व यथोचित उपयोग करूं शकतो.

ईश्वरी योजनेची अम्मलबजावणी.

ज्ञानी सद्गुरूंचे ज्यावर प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष नियंत्रण नाही, असें कोणतेंच क्षेत्र नाहीं. लढाया, क्रान्ति, सांथीचे रोग, याप्रमाणे महत्त्वाच्या सामाजिक घटना, व त्याचप्रमाणे भूकंप, पूर इत्यादि नैसर्गिक घटना, — या सर्वांवर सद्गुरूंचें नियंत्रण व दिग्दर्शकत्व असते. आणि ज्या उच्च भूमिकांवर सद्गुरु जाणीवयुक्त रीतीने अधिष्ठित असतात, त्या भूमिकांतील महान् शक्तींच्या विमोचनाने असें नियंत्रण शक्य होतें. **सहकारशील व सुव्यवस्थित आध्यात्मिक कार्य** करण्याकरता देखील, सद्गुरु आपल्या गूढ शक्तींचा उपयोग करूं शकतात. मानवतेची आध्यात्मिक उन्नति साधण्याकरिता, ते उच्च भूमिकावर, कित्येक वेळां सभा व अधिवेशनें भरवितात. **सर्वांमधील परमात्मा ( oversoul ) हा एकच असून, त्याचें कार्यहि एकाच वस्तूप्रमाणे होत असतें.** ज्यांना ह्या एकतेची जाणीव झाली आहे, त्याची असीम जबाबदारी घेण्याची तयारी झालेली असते. कारण, मानवी मनाची निम्नतर मर्यादिता गळून गेल्यामुळे, ते इतके स्वार्थरहित व सर्वहिततत्पर झालेले असतात, की **ईश्वरी योजनेची पृथ्वीवर अम्मलबजावणी व अग्रगति करण्याकरता, ते उपयुक्त माध्यम ( effective vehicles ) बनतात.**

---

# २० : अध्यात्मजीवनांतील गूढविद्येचे स्थान

## भाग ३ रा

### गूढविद्या व आध्यात्मिकता

विश्व व मानवी व्यक्तिमत्ता, यांच्या विषयींच्या ज्ञानाचा गूढविद्या ( occultism ) हा एक भाग आहे; आणि या बाबतींत एतद्विषयक इतर शास्त्रांहून, गूढविद्या तत्त्वतः भिन्न नाही. इतर

गूढविद्येचें शास्त्र

शास्त्रांमध्यें, सर्वसाधारण दृष्टीच्या व कर्तबगारीच्या क्षेत्रांत असणाऱ्या बाजूंचा व शक्तींचा विचार केला जातो; व गूढविद्येमध्ये, सर्वसाधारण दृष्टीच्या व कर्तबगारीच्या आटोक्याबाहेर असलेल्या गुप्त बाजूंचा व शक्तींचा विचार केला जातो;—ह्यामुळेच इतर शास्त्रें व गूढविद्या, या दोहोंतील फरक उत्पन्न होतो. गूढविद्येची वाढ होण्याकरता, मनुष्याच्या आत्म्यामधील सुप्त शक्ति अनावृत झाल्या पाहिजेत.

आधुनिक काळांतील, मनांतील गुप्त शक्तींचें संशोधन करणारे संघ ( psychical research societies ) गूढ विद्येला इतर

विद्यांप्रमाणेच मानतात. प्रथमदर्शनीं, इतर तार्किक ज्ञानाहून गूढ विद्येला, तत्त्वतः कमी किंवा अधिक महत्त्वाची मानण्याकरिता, विशेष कारण आढळून येत नाही. संघटित होऊन व सहयोगपूर्वक, हे संघ गूढ विद्येचा अभ्यास करतात. अशा प्रकारच्या ज्ञानाने, आध्यात्मिक आकांक्षा व प्रयत्न, यांच्याकरिता योग्य पार्श्वभूमि निर्माण होऊन, साधारण माणसाचा दृष्टिकोण–त्याची परिस्थिति लक्षांत घेतां, सत्याच्या शक्य तितका निकट येतो. म्हणून, आत्म्याचें अमरत्व व जन्मपरंपरा, निरनिराळ्या देहांचें व भूमिकांचें अस्तित्व व उत्क्रांतीचे व कर्मविपाकाचे नियम,–ह्यासंबंधीचें कांही तात्त्विक ज्ञान, बहुजनसमाजाला मधूनमधून देणें, सद्गुरुनींहि उचित मानलें आहे. परंतु, अशा कांही मूलभूत तत्त्वांचें सर्व-साधारण ज्ञान सोडून, गूढ तत्त्वांचें सविस्तर ज्ञान देण्याला सद्गुरुंनी फारच कमी महत्त्व दिलें आहे; व गूढ शक्तींचे उपयोगक्षम व कलात्मक ज्ञान तर त्यांनी अत्यंत गुप्त ठेवलें आहे.

गूढ विद्येच्या प्रसाराच्या सीमा.

जाणणारे व न जाणणारे यांमधील फरक गूढविद्येच्या क्षेत्रांत, इतर शास्त्रांपेक्षा, अधिक तीव्र व महत्त्वपूर्ण आहे. इतर शास्त्रांमध्ये, केव्हा केव्हा, प्रत्यक्ष ज्ञानाची जागा अप्रत्यक्ष ज्ञानाने, कांही अंशीं भरून येऊं शकते. परंतु, गूढविद्येमध्ये, अर्थाच्या व महत्त्वाच्या बाबतींत, अप्रत्यक्ष ज्ञान, हें प्रत्यक्ष ज्ञानाची मुळीच बरोबरी करूं शकत नाही. म्हणून, गूढविद्या हें अत्यंत महत्त्वाचें शास्त्र असलें, तरी गूढ तत्त्वांबद्दलच्या केवळ तात्त्विक माहितीचा प्रसार करण्याला फारसें महत्त्व नाही.

जाणणारे व न जाणणारे.

त्यांच्याकरता, ही गूढ तत्त्वें, न पाहिलेल्या देशांच्या वर्णनाप्रमाणे, किंवा कल्पित कादंबरीप्रमाणेच राहणार.

शास्त्र या दृष्टीने, गूढविद्या जवळ जवळ इतर शास्त्रांसारखीच आहे, असें म्हणतां येईल; परंतु, **कला या दृष्टीनें, गूढविद्या ही अनुपम आहे.** तरी कधींकधीं, गूढ तत्त्वांच्या केवळ बौद्धिक माहितीच्या प्रसारामुळे देखील, अनर्थ होऊं शकतो. कारण, त्यामुळे पोकळ जिज्ञासा वाढते; किंवा स्वार्थपर हेतु साधण्याकरिता, या अज्ञात शक्तींवर नियंत्रण मिळविण्याची वासना जागृत होऊं शकते. गूढ शक्तींमध्ये, विशेष आध्यात्मिक, असें कांहीच नाही. शास्त्रीय शोधाप्रमाणे किंवा इतर भौतिक शक्तीप्रमाणे, त्यांचाहि सदुपयोग किंवा दुरुपयोग होऊं शकतो. उच्च भूमिकामध्ये, त्यांच्यामुळे सहकारशील कार्याला अतिशय वाव मिळतो; परंतु, ह्याकरता, विशेष प्रकारची जबाबदारी स्वीकारण्यास लागणारी आध्यात्मिक तयारी आवश्यक असते.

गूढ विद्येची कला.

नवख्या माणसाला, शोध करीत असतांना, कांही गूढशक्ति प्राप्त होणेंहि शक्य असते. परंतु, साधकामध्यें, जर या नवीन शक्तीमुळे प्राप्त होणारी नवीन जबाबदारी उत्कृष्ट रीतीने पार पाडण्यास आवश्यक असलेली आध्यात्मिक तयारी नसेल, तर ही सिद्धि त्याच्याकरता वरदान न ठरून अभिशापच ठरेल. गूढ शक्तीचा किंचितहि दुरुपयोग झाला, तर त्यामुळे प्रतिक्रिया होऊन, आत्म्यास बंधन उत्पन्न होतें. कधीकधी त्यामुळे, साधकाची प्रगति बंद होते, इतकेंच नव्हे तर त्याची बरीचशी अधोगतीहि होते. **गूढ शक्ति प्राप्त झाल्यामुळे, साधकाला इतर लोकांशीं तुलना**

गूढ शक्तीचा दुरुपयोग.

करतां, विशेष व दुर्जेय फायदा मिळालेला असतो; व त्या शक्तींचा त्याने अनुचित उपयोग केल्यास, तो स्वतःचा आध्यात्मिक नाश करूं शकतो, इतकेंच नव्हे, तर तो इतरांचेंहि अपरिमित नुकसान करूं शकतो.

ज्ञानी सद्गुरूंच्या हातातील गूढ शक्तीमध्ये धोका नसतो, इतकेंच नव्हे, तर मानवतेच्या सेवेकरिता, तिचा अत्यंत उपयोग होऊं शकतो. परंतु, तेहि गूढ शक्तीचा उपयोग क्वचितच व अल्प प्रमाणांत करतात. गूढ विद्येच्या उपयुक्त कले ( occultism as an art ) ला स्वतःच्याच अशा नैसर्गिक सीमा आहेतच. मानवतेच्या ऐहिक गरजांकरिता, किंवा भौतिक हेतूकरिता, गूढ शक्तीचा विस्तृत उपयोग करतां येत नाही. लोकांच्या सामान्य व्यवहारामध्ये, गूढ शक्तींचा उपयोग करून, अनिश्चित व अपरिमेय तत्त्व आणल्यास, साधारण मानवी व्यवहारांमध्ये, घोटाळा व अव्यवस्था माजेल; व कर्मनियम समानतेने व अबाधितपणे लागूं पडण्याकरता, लोकांना स्वतःच्याच सीमित शक्तींवर व संभाव्यतां ( possibilities ) वर अवलंबून ठेवले पाहिजे. ह्याच कारणांमुळे, गूढ शक्तीचा उपयोग केवळ आध्यात्मिक हेतू साधण्याकरताच व्हावा, अशी तिची कडक मर्यादा आहे.

केवळ आध्यात्मिक उद्दिष्टांच्या परिपूर्तीकरिताच गूढविद्येच्या उपयुक्त कलेचा विनियोग झाला पाहिजे.

क्वचित् प्रसंगीं, संत लोक, भक्तांच्या कांही ऐहिक इच्छाहि पुरवितात. त्यांना स्वतःला ऐहिक गोष्टींचें मुळींच महत्त्व नसतें;

परंतु, भक्तांना भौतिक वासनांपासून पराङ्मुख करण्याकरिताच ते याचा अवलंब करतात. मुलें फार लहान असतात, तेव्हा पाटीवर काढलेल्या अक्षरांकडे लक्ष देण्यास, त्यांना प्रवृत्त करतां येत नाही; व त्यांचें लक्ष अक्षरांकडे वेधण्याकरिता, मोठीं माणसें कधीकधी, त्यांना गोड पदार्थांचीं बनविलेलीं अक्षरें बक्षीस देतात. आणि, अक्षरांत गोडी वाटते म्हणून नव्हे, तर गोड पदार्थांतील अभिरुची-मुळे, मुलें तशा अक्षरांकडे लक्ष देतात. पण बहुधा, हा केवळ अक्षरांतच अभिरुचि घेण्याचा प्रारंभ ठरतो; व एकदा अक्षरांमध्ये, अभिरुचि उत्पन्न झाली, म्हणजे मिठाईचा उपयोग हळूच टाकून देण्याने, कांहीहि नुकसान होत नाही. संसारासक्त लोक असेच लहान मुलांसारखे असतात. ज्याप्रमाणे मुलगा चांगला व्हावा, म्हणून बाप त्याला एखादे वेळीं चॉकोलेट देतो, त्याचप्रमाणे, संसारासक्त भक्त ऐहिक वासना सोडून, आध्यात्मिकतेमध्ये रत व्हावे, याकरिता, संतहि त्यांच्या कांही हानिशून्य ऐहिक इच्छा पुरवितात.

आध्यात्मिक हिताकरिता भौतिक प्रलोभन.

संसारासक्त लोक भौतिक वासनांमध्ये, इतके गर्क झाले असतात, कीं त्या तृप्त करण्याशीं कांहीतरी संबंध असल्याशिवाय, त्यांना कोणत्याच गोष्टीमध्ये रुचि वाटत नाही. परंतु कधीकधी भौतिक प्रश्न सुटण्यामध्ये साहाय्य मिळावें, म्हणून ते संतांकडे येऊन, त्यांची आदराने सेवा करतात; आणि, जेव्हा कोणी संतां-कडे आदरयुक्त अंतःकरणाने येतो, तेव्हा तो दुसऱ्या कोण-त्याहि उद्देशाने आला असला, तरी त्याला आध्यात्मिक साहाय्य करणें, हें त्या संतांचें कर्तव्यच होत असतें. संताला मानवी

मनांत ऐहिक हेतु ठेवून संतांकडे जाऊं नये.

मनाचें विशालतर ज्ञान असतें व म्हणून त्या मनुष्याला खऱ्या आध्यात्मिकतेकडे सहजपणें आकर्षण करून घेण्याकरिता, तो त्या मनुष्याला भौतिक-स्वरूपाचें साहाय्य देण्याचेंहि ठरवील. परंतु आध्यात्मिक हेतूकरिता, अशा प्रकारचें भौतिक प्रलोभन देणें, हा साधारण फायदा नसून, त्याचा अपवाद आहे. व बहुधा स्वतःकडे एखाद्या भौतिक फायद्याकरता येण्याच्या बाबतींत, ते लोकांना निरुत्साहित करतात. एखाद्या स्वार्थमूलक हेतूने प्रेरित होऊन, संतावर प्रेम करण्यापेक्षा, तो प्रेमास योग्य आहे, याच कारणाने, त्याच्यावर प्रेम करणें, आध्यात्मिक दृष्टीने अनंत पटीने श्रेष्ठ असतें. **केवळ आध्यात्मिक अभिरुचीमुळेच लोकांनी संताकडे जावे; व त्यांत दुसरा कोणताहि हेतु नसावा.** तेव्हांच त्यांना संतसमागमाचा अधिकाधिक फायदा मिळूं शकतो.

आध्यात्मिक उद्दिष्टांकरिता साधनीभूत असल्यामुळेच गूढ विद्येची उपयुक्त कला समर्थनीय ठरते. व तिचा दुसऱ्या कोणत्याहि कारणाकरिता उपयोग झाल्यास तो दुरुपयोग समजावा. केवळ भौतिक इच्छांकरिता तर तिचा कधीहि उपयोग करूं नये. मानवी वासनांची तृप्ति करणें, हा कांही गूढ शक्तीचा खरा उपयोग नाही; तर मानवी अंतःकरणाला पवित्र करणें, हाच गूढ शक्तीचा यथोचित उपयोग होय. **हीन वासनांचा त्याग करण्यास मदत करून मानवतेला अधिक पवित्र करणाऱ्या श्रेष्ठ शक्तींमध्ये, गूढविद्येतील शक्तींना महत्त्वाचें स्थान आहे.**

गूढ शक्तींचा उपयोग मानवतेला पवित्र करण्याकरिता केला जातो.

विकास झाल्यामुळें, ज्या लोकांमध्ये सुप्त मानसिक शक्ति

उदयोन्मुख झाल्या असतील, किंवा ज्यांच्या ह्या मानसिक शक्ति आधीच विकसित झालेल्या आहेत, परंतु ज्याची चेतना उच्चतर भूमिकामध्ये आकृष्ट झाल्यामुळे, स्थूल जगात अर्धजागृत आहे,– अशा लोकाच्या बाबतीत गूढविद्येचा कलात्मक उपयोग विशेषतः यथोचित व आवश्यक असतो. ह्या लोकांना जी भाषा समजू शकते, त्या भाषेतच त्यांच्याशी बोलले पाहिजे. बऱ्याचशा उन्नत साधकांना अनेक सिद्धि प्राप्त होतात. परंतु, त्यांना साधारण मानवाइतकीच आध्यात्मिक साहाय्याची आवश्यकता असते. त्यांना बऱ्याचशा गुप्त शक्ति प्राप्त असल्यामुळे, पूर्ण सद्‌गुरु त्यांना, कितीहि अंतरावर, सहज व फलदायी मदत करूं शकतात. जेव्हा उच्चतर भूमिकांवर, सद्‌गुरूचें साहाय्य, जाणीवयुक्त रीतीने ग्रहण करितां येते, तेव्हा स्थूल माध्यमांतून मिळणाऱ्या साहाय्यापेक्षां, तें अधिक प्रभावी होतें.

गूढ शक्तीच्या उपयोगाकरता विशिष्ट क्षेत्र.

अध्यात्मपथातील अग्रगतीमध्ये असणाऱ्या इतर अडचणी सोडून दिल्या, तरी उन्नत साधकांमध्ये, जो एक विशेष असतो, तो हा की त्यांच्या मुक्कामां ( station ) तील आनंदांत ते पूर्णपणे निमग्न झाल्यामुळे, स्थूल क्षेत्रांतील कार्य करण्याकरिता, खाली उतरणें, त्यांना अप्रिय वाटतें. उन्नत साधकाचें हें उतरणें, ईश्वरप्राप्त पूर्णपुरुषांच्या सप्तम भूमिकेंतील अनुभवातून होणाऱ्या अवतरणाहून भिन्न असतें. पूर्ण सद्‌गुरूचा परत प्रवास व त्याचे अनुभूतीनंतरचे निरनिराळ्या भूमिकांमध्यें स्थित होणें, हें स्वार्थरहित असून, प्रारब्धाचा परिणाम असतें. पूर्णपुरुष, आपआपल्या अधिकारभेदांप्रमाणे, या प्रारब्धाचा उपयोग

अवतरण किंवा खाली उतरणें

मानवतेच्या आध्यात्मिक उन्नतीकरता करतात. उदाहरणार्थ महंमद पैगंबर ईश्वराभूतीनंतर सातव्या भूमिकेंत स्थित झाला; व तसेंच बुद्ध व अजमीरचे मोइद्दिन खिस्ती पांचव्या भूमिकेंत स्थित झाले.

जेव्हा उन्नत साधक अंतस्थ भूमिकामध्ये अटकून जातात, तेव्हा त्यांची अध्यात्मपथावरील पुढची प्रगती द्रुततर करण्याकरता, त्यांना खाली उतरविण्यांत येतें. उदाहरणार्थ, जेव्हा साधक तिसऱ्या व चवथ्या भूमिकांमध्ये फसून जातो, तेव्हा सद्गुरु त्याला चवथ्या भूमिकेवर ढकलण्यापूर्वी, तिसऱ्या भूमिकेवर खाली आणतो. परंतु, कित्येक वेळां, उंच भूमिकेवरून खाली उतरणें, संसाररूपी अरण्यांत भटकत असलेल्या, व अद्याप पथप्रविष्ट नसलेल्या लोकांच्या करिता देखील, आवश्यक असतेच. केव्हा केव्हा, सद्गुरु प्रगत साधकाच्या द्वारां, एखादे आध्यात्मिक कार्य करून घेण्याचें ठरवून, ते होईपर्यंत, स्वतःची व्यक्तीशः प्रगति करण्याचें प्रयत्न थोपविण्याची आज्ञा देतो. अखेरीस, हें अवतरण, म्हणजे पथांतील पुढचा टप्पा त्वरित व निर्विघ्नपणे पार करण्याकरिता, पूर्वतयारीच असते. परंतु, असें असूनहि, इतरांना मदत करण्याकरिता, स्वतःस मिळालेले फायदे सोडून देणें, साधकाला फार कठीण वाटते. पांचव्या भूमिकेवर अनंततेचें दर्शन व ज्ञप्ति ( illumination ) मिळत असल्यामुळे, तेथून उतरणें विशेषतः कठीण असतें. सूफी पंथात या स्थितीला ' हैरत ' म्हणतात. या अवस्थेमध्ये, साधकाला स्वतःस ज्ञप्तीपासून अलग ठेवणें अशक्यप्राय होतें. परंतु, केव्हा केव्हा, ज्ञप्तीमध्ये लय पावण्याचा मोह आवरून जगांतील इतर लोकांकरिता खाली उतरणें जरूर असतें. उन्नत साधकाशी वागण्याची पद्धत सद्गुरूलाच माहीत असते; व तो साधकाला, अप्रिय वाटणाऱ्या क्रियाशीलतेचाहि अंगीकार करण्यास लावूं शकतो.

हें एका सुप्रसिद्ध वलीच्या गोष्टीवरून स्पष्ट होईल. ह्या वलीची समाधी अजमीरला असून, तेथे मोठी यात्रा भरत असते. त्याचे डोळे नेहमी उघडेच राहून ते तो बंद करूं शकत नसे; व काचे-

गंजेशक्करची गोष्ट

प्रमाणे झालेल्या त्याच्या डोळ्यांमध्ये धुंदी होती. तो पांचव्या भूमीवर होता. अजमीरचा ख्वाजा त्याचा गुरु होता; व त्याला शरीपासून दूर ठेवून, त्याला खाली उतरविण्याची त्याला इच्छा होती. परंतु, गुरूची आज्ञा मानणें त्याला फार जड वाटूं लागले. तेव्हा गुरूने किल्ली फिरवून, त्याला खालील मार्गाने, बळणावर आणले. ह्या वलीजवळ जाण्याची त्याने पांच चोरांना आंतरिक स्फूर्ति दिली. ते त्याच्याजवळ पांच पावलांच्या अंतरावर बसले व चोरून आणलेली लूट आपसांत वाटून घेऊं लागले. लवकरच त्यांच्यामध्ये भांडण सुरू झाले; व त्यांतील दोघांनी तिघांना ठार मारले. भांडणांत यशस्वी झालेल्या ह्या दोघांनी ती लूट आपसांत वाटून घेतली; व नंतर ते पळून गेले. परंतु पळून जात असतांना, ते त्या वलीच्या जागेच्या अगदी जवळून गेले; व ते त्या वलीच्या सन्निध जातांच, त्या वलीला साधारण जाणीव (normal consciousness) प्राप्त झाली. ह्या गुन्हेगारांच्या सान्निध्याच्या कठोर प्रत्याघाताने, तो खाली उतरला; व त्याला सभोवतालच्या परिस्थितीमध्ये काय चाललें आहे, याची जाणीव झाली. सर्वांत प्रथम त्याला कांहो चिमण्या दिसल्या; व त्याला स्वतःमध्ये स्फुरत असलेल्या नवशक्तींचा त्यांच्यावर उपयोग करण्याची इच्छा झाली. तो म्हणाला, " चिमण्यांनो ! मरून जा ! "; व त्याबरोबर चिमण्या मरून पडल्या. मग तो म्हणाला, " चिमण्यांनो उठा ! "; व लगेच जिवंत होऊन चिमण्या उडाल्या. त्या दोन चोरांना हा चमत्कार पाहून आश्चर्य वाटलें; व क्रोधवश होऊन,

ज्या तीन चोरांना त्यांनी ठार मारले होते, त्यांना पुन्हा जिवंत करण्याची, त्यांनी त्या वलीला विनंती केली. तेव्हा त्या तीन मेलेल्या चोरांना उद्देशून, तो वली म्हणाला, " चोरांनो उठा ! "; परंतु चोर उठले नाहीत. आपली शक्ती एकदम नाहीशी झालेली पाहून, तो भयभीत झाला; व थिल्लरपणाने, आपल्या शक्तींचा उपयोग केल्याबद्दल त्याला पश्चात्ताप होऊन, तो रडतच आपल्या गुरूकडे गेला. तो जेव्हा गुरूजवळ गेला, तेव्हा त्याला ते तीन चोर त्याचे पाय चेपीत असलेले दिसले. नंतर वली पुन्हा स्वस्थानीं गेला व भूक तहान सर्व विसरला. तो अत्यंत क्षीण झाला, तरी त्याने दहा वर्षेपर्यंत आपली जागा सोडली नाही; व पांढऱ्या मुंग्यांनी त्याचें शरीर खाण्यास सुरवात केली. लोक त्याच्या शरीराजवळ येऊन, साखरेचे ढीग ठेवीत; व ही साखर मुंग्या खात असत. त्याच्या शरीराच्या सभोवती नेहमी साखरेच्या गंजी असत; म्हणून लोक त्याला गंजेशकर म्हणत. प्रगत साधकांनांहि अनुभूतीच्या मार्गांत पुढे जाण्याकरता, सद्गुरूची मदत कशी घ्यावी लागते, तें ह्या गोष्टीवरून स्पष्ट होतें.

कशा प्रकारच्या प्रसंगामध्ये, गूढ रीतीचा व गूढ पद्धतीचा उपयोग करण्यांत येतो, ते ह्या गंजेशकरच्या गोष्टीवरून स्पष्ट होईल.

गूढ घटनांना स्वतःचेंच असें स्वतंत्र महत्त्व नसतें.

परंतु, हे नीट लक्षांत ठेवले पाहिजे, की कोणत्याहि श्रेणींतील गूढ घटनांना स्वतःचें असें मुळीच महत्त्व नसतें. गूढ किंवा प्रगट घटनांना, जें महत्त्व आहेसें वाटतें, तें सापेक्ष असतें, किंवा भ्रमात्मक असतें. जेव्हा एखाद्या गोष्टीमुळे, बदलत्या वासना उत्तेजित होतात, किंवा त्यांच्या तृप्तीचें आश्वासन मिळतें, तेव्हा त्या गोष्टीला खोटेंच असें भ्रमात्मक

महत्त्व येतें. या बदलत्या वासनांची व सीमित हेतूंची पार्श्वभूमि वगळली, तर त्या वस्तूवर आरोपित झालेली सर्व अर्थपूर्णता, एकदम नष्ट होते. जेव्हा एखादी गोष्ट सत्यानुभूति मिळण्याकरता किंवा सत्याच्या अभिव्यक्तीकरता साधन बनते, तेव्हा तिला सापेक्ष महत्त्व प्राप्त होतें. अशा गोष्टी ईश्वरी जीवनाला अत्यावश्यक असतात, म्हणून त्यांची महति असते; व त्यांचें महत्त्व सापेक्ष असलें, तरी भ्रमात्मक नसतें.

बरेचसे लोक कळत न कळत, गूढ घटनांना भलतेंच महत्त्व देतात; व त्यांनाच आध्यात्मिकता समजतात. चमत्कार व भुताखेतांच्या लीला ह्या त्यांना मनोवेधक वाटतात; व आत्मजीवनांत अभिरुची असल्याचें हें एक लक्षण मानण्यांत येते. परंतु गूढविद्या ( occultism ), व रहस्यपूर्ण गूढ अनुभव ( mysticism ) परलोकविद्या ( spiritualism ) व आध्यात्मिकता ( spirituality ), यांच्यामध्ये अगदी स्पष्ट व सुनिश्चित फरक आहे. आणि या भेदाचा पूर्ण अर्थ समजला नाही, तर घोटाळाच होतो.

गूढविद्या ही आध्यात्मिकतेहून निराळी असल्याचें जाणलें पाहिजे.

सर्व चमत्कार भासमान व छायामय सृष्टीचेच भाग आहेत. घटना या दृष्टीने, तेहि परिवर्तनशील आहेत; व जें जें बदलणारे आहे, त्याला शाश्वत महत्त्व नाही. परम तत्त्व असलेल्या अव्यय सत्ताविस्तारामध्ये प्रविष्ट होणें, म्हणजेच अनंत सत्याची अनुभूति होय; व गूढ जगताचें ज्ञान किंवा त्यांतील शक्तींचा उपयोग करण्याचें

एकच महत्त्वाची गोष्ट.

सामर्थ्य, म्हणजे कांही सत्यानुभूति नव्हे. स्थूल जगांतील साध्या घटनांप्रमाणेच, गूढ घटनां ( occult phenomena ) देखील, मिथ्या कल्पनेच्या सृष्टींतच आहेत. आणि, आध्यात्मिक दृष्टीने, फक्त एकच गोष्ट महत्त्वाची आहे;—व ती म्हणजे ईश्वरी जीवन प्राप्त करून, इतरांनाहि तें प्राप्त करण्यास मदत करणें, व रोजच्या व्यवहारांमध्ये तें व्यक्त करणें. अखिल वस्तुमात्राच्या अंतरंगांत व रहस्यपूर्णतेंत प्रवेश मिळवून, त्या आंतरिक सिद्धीचा सुगंध, इतरांच्या मार्गदर्शनाकरता, सत्य, प्रेम, पावित्र्य व सौंदर्य यांची रूपसृष्टीमध्ये अभिव्यक्ति करून, फैलाविणें ! या एकाच खेळाला अविकल व आंतरिक महत्त्व आहे. बाकीच्या सर्व घटना, गोष्टी व सिद्धि, यांना शाश्वत महत्त्व नाही.



# २१ : : जन्मपरंपरा आणि कर्म

## भाग १ ला

### मृत्यूचें महत्त्व

संसारी मनुष्य स्थूल शरीराच्या क्रियांनाच जीवनसर्वस्व मानतो; आणि म्हणूनच त्याच्या दृष्टीने, स्थूल शरीराच्या अस्तित्वाचा आदि आणि अंत हा व्यष्टिभूत आत्म्याचा (individualised soul) हि आदि आणि अंत असतो. त्याच्या सर्व अनुभवांत, स्थूल-शरीराचें क्षणभंगुरत्व व्यक्त होत असतें; आणि जीं स्थूल शरीरें एकदा चिन्मय होतीं, तींच विकल आणि छिन्नविछिन्न झालेलीं तो अनेकदा पाहातो. यामुळे, जीवन हें शारीरिक अस्तित्वाइतकेंच आहे, असा विश्वास धरण्यास, तो सहाजिकच प्रवृत्त होतो.

आत्मा व शरीर यांचें तादात्म्य.

भौतिक दृष्टीचा मनुष्य मृत्यूला जीवनाचा अंतच मानतो; आणि एकंदरींत त्याच्या दृष्टीने, मृत्यूस अतिशय महत्त्व असतें. मृत्यूवर

बराच कालपर्यंत विचार करणारे लोक क्वचित् आढळतात. मात्र आपल्या नित्याच्या व्यवहारांत पूर्णपणे गढून गेलेले असूनदेखील, आयुष्यांत मृत्यूचा प्रसंग पाहून, त्यांच्या मनावर परिणाम झाल्याशिवाय राहत नाही. बहुतेक लोकांच्या बाबतींत, अटळ आणि अपरिहार्य, अशी मृत्यूची घटना, या जीविताच्या देखाव्याची पार्श्वभूमि असते. आणि याची जाणीव त्यांच्या आनंदोत्सवांच्या, उपभोगांच्या, पराक्रमांच्या आणि विजयांच्या प्रसंगांमध्येहि न कळत प्रविष्ट होते.

मृत्यु ही जीवनाची पार्श्वभूमि आहे.

जीविताच्या या देखाव्याची मृत्यु हा पार्श्वभूमि बनतो; व शिवाय, जीवनांतील विविधरंगी प्रसंगामध्ये त्याला स्वतःला अतिशय व अवास्तव महत्त्व प्राप्त झालें आहे. अत्यंत भयप्रद आणि शोचनीय अशा गोष्टींमध्ये मृत्यूची गणना होते. कित्येक वेळां, मृत्यु ही एक अखेरची शिक्षा अगर तीव्र सूडाचा प्रकार होतो; किंवा मृत्यूला इतरांकडून आपणांवर होणारें अतिक्रमण थांबविण्याचा व त्यांचा आपल्या जीवनामध्ये हस्तक्षेप टाळण्याचा खात्रीलायक उपाय समजून, कित्येक लोक दुष्टपणाने अगर क्रोधावेशांत, दुसऱ्यांना ठार मारण्याचा प्रयत्न करतात. कित्येक लोक आत्मत्यागाचें उत्तम प्रतीक म्हणून स्वतःच्या मृत्यूस निमंत्रण करितात; आणि कित्येक वेळां, स्वतःस न सुटणाऱ्या जीवनांतील क्रूर प्रश्नांना व संकटांना कंटाळून, मृत्यु त्यांचा शेवट करीलच, या खोट्या आशेने लोक त्याला कवटाळतात. अशा तऱ्हेने, बहुतेक लोकांच्या मनांत मृत्यूला अवास्तव व असीम महत्त्व प्राप्त झालेलें असतें.

मृत्यूस दिलें गेलेलें महत्त्व.

साधारण जीवनाची निरंतरता.

कांही विशिष्ट रूपां(Forms)वर मनुष्याची आसक्ति बसते; व म्हणूनच, मृत्यूला हें अवास्तव महत्त्व आलें आहे. परंतु, जीवनाकडे पाहाण्याचा दृष्टिकोन जर थोडा अधिक विशाल केला, तर सर्व-साधारण मनुष्यास देखील, मृत्यूचें येवढें महत्त्व वाटणार नाही. आणि मृत्यूची कटुता त्याला इतकी बोचणार नाही. **रूपें क्षणभंगुर असलीं तरी वस्तुतः रूपारूपांमधूनहि जीवनाला अबाधित अखंडता असते; कारण स्वतःच्या अभिव्यक्तीकरता व निवासमंदिर म्हणून, जीवन जुनीं रूपें टाकून, नित्य नवीन रूपें धारण करीत असतें.** मृत्यूपरंपरेला जन्मपरंपरेची समतोलता देणारी जोड मिळते. मृत्यूचा हात अविरत चाललेला असून देखील जीवन–विकास चालूच असतो; जुन्या पिढ्यांच्या जागीं नवीन पिढ्या येतात; **स्वतःस सतत नवोत्साह आणि ताजेपणा आणीत, नवीन रूपांमध्ये जीवन व्यक्त होतें;** प्राचीन जीवनाचे प्रवाह निरनिराळ्या रूपांमधून प्रगती करीत सारखे पुढे जातात; आणि तीं रूपें मात्र, महासागरावरील लाटांप्रमाणे येतात आणि जातात.

विशिष्ट रूपांवरील आसक्तिमुळेच मृत्यूचें दुःख वाटते.

तेव्हा, मृत्यु हा अप्रतिहार्य आणि कधींहि भरून न येणारें नुकसान करणारा आहे, असें चुकीने मानल्यामुळे जी विषण्णता उत्पन्न होते, त्या विषण्णतेचा पुष्कळसा भार हलका करण्यापुरता बराचसा आधार सामान्य मनुष्याच्या मर्यादित अनुभवांत देखील असतोच. विशिष्ट रूपांबद्दल आसक्ति ठेवली नाही, आणि जीवनाचा केवळ वैयक्तिक दृष्टीने विचार केला नाही, तरच मृत्यूसंबंधीं योग्य वृत्ति ठेवतां येईल. परंतु, विशिष्ट रूपांवरील

आसक्तीमुळे, संसारी मनुष्यास नेमकी हीच गोष्ट कठीण वाटते. एक रूप त्याला दुसऱ्या रूपाइतकें चांगलें वाटत नाही. आणि ज्या स्वतःच्या विशिष्ट देहरूपाशी त्याचें तादात्म्य झालेलें असतें, त्याचें तर त्याला सर्वांत जास्त महत्त्व वाटतें. सर्वसामान्य जीवनप्रवाहाचें रक्षण आणि त्याची प्रगती, याचें त्याला काही विशेष महत्त्व वाटत नाही. केवळ स्वतःच्या व ज्यांच्याशीं तो संबद्ध झाला आहे, अशा इतर रूपांचें सातत्य आणि अखंडता मात्र त्यास हवी असते. त्याचें हृदय त्याच्या बुद्धीच्या निर्णयाचा स्वीकार करूं शकत नाही; आणि म्हणून, जीवनांत, एकंदरीत पाहता, गत रूपांची जागा नवीन रूपांनी घेतलेली त्याला आढळली, तरी जीं रूपें त्याला प्रिय असतात, तीं नाहीशीं झालीं, म्हणजे तो निरतिशय दुःखाने व्याकुळ होतो.

सूक्ष्म निरीक्षण केल्यास, मृत्यूबद्दलच्या दुःखाचें मूळ स्वार्थांतच आहे, असें आढळून येतें. जेव्हा, एखाद्याची प्रिय व्यक्ति मृत होते, तेव्हा तो तोटा एकंदरीने अखिल जीवनाच्या दृष्टीने पाहतां, कोठेतरी भरून निघाला असेलच, हें त्याला बौद्धिक दृष्ट्या समजतें; परंतु त्याला वाटत असतें, कीं 'मला काय त्याचें !' व्यक्तिविषयक दृष्टीने मृत्यूकडे पाहिलें, म्हणजे मनुष्यास तो अनंत दुःखाचें कारण आहे, असें वाटतें. परंतु, जीविताकडे सर्वसाधारण दृष्टीने पाहिलें असतां, मृत्यु ही एक क्षुल्लक घटना आहे, हें कळून येतें.

मृत्यूबद्दलच्या दुःखाचें मूळ स्वार्थांत.

व्यक्तिनिरपेक्ष ( impersonal ) विचार केल्यास, मृत्यूमुळे झालेल्या वैयक्तिक दुःखापासून, मनाचें पुष्कळ रक्षण होतें. परंतु,

सामान्य अनुभवाच्या मर्यादेंत, मृत्यूला पाहिलें असतां, जे गुंतागुंतीचे प्रश्न उद्‌भवतात, आणि ज्यांच्यामुळे मनुष्याची तटस्थ बुद्धिदेखील कुंठित होऊन जाते, असे प्रश्न केवळ व्यक्तिनिरपेक्ष विचाराच्या द्वारां, सुटूं शकत नाहीत. मृत्यु हा वैयक्तिक अस्तित्वाचा पूर्ण नाश आहे असें मानलें, तर विश्वामध्ये, मृत्यूमुळे कधीहि भरून न येणारें नुकसान होतें, असेंच म्हणावें लागेल. ज्याची जागा दुसऱ्या कोणाच्यानेहि व कशानेहि भरूं शकत नाही, अशी कांहीतरी अलौकिक देणगी देण्याचें सामर्थ्य प्रत्येक व्यक्तीमध्ये असतें. शिवाय व्यक्तीला पूर्णता मिळण्यास बराच अवधि उरलेला असतांनासुद्धा, तिच्या ऐहिक जीवनाची दोरी कापली गेल्याचींहि उदाहरणें आहेतच. त्याने ध्येयासाठी केलेली सारी धडपड, सर्व कांही चांगलें, थोर, उदात्त आणि सुंदर यांसाठी त्याने केलेले सारे प्रयत्न, त्याचा उत्साह व शाश्वत आणि दैवी गोष्टींबद्दलची त्याची सारी महत्त्वाकांक्षा,—हीं सर्व मृत्यूमुळे उत्पन्न झालेल्या अफाट शून्यांत विराम पावत असल्यासारख्या दिसतात.

व्यक्तिनिरपेक्ष बुद्धीला पडलेले कूट प्रश्न.

मृत्यु हा व्यक्तीच्या अस्तित्वाचा अंत आहे, ही कल्पना तर्कशुद्ध अंतःप्रज्ञे (rationalised intuition) च्या अनिवार्य अपेक्षांच्या विरुद्ध आहे. वैयक्तिक अस्तित्वाचा मृत्यु हा अंत आहे, असें समजणारी अशुद्ध बुद्धि आणि अंतःप्रज्ञा (Intuition), यांच्यांत याप्रमाणे बहुधा संघर्ष उत्पन्न होतो. असा संघर्ष बहुधा शुद्ध विचारसरणीचा प्रारंभ ठरून, तो ' मृत्यु हा व्यक्तीच्या अस्तित्वाचा अंतच आहे, ' ह्या गृहीत विश्वासाला आव्हान देतो. मनु-

अशुद्ध बुद्धि आणि सखोल अंतःप्रज्ञा, यांमधील संघर्ष

त्याच्या आध्यात्मिक आकांक्षांना, मृत्यु हा जीवनाचा कायमचा अंत आहे, हें पूर्णपणे कधींच पटत नाही; आणि म्हणूनच, मृत्यू-नंतरच्या अस्तित्वाविषयीं इंद्रियातीत ज्ञान नसतांनादेखील, जीवात्मा अमर आहे, हा विश्वास मनाला ग्राह्य होऊन, त्याला फारसा विरोध होत नाही.

स्वतःच्या वैयक्तिक अनुभवाने आत्म्याचें अमरत्व जाणणारे फारच थोडे असतात. बहुजनसमाजाला मृत्यूनंतरच्या अस्तित्वाचें इंद्रियातीत ज्ञान (supersensible knowledge) होणें अशक्य असतें. आत्म्याचें अमरत्व हा त्यांच्या दृष्टीने केवळ एक प्रिय आणि स्वीकारार्ह, असा विश्वास असतो, एवढेंच. शास्त्रीय जिज्ञासेने, जे 'दुसऱ्या जगाशीं' संबंध ठेवण्याचीं साधनें उपलब्ध करून घेतात त्यांना, किंवा कांही विशिष्ट परिस्थितीमुळे, ज्यांच्या जीवनांत, गतात्म्यांना कांही कार्य करावें लागतें, किंवा यावें लागतें त्यांना, किंवा ज्यांच्या आध्यात्मिक प्रगतीमुळे, जाणिवेच्या कांही सुप्त शक्ति आपोआप विकसित झालेल्या आहेत, अशा लोकांना मात्र आत्म्याच्या अमरत्वाचें प्रत्यक्ष ज्ञान असतें.

व्यष्टिभूत आत्मा म्हणजे जीवात्मा हा स्थूल शरीराहून भिन्न असल्यामुळे, त्याचें अमरत्व शक्य होतें. मृत्यूच्या वेळीं, स्थूल शरीराचा त्याग करून, सूक्ष्म आणि मनोदेहाच्या साह्याने, जीवात्मा स्वतःच्या सर्व संस्कारांसहित आपलें वास्तव्य अंतर्जगांत ठेवूं शकतो. म्हणून, स्थूलशरी-राच्या माध्यमांतील जीवन, म्हणजे जीवात्म्याच्या खंडरहित जीवनाचा केवळ एक भागच असून, त्या

अमरत्वाचा प्राकृतिक पाया.

अखंड जीवनाच्या दुसऱ्या भागांची अभिव्यक्ति, ' दुसऱ्या ' जगांत होत असते.

तीन विश्वे.

स्थूल शरीराच्या इंद्रियांना जेवढें दिसतें, त्यापेक्षा निसर्ग कीतीतरी अधिक मोठा आहे. निसर्गाचा अदृश्य भाग अधिक विरळ व सूक्ष्म पदार्थ आणि शक्ति, यांनी बनलेला आहे. निसर्गाच्या स्थूल व सूक्ष्म विभागांमध्ये, अगदी तोडून टाकणारा किंवा अनुल्लंघनीय, असा एखादा खंदक नाही. निसर्गाचे सूक्ष्म विभाग साधारण मनुष्याच्या दृष्टीच्या टप्प्यांत येत नाहीत; परंतु ते त्याला दिसत असलेल्या स्थूल विभागाशीं आविच्छन्न ( continuous ) किंवा जुळलेलेच असतात. ते अतिदूर नसतात; तरीहि साधारण माणसाच्या जाणिवेस मात्र ते अप्राप्य असतात. आणि याचें कारण असें आहे, कीं त्याची जाणीव, ज्या इंद्रियांना निसर्गाचे सूक्ष्म विभाग पहाण्याची सवय किंवा शक्ति नसते, अशा इंद्रियांच्या द्वारांच कार्य करीत असते. ज्याप्रमाणे, बहिऱ्या मनुष्याला ध्वनीची जाणीव नसते, त्याचप्रमाणे सर्वसाधारण मनुष्याला अंतर्गत जगतांची जाणीव नसते; आणि तो त्याच्याशीं जाणीवपूर्वक व्यवहार ठेवूं शकत नाही. म्हणून, व्यवहाराच्या दृष्टीने, त्याच्याकरता, ती दुसरीं विश्वें (other worlds) च बनतात. निसर्गाच्या अदृश्य आणि सूक्ष्मतर भागांचे ( मनुष्याच्या सूक्ष्म आणि कारण शरीरांना अनुसरून ) सूक्ष्म आणि कारण, असे दोन महत्त्वाचे विभाग होतात. तेव्हा, सर्व निसर्गाचे सहाजिकच तीन विभाग पडतात. (i) स्थूल जगत् (ii) सूक्ष्म जगत् आणि (iii) कारण जगत्. जेव्हा जीवात्मा स्थूल शरीरांत उतरतो, तेव्हा तो आपल्या जीवनास स्थूल जगतामध्येच अभिव्यक्ति देतो; परंतु जेव्हा

तो या स्थूल देह-कवचाचा त्याग करतो, तेव्हा त्याच्या जीवनाची अभिव्यक्ति सूक्ष्मदेहद्वारां सूक्ष्मजगतांत किंवा मनोदेहद्वारा मनोजगतांत चालूच राहते.

साधारणतः, स्थूल देहांतील जन्मामध्ये, ज्या संस्कारांना अभिव्यक्ति द्यावयाची असते, ते सर्व खर्च होऊन सपले, म्हणजेच त्या देहातील जीवनहि संपतें. परंतु, कांही अपवादात्मक बाबतींत,

अकाल मृत्यूचे परिणाम.

हे संस्कार कामीं येऊन संपून जाण्यापूर्वीच, जीवात्म्याला या स्थूल देहाचा त्याग करावा लागतो. उदाहरणार्थ, जो मनुष्य आत्महत्या करतो, तो आपल्या जीवनाचा काल कृत्रिम रीत्या कमी करून, सफल आणि व्यक्त होण्यास विमोचित झालेल्या संस्कारांच्या कार्यास प्रतिबंध करतो. अकाल मृत्यूमुळे, सफलतेसाठी सुटलेल्या संस्कारांच्या अभिव्यक्तीस जेव्हा प्रतिबंध होतो, तेव्हा, त्या त्यक्तदेह आत्म्यास, स्थूलदेहाचा त्याग केल्यानंतरदेखील, त्या संस्कारांची गतिकारक प्रेरक शक्ति ( propelling force ) अनुभवावी लागते. ज्या संस्कारांना व्यक्त होऊन संपून जाण्यास प्रतिरोध होतो, त्यांचा आवेग मृत्यूनंतरच्या जीवनांतदेखील चालूच राहतो. आणि म्हणून, गतात्म्यास स्थूल जगतांतील वस्तूंची अतिशय जरूर भासते; व त्या मिळण्याची त्याला अतिशय इच्छा होतें.

अशा त्यक्तदेह आत्म्यास स्थूल जगताबद्दल अनावर आसक्ति वाटते; आणि स्थूल वस्तूंबद्दल त्याला इतका हव्यास वाटतो, कीं जे

भूताने पछाडणें.

आत्मे अद्याप देहधारी असतील, त्यांच्या स्थूल देहांच्याद्वारां, तो आपल्या इच्छांची पूर्ति करून घेण्याचा प्रयत्न करतो. म्हणजे, एखाद्या आत्म्यास [illegible]

आत्यंतिक इच्छा असेल, तर तो आपली ही इच्छापूर्ति करून घेण्यासाठी अनैसर्गिक उपायांचा अवलंब करतो. तो आपल्या संधीची वाट पहातो. जेव्हा त्याला स्थूल जगतांतील एखादा मनुष्य मद्यपान करतांना आढळेल, तेव्हा त्याच्या स्थूल देहात प्रवेश करून, आणि त्याच्याशी संबंध आणून, तो त्याच्या द्वारां, आपली इच्छा पूर्ण करून घेतो. त्याचप्रमाणे, एखाद्याला अगदी विवेकशून्य क्रोधाच्या अभिव्यक्तीचा अनुभव घेण्याची इच्छा असेल, तर स्थूल जगतांत जो मनुष्य क्रोधावेशात असेल, त्याच्या द्वारां तो आपली ती इच्छा पूर्ण करून घेतो. असे आत्मे समान संस्कार असलेल्या स्थूल देहधारी आत्म्यांना भेटण्याची आणि त्यांच्या स्थूल देहांत प्रवेश करण्याची संधि सतत शोधीतच असतात. आणि दुसऱ्यांच्या द्वारां टिकणास हा आपला स्थूल जगताचा संबंध ते शक्य तितक्या कालपर्यंत ठेवण्याचा प्रयत्न करतात. मृत्यूनंतर, अशा तऱ्हेने स्थूल जगतांत गुंतून घुटमळत राहणें, हा आत्म्याच्या नैसर्गिक जीवन-प्रवाहांत अत्यंत मोठा अडथळा असतो. जे अशा बिकट परिस्थितींत सापडतात, ते तर विशेषच दुर्दैवी समजले पाहिजेत. कारण, स्थूल जगांत वावरणाऱ्या आत्म्यांच्या द्वारां, आपल्या क्षुद्र इच्छांची अनैसर्गिक तृप्ति करण्यास प्रवृत्त झाल्यामुळे, ते स्वतःस आणि इतरांनाहि दुःख भोगावयास लावतात. या दुर्दैवी आत्म्यांशीं तुलना करून पाहता, इतर आत्म्यांचें स्थूल देहावसानानंतरचें जीवन पुष्कळच विघ्नरहित असतें.

साधारणतः, सफल होण्याकरता सुटलेले संस्कार झिजले, म्हणजे मृत्यु येतो. जेव्हा आत्मा स्थूल देहाचा त्याग करतो, तेव्हा स्थूल जगतांतील जीवनांत उत्पन्न होऊन जमलेले संस्कार, अहंभाव आणि

मन, हे जरी तसेच राहात असले, तरी त्यांचा स्थूल जगताशीं असलेला संबंध पूर्णपणे तुटतो. देहत्यागानंतरहि दुसऱ्यांच्या शरीरांत संचार करणाऱ्या आत्म्यांच्या उलट, सर्वसाधारण आत्मे, स्थूल जगताशीं संबंध तुटल्यामुळे, प्राप्त झालेल्या परिस्थितीशीं आपापल्या सामर्थ्याप्रमाणे जुळतें घेण्याचा प्रयत्न करतात. लवकरच ते बदललेल्या परिस्थितीच्या मर्यादेंत राहण्याचे स्वीकारतात, आणि कर्तव्यशून्य मनोगत स्थिती ( state of subjectivity ) मध्ये निमग्न होतात. या स्थितीमध्ये, त्यांच्या संस्कारांचें पुनरुज्जीवन ( revival ) होतें, व तज्जन्य अनुभवांचें परिशीलन करण्याची क्रिया सुरू होते. तेव्हा, मृत्यूने स्थूल कार्यक्षेत्रापासून तात्पुरती निवृत्ति व विश्रांति देणाऱ्या कालास सुरुवात होते. मृत्यु हा गेलेला व पुढे येणारा जन्म, या दोहोंमधील कालावधीचा प्रारंभ असतो.

मृत्यु म्हणजे दोन जन्मांतील मध्यकालाचा प्रारंभ होय.



## भाग २ रा.

## स्वर्ग आणि नरक.

मरणोत्तर जीवनाची मनोगत अवस्था (subjectivity).

मृत्यूच्या वेळीं, आत्मा स्थूल देहाचा त्याग करतो. म्हणून, मरणानंतर स्थूल जगताची जाणीव राहत नाही; कारण, ती स्थूल शरीरावरच प्रत्यक्षपणें अवलंबून असते. परंतु, अशा प्रकारें, स्थूल जगताची जाणीव जरी नष्ट झाली, तरी स्थूल जगतातील अनुभवामुळे उत्पन्न झालेले संस्कार मनोदेहा ( mental body ) मध्ये कायम राहतात: आणि ते अर्धसूक्ष्म जगतांत व्यक्त होण्याचा प्रयत्न करतात. मृत्यु आणि नवीन जन्म, यांतील मध्य-कालांत आत्म्याची जाणीव त्या संस्कारांकडे वळते; आणि त्यामुळे, ते संस्कार अधिक जागृत होतात व तद्विशिष्ट अनुभवांचें पुनरुज्जीवन होतें. सर्वसाधारण मनुष्यास त्याच्या सूक्ष्म परिस्थितिरूप वातावरणाची जाणीव होत नाही. तो मनोगत स्थिती ( subjectivity ) मध्ये

पूर्णपणें निमग्न राहतो; आणि या पुनरुज्जीवित संस्कारांच्या अनुभवांतच तो तन्मय होऊन जातो.

मृत्यूनंतरच्या जीवनांत, सुख आणि दुःख यांचे अनुभव, स्थूल जगतांतील अनुभवांपेक्षा अधिक तीव्र असतात. या आनंदाच्या आणि दुःखाच्या मनोगत स्थितींनाच अनुक्रमे स्वर्ग आणि नरक असें म्हणतात. स्वर्ग आणि नरक या मनाच्या अवस्था आहेत; तीं निराळीं ठिकाणें अगर जागा आहेत, असें समजण्याचें कारण नाही. आणि मानसिक दृष्टीने पाहतां, व्यक्तिशः आत्म्याला त्यांचें बरेंच महत्त्व असलें, तरी या अधिक मोठ्या दृश्य जगदाभासामधील, तो एक भासमात्र आहे.

नरकाच्या स्थितीमध्ये, अगर स्वर्गाच्या अवस्थेमध्ये, वासना अधिकच तीव्र होतात; कारण, त्यांच्या अभिव्यक्तीसाठी, स्थूलाच्या माध्यमाची गरज राहत नाही; त्याचप्रमाणे, या वासनांच्या तृप्तीचे किंवा अतृप्ततेचे अनुभवहि अधिक तीव्र होतात. पृथ्वीवरील जीवनांत, इच्छा, सुख आणि दुःख यांचा अनुभव, स्थूलाच्या माध्यमांतूनच घ्यावा लागतो. या पार्थिव (earthly) जीवनांतहि आत्मा रच्या उच्च प्रकारच्या शरीरांचा उपयोग करीत असतोच. परंतु, व्हा, त्याची जाणीव स्थूल देहाशीं संबद्ध झालेली असते; व हणून, जाणिवेच्या व्यापारांना आणखी एका जास्तीच्या आवरणा-धून संक्रमित व्हावें लागतें. आणि त्यामुळे, जाड काचेंतून जाणारे काशकिरण ज्याप्रमाणे अंधुक होतात, त्याप्रमाणे जाणिवेच्या यापारांची शक्ति, तीव्रता आणि उठावदारपणा हीं कमी होतात. जड शरीरांतील निवासामध्ये, इच्छा आणि अनुभव, यांची

तीव्रता कमी होते; परंतु या निवासस्थानाचा त्याग केल्यावर, त्या सर्व इच्छांची तीव्रता सापेक्षतेने वाढते.

स्वर्गावस्थेमध्ये, इच्छांची पूर्ति, स्थूल जगतांतील स्थितीप्रमाणे, इच्छेचा विषय मिळण्यावर अवलंबून नसते; तर इच्छेच्या विषयाचा केवळ विचार करण्यानेच त्या इच्छेची परिपूर्ति होते. उदाहरणार्थ, एखाद्या मनुष्यास अतिशय उत्तम गायन ऐकण्याची इच्छा झाली, तर अत्युत्तम गायनाचा केवळ विचार करण्याने, तें ऐकण्याचें सुख त्याला मिळेल; अत्युत्तम गायनाची केवळ कल्पना, या अवस्थेंत, स्थूल जगतांतील भौतिक ध्वनीच्या लहरींचें कार्य करतात. अत्युत्तम गायनाच्या या कल्पनेपासून, त्याला जें सुख मिळतें, तें या पार्थिव जीवनात प्रत्यक्ष भौतिक ध्वनि ऐकण्यामुळे होणाऱ्या सुखापेक्षा, पुष्कळ जास्त असतें. स्वर्गावस्थेमध्ये, इच्छा आणि त्यांची पूर्ति, यांत कोणतेंहि विघ्न नसतें; विचार आणि भावना, यांच्या द्वारां होणारे इच्छापूर्तीचें सुख नेहमी जवळच असतें.

स्वर्गावस्थेमध्ये इच्छांची पूर्ति विचारांच्या द्वारां होते.

वास्तविक पाहतां, पार्थिव जीवनाच्या क्षेत्रांतदेखील, कांही लोक, स्थूल विषयावर प्रत्यक्षपणें अवलंबून न राहतां, सुख मिळविण्याचें सामर्थ्य वाढवितात. उदाहरणार्थ, बीथओव्हन हा पूर्णपणें बहिरा असतांनादेखील केवळ आपल्या कल्पनेच्या सहाय्याने आपल्या स्वतःच्या स्वर-गीतांची माधुरी व आनंद चाखूं शकत होता. म्हणून, लाक्षणिक अर्थाने, पृथ्वीवरदेखील, तो स्वर्गावस्थेंतच होता, असें म्हणतां येईल. त्याचप्रमाणे, आपल्या प्रियतमाचें जो प्रीतीने ध्यान करतो, त्याला आपल्या

पृथ्वीवरील स्वर्ग.

प्रियतमाचें प्रत्यक्ष सान्निध्य नसतांना देखील, केवळ त्याच्या विचारानेच सुख मिळतें. परंतु, मृत्यूनंतरच्या स्वर्गावस्थेंतील असा कल्पनामय इच्छापूर्तीचा हा आनंद अनंतपटीने अधिक असतो; कारण, तेव्हा जाणीव वरील सर्वांत बाहेरचा आवरणरूप पडदा गळून गेल्यामुळे भारमुक्त झालेली असते.

काही इच्छा, स्थूल विषय प्रत्यक्षपणें मिळवून, त्याना स्थूल शरीराच्या द्वारा, आत्मसात् करण्यासंबंधी असतात. कामवासना, खादाडपणा, व मदिरासक्ति, हीं या प्रकारच्या इच्छाचीं उदाहरणें होत.

हीन इच्छांना नरकावस्था उत्पन्न होते.

या इच्छा विशेषेकरून पार्थिव आहेत; कारण त्याच्यामध्ये, स्थूल विषय प्रत्यक्षपणे मिळवून व त्याला चिकटून, त्याच्यावर पकड ठेवण्याची प्रवृत्ति असने. तसेंच, या इच्छामध्ये, केवळ त्या विषयाच्या स्पर्शाने होणाऱ्या संवेदनाचेंच प्राधान्य नसून, त्याच्यामुळे शरीरांत होणाऱ्या प्रतिक्रियेमधील संवेदनाचेंहि प्राधान्य असतें. या तामस व हीन इच्छा नरकावस्था उत्पन्न करतात.

**उच्च प्रकारच्या इच्छांच्या उलट, हीन इच्छा ह्या पदार्थांचा अर्थ किंवा त्यांचें सौंदर्यदृष्ट्या व नीतिदृष्ट्या कोणतेंहि मूल्य न पाहतां, केवळ इंद्रियसंवेदनां (sensations) वरच अवास्तव**

सात्त्विक इच्छा आणि हीन इच्छा, यामधील फरक.

**भर देतात.** संगीताविषयक इच्छेसारख्या उच्च इच्छेमध्येहि, ध्वनीशीं इंद्रियाचा प्रत्यक्ष संबंध येण्याचा हव्यास असतोच. परंतु, ते केवळ ध्वनि म्हणून मनुष्यास महत्त्वाचे वाटत नसतात, तर सौंदर्य व्यक्त करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत असतें, म्हणून त्यांचें महत्त्व वाटत असतें. त्याचप्रमाणे, मनाला उपदेशपर व्याख्यानें ऐकण्याची

जी इच्छा असते, ती केवळ ध्वनिसंवेदनेसाठी नसते; तर, त्या ध्वनींतील बौद्धिक अर्थ व त्यांचें भावना उद्दीपित करण्याचें सामर्थ्य, यांच्यामुळेच ती इच्छा उत्पन्न झालेली असते.

अशा प्रकारें, उच्च वासनांमध्ये, संवेदनाधिष्ठित असलेल्या इतर वैचारिक अर्थपूर्णतेच्या मानाने, प्रत्यक्ष संवेदना, ह्या अगदी गौण असतात. परंतु, हीन वासनांमध्ये, स्थूल विषयांच्या संपर्काच्या संवेदना आणि त्यांच्या प्राप्तीमुळे शरीरांत उत्पन्न होणाऱ्या प्रतिसंवेदनांचा बराच भाग असतो. निकृष्ट वासनांच्या अनुभवांच्या बाबतींत, शारीरिक प्रतिसंवेदनां ( organic sensations ) चाच मोठा भाग असतो; आणि उच्च वासनांच्या अनुभवांपेक्षा, या निकृष्ट वासनांच्या अनुभवांमुळेच, जीवात्म्याला स्थूल शरीर म्हणून आपलें स्वतःचें अस्तित्व अधिक तीव्रतेने आणि परिणामकारक रीतीने अनुभवतां येतें.

निकृष्ट वासनांमधील शारीरिक संवेदनांचे स्थान.

निकृष्ट वासनांची तृप्ति अगर अतृप्ति, यामुळे येणाऱ्या अनुभवांना असलेलें सारें महत्त्व शारीरिक संवेदनां ( bodily sensations ) मध्येच संनिहित असतें. म्हणून, उत्कृष्ट वासनांप्रमाणे, केवळ विचार आणि कल्पना, यांच्या द्वारांच निकृष्ट वासनांच्या तृप्तीचा पूर्ण अनुभव घेतां येत नाही. वासनेच्या स्थूल विषयावर ताबा मिळवून, त्याला आत्मसात् करण्याचा आग्रह धरणें, हा निकृष्ट वासनांचा प्रमुख गुण आहे; स्थूल पदार्थाची कोणतीहि कल्पना केली, तरी तिच्यामुळे, त्या स्थूल विषयाप्रत पोंचण्याचीच इच्छा मात्र उत्पन्न होते. सूक्ष्म जगतांत, निष्कृष्ट वासनांचे स्थूल विषय मिळणें शक्य

स्थूल विषयाच्या अप्राप्तीमुळे निकृष्ट वासनांची अतृप्ति.

नसल्यामुळे, त्या वासना अतृप्तेच्या दुःखाचे तीव्र अनुभव आणतात. उत्कृष्ट वासनेसंबंधीच्या अनुभवांच पुनरुज्जीवन किंवा पुनर्जागरण, ज्याप्रमाणे स्वर्गावस्थेंतील सुखाचा अनुभव देते, त्याचप्रमाणे नीच वासनासंबंधीच्या अनुभवांचें पुनरुज्जीवन किंवा पुनर्जागरण नरकावस्थेंतील दुःखाचे अनुभव देण्यास कारण होतें.

ज्याप्रमाणे, या जगांत निकृष्ट वासनांमुळे सुखापेक्षा दुःखाचेंच आधिक्य होतें, त्याचप्रमाणे, मृत्यूनंतरच्या जीवनांत देखील, नीच वासनासंबंधीचे पुनर्जागृत झालेले अनुभव, सुखापेक्षा दुःखाचेंच आधिक्य निर्माण करतात; आणि अशा तऱ्हेने, नरकावस्था अस्तित्वांत आणतात. आणि ज्याप्रमाणे, या जगतांत उत्कृष्ट वासनांमुळे दुःखापेक्षा सुखाचेंच आधिक्य लाभतें, त्याचप्रमाणे, मरणोत्तर जीवनांतदेखील, उच्च वासनांसंबंधीच्या पुनरुज्जीवित अगर पुनर्जागृत झालेल्या अनुभवांमुळे, दुःखापेक्षा सुखाचेंच आधिक्य होऊन, स्वर्गावस्था अस्तित्वांत येते.

स्वर्गांतील सुखें आणि नरकांतील दुःखे.

परंतु, स्वर्ग अथवा नरक, या दोन्हीहि बंधनाच्याच अवस्था असून, त्या सुखदुःखरूप द्वंद्वानी मर्यादित आहेत; आणि या दोन्हीहि अवस्थांची कालमर्यादा संचित संस्कारांचें स्वरूप, परिमाण आणि तीव्रता, यांच्यावर अवलंबून असते. जाणिवेच्या मनोगत अवस्थे (subjectivity) मुळे, स्थूल जगांतील कालगणनेचें सूक्ष्म जगतांतील कालगणनेशीं कांहीहि सादृश्य नसतें; परंतु, सूक्ष्म जगतांतील काल स्थूल जगतांतील कालाहून भिन्न असला, तरी तो स्थूल जगतांत

सूक्ष्म जगतांतील काल.

संचित केलेल्या संस्कारांनीच निश्चित होत असतो. तथापि, महत्त्वाची गोष्ट ही आहे, की स्वर्ग व नरक, ह्या चिरकाल टिकणाऱ्या अवस्था नसून, जीवात्म्याच्या जीवनांतील त्यांचें कार्य संपलें, म्हणजे त्यांचाहि अंत होतो.

संस्कारांचें पुनरुज्जीवन ( vivification ).

कामवासनेसारख्या निकृष्ट वासना आणि त्यापासून उत्पन्न होणारे क्रोधद्वेषादि विकार, हे नरकावस्थेंत असणाऱ्या सर्व दुःखास आणि भ्रमांस कारण होतात. आणि ध्येयवादी महत्त्वाकांक्षा, सौंदर्यविषयक रसज्ञता आणि शास्त्रीय शोधबुद्धि, शेजाऱ्यांविषयी अगर इतरांविषयीं सदिच्छा, आणि त्यापासून होणारें व्यक्तिविषयक प्रेम अगर बंधुता—यामुळे स्वर्गावस्थेंतील ज्ञान आणि आनंद, यांनी संपन्न असलेलें जीवन उत्पन्न होतें. बहुतेक लोकांच्या बाबतींत, या अवस्थांमध्ये, पार्थिव जीवनाच्या अनुभवांमध्ये त्यांनी मिळविलेल्या संस्कारांच्या पुनरुज्जीवना- ( vivification ) च्या द्वारां, त्या पार्थिव अनुभवांचीच पुनरावृत्ति ( reliving ) होते. परंतु, त्यांचा कालावधि आणि स्वभावगुणविशेष, हे मनुष्याच्या स्थूल देहांतील अनुभवांच्या स्वरूपावर व कालावधीवर अवलंबून असतात.

स्वर्ग आणि नरक, या अवस्थांचा अंत.

ज्याप्रमाणे, ध्वनिलेखनयंत्रा ( gramophone ) च्या ध्वनिपेटिके ( sound-box ) ची सुई त्या यंत्राच्या तबकडी (record) ला पाडलेल्या प्रत्येक रेखेवरून फिरली, म्हणजे ती तबकडी बाजूस ठेवण्यांत येते, त्याचप्रमाणे, जाणिवेने पार्थिव जीवनांत उमटलेल्या सर्व संस्काररूपी ठशांतून प्रवास केला,

म्हणजे स्वर्गावस्था व नरकावस्था, यांचाहि अंत होतो. शिवाय, ध्वनिलेखनयंत्राच्या तबकडींतून कोणत्या प्रकारचें गीत बाहेर पडेल, हें जसें ज्या गीताचें ध्वनिलेखन झालें असेल, त्या मूळ गीतावर अवलंबून असतें, त्याचप्रमाणे जे तीव्रतर आणि विशालतर अनुभव आत्म्याला मृत्यूनंतर येतात, त्या अनुभवांचे गुणविशेषदेखील, त्या व्यक्तीच्या स्थूल देहांतील जीवनाच्या प्रकारावर अवलंबून राहतात. या दृष्टीने पाहतां, स्वर्ग आणि नरक, या मनुष्याच्या पार्थिव जीवनाच्याच छाया होत.

पृथ्वीवरील भूतकालाचें केवळ मानसिक पुनरुज्जीवनच करण्यापलीकडे जर या अवस्थांत कांही अधिक झालें नसतें, तर स्वर्ग आणि नरक या अवस्थांचा, व्यक्तिगत जीवात्म्याच्या जीवनांत, कांही विशेष उपयोग झाला नसता. तें पुनरुज्जीवन, म्हणजे जें घडलें त्याची केवळ पुनरावृत्तीच झाली असती. या मरणोत्तर स्थितीमध्ये, जाणीव **पार्थिव जीवनाच्या पुनरुज्जीवित इतिहासा ( amimated record ) चें सावकाश आणि प्रभावपूर्ण सिंहावलोकन करूं शकते**; आणि पुनरुज्जीवित अनुभवांच्या वाढलेल्या तीव्रतेमुळे, जाणिवेला त्यांच्या गुणधर्माचें अधिक सोईस्कर व उपयुक्त परीक्षण करतां येतें. पृथ्वीवरील बहुतेक लोकांची जाणीव **प्रामुख्याने बाह्यपदार्थविषयक ( objective ) आणि अग्रदर्शी ( forward-looking ) असते**; आणि न संपलेल्या संस्कारांच्या आवेगामुळे, जाणिवेचें लक्ष्य, विशेषतः **वर्तमान** अगर **भविष्यकाल**, यांत शक्य होणाऱ्या संस्कारांच्या परिपूर्तीकडेच असतें. परंतु, मरणोत्तर जीवनामध्ये, बहुतेकांची जाणीव, प्रामुख्याने

पार्थिव अनुभवांचे पुनरावलोकन व परीक्षण.

मनोगत ( subjective ) आणि पुनरावलोकनशील ( retrospective ) किंवा अतीतदर्शी असते; आणि तेथे अग्रदर्शी संस्कारांचें दडपण आणि प्रेरणा नसल्यामुळे, जाणीव ( मनामध्ये स्मृतिचित्रें उद्धृत करण्याच्या प्रक्रियेप्रमाणे ) बहुशः गतकालाचेंच पुनर्निरीक्षण आणि महत्त्वमापन करण्यांत गुंतलेली असते.

चलच्चित्रपटा (cinema)चें सादृश्य.

मरणोत्तर जीवनांत, पार्थिव जीवनांतील बदलत्या परिस्थितींना तात्काल प्रत्युत्तर देण्यामध्ये उत्पन्न होणारी अस्थिरता व क्षुब्धता जाऊन, त्यांऐवजी, तत्काल क्रियांच्या आवश्यकतेपासून मुक्त असलेली अधिक शांत मनाची स्थिति प्राप्त होते; आणि ह्या स्थितीमध्ये, पार्थिव जीवनांतील संग्रहित अनुभवसामग्री, ही पार्थिव जीवनामध्ये शक्य असलेल्या स्मरणशीलते ( memory ) हून अधिक स्पष्टपणें अवलोकनसुलभ बनते. **पार्थिव जीवनांतील सर्व चित्रें मनाच्या चित्रपट–फिल्मवर चिन्हित झालेलींच असतात. आणि याच मरणोत्तर कालामध्ये, मनोगत बनलेल्या जाणिवेच्या ( subjectivised consciousness ) पडद्यावर अंकित होणाऱ्या, मूळच्या स्थूल जीवनांतील वाढविलेल्या ( magnified ) अनुभवचित्रांचा अभ्यास होऊं शकतो.**

पार्थिव अनुभवांचा परिपाक (assimilation).

अशा रीतीने, स्वर्गावस्था अगर नरकावस्था, हीं पार्थिव जीवनांत संग्रहित केलेल्या अनुभवांचा परिपाक ( assimilation ) करण्याचीं साधनें असून, या पचविलेल्या अनुभवांचे फायदे घेऊन, जीवात्मा स्थूल शरीरांतील दुसरा जन्म सुरू करूं शकतो. मागील आढावा घेऊन आणि विचार करून, आत्म्याला जे धडे

शिकतां येतात, ते तीव्रतर झालेल्या सुखदुःखामुळे, मनोदेहामध्ये बिंबून जातात; आणि दुसऱ्या जन्मामध्ये, ते धडे क्रियाशील जाणिवेच्या अंतःप्रज्ञेचे भाग बनतात. तथापि त्यांपासून, पूर्वजन्मांतील विशिष्ट घटनांचें स्मृतिरूप पुनरुज्जीवन ( revival ) होत नाही. मरणोत्तर जीवनांमध्ये, मनाने पचविलेलीं सत्यें, हीं नवीन जन्मांत अभिजात प्रज्ञे ( inborn wisdom ) चा भाग होतात. **विकसित अंतःप्रज्ञा ( intuition ), ही दुसरेंतिसरें कांहीं नसून, पूर्वीच्या जन्मपरंपरेमध्ये मिळविलेल्या विविध अनुभवसमूहांच्या संकलित समालोचनाचें सारज्ञानच असतें.**

निरनिराळ्या आत्म्याचें अभिजात ज्ञानाचें प्रमाण निरनिराळें असतें; आणि ऐहिक जीवनांतील यत्नशीलता आणि साहस, यांसाठी त्याचें तेंच पहिले भांडवल असते. एका दृष्टीने पाहतां, हें उपजत ज्ञान किंवा अंतःप्रज्ञा, म्हणजे मनाच्या सर्वांगीण वाढीला उपयुक्त ठरणारा गतानुभवांचा केवळ परिणाम आहे, असें वाटण्याचा संभव आहे. परंतु अंतःप्रज्ञेकडे, नवीन कमाईच्या दृष्टीने न पाहतां, जीवात्म्यांत जें सुप्तावस्थेंत होतें, तेंच अंतःप्रज्ञेच्या रूपांत अनावृत झालें आहे, असें समजणें अधिक खरें होईल. आणि या सखोल दृष्टिकोणाने पाहतां, **पार्थिव जीवनांतील सर्व अनुभव, व त्याचप्रमाणे मरणोत्तर जीवनांतील समालोचनात्मक ( reflective ) आणि संकलनात्मक ( consolidatory ) प्रक्रिया—हीं दोन्हीहि, उत्पत्तिकालापासूनच आत्म्यामध्ये जें सुप्त अभिजात ज्ञान आहे, तेंच हळूहळू पृष्ठभागावर आणण्यास, केवळ साधनमात्र आहेत.**

स्वर्गावस्था आणि नरकावस्था, यांचा अंतःप्रज्ञेच्या विमोचनामधील भाग.

पार्थिव जीवन आणि तेथील अनुभव, व त्याप्रमाणेंच मरणोत्तर जीवनांतील स्वर्ग आणि नरक या अवस्था, हीं सर्व अखिल वस्तु-मात्रांच्या मूलस्थानाप्रत जाण्याकरता, जीवात्म्याने केलेल्या प्रवासांतील आवश्यक भाग आणि घटना आहेत.



# २३ : : जन्मपरंपरा आणि कर्म

## भाग ३ रा.

## गत जन्मांचें अस्तित्व आणि त्यांची स्मृति.

आत्म्याचें जीवन व त्याची जन्मपरंपरा, या विषयींच्या अतींद्रिय सत्यांचें ज्ञान, जे आपल्या निर्मल दृष्टीनें प्रत्यक्षपणे मिळवूं शकतात, त्यांना जन्म म्हणजे जीवात्म्याचें स्थूल सृष्टींत होणारें केवळ अवतरण आहे, हें माहीत असतें.

जन्म आणि मृत्यूच्या घटना.

जन्म व मृत्यु, हीं अनेक जन्मे घेणाऱ्या जीवात्म्याच्या जीवनाच्या अखंड सातत्यांतील विरामचिन्हें असून, ते दोन्हीहि अस्तित्वाच्या एका प्रकारामधून दुसऱ्या प्रकाराप्रत जाणाऱ्या जीवनप्रवाहाचीं प्रवेशद्वारें आहेत. जन्म आणि मृत्यु, हे दोन्हीहि आत्म्याच्या महत्तर जीवनांत, सारखेच आवश्यक आहेत; आणि मृत्यु आणि जन्म, यांमधील मध्यंतर, जन्म आणि मृत्यु यांमधील मध्यंतराइतकेच आवश्यक आहे.

मृत्यु हा व्यक्तिजीवनाचा अंत आहे, असें मानणाऱ्यांप्रमाणेच,

जन्म हा व्यक्ति-जीवनाचा प्रारंभ आहे, असें समजणाऱ्यांच्या पुढे देखील, त्यांच्या खोट्या कल्पना व त्यांची विवेकशुद्ध अंत:प्रज्ञा (rationalised intuition), या दोहोंमधील संघर्ष उभा राहतो. वैयक्तिक दृष्टीने पाहिल्यास, चांगल्या व वाईट लोकांकरता, भौतिक सुख आणि वैभव, यांच्या वांटणीमध्ये जी विषमता असते, त्या विषमतेमुळे, अखिल विश्वांतील योजनेच्या अर्थपूर्णतेस व समर्थनीयत्वास बाध असल्यासारखें वाटतें. सद्गुणी लोक दु:खाच्या वेदनांत सापडलेले असून, दुर्जन विभवविपुलतेंत लोळत आहेत, असें दृश्य पाहिलें, म्हणजे त्या दृश्यामुळे, जीवनामध्ये कांहीतरी शाश्वत आणि दैवी हेतु आहे, असा विश्वास ठेऊं इच्छिणाऱ्या माणसासमोर, अनुल्लंघनीय अडचणी उभ्या राहतात.

अंत:प्रज्ञेच्या दृष्टीने आवश्यक असलेल्या गोष्टी.

अधिक सखोल आणि गंभीर असें स्पष्टीकरण मिळालें नाही, तर मानवी मनापुढे अशा दु:खद कूटांचा गोधळ उभा राहतो; आणि त्यांच्यामुळे त्याच्या जीवनविषयक दृष्टिकोणांत, कटुता उत्पन्न होते. शिवाय, त्यांच्यामुळे निर्माण होणारी कुत्सित वृत्ति (cynicism), ही मृत्यूमुळे होणाऱ्या वैयक्तिक दु:खापेक्षाहि अनेक प्रकारे अधिक वाईट असते. परंतु, अनेक विरोधी दृश्यें दिसत असतांनासुद्धा, **मानवी मनामध्ये, जीवनाच्या स्वत:सिद्ध यथार्थतेबद्दल व महत्त्वपूर्णतेबद्दल, गंभीर आणि अढळ श्रद्धा ठेवण्याची अभिजात प्रवृत्ति असते.** आणि कृत्रिमपणें उत्पन्न केलेल्या अडचणींचीं अपवादात्मक उदाहरणें सोडून, आत्म्याच्या या आंतरिक प्रवृत्तीस अनुकूल असलेलीं स्पष्टीकरणेंच मानवी मनाला ग्राह्य होतात.

गंभीर व सखोल स्पष्टीकरणाच्या स्वीकाराची प्रवृत्ति.

ेंदू बदलण्याचा परिणाम.

आत्म्याच्या अमरतेच्या सत्याचें ज्ञान ज्यांना होतें, अशा लोकांपेक्षाहि, पुनर्जन्माच्या सत्याचें प्रत्यक्ष ज्ञान असणारे लोक कमीच असतात. जीवात्म्याच्या मनोदेहांत गतजीवनांच्या स्मृती सुरक्षितपणें साठविलेल्या असतात; परंतु, त्यांच्यावर एक पडदा ओढला गेला असल्यामुळे, सामान्य लोकांच्या जाणिवेंत, त्या स्मृती राहत नाहीत. जेव्हा आत्मा हा स्थूल देह बदलतो, तेव्हा त्याला नवीन मेंदू मिळतो; आणि सामान्यतः, जागृतींतील चेतना, या मेंदूच्या व्यापारांना धरूनच कार्य करीत असते. सामान्यतः, केवळ वर्तमान जीवनाच्या स्मृतीच पूर्वीच्या जन्मांतील जाणिवेंत येऊं शकतात; कारण, दुसऱ्या मेंदूच्या माध्यमांतून घेतलेल्या अनुभवांच्या स्मृतींच्या मार्गांत, नवीन मेंदू हा एक अडथळा बनतो.

गतजन्मांच्या स्मृती.

कांही अपवादात्मक उदाहरणात मात्र, मेंदूच्या या अडथळयास न जुमानतां, या जन्मांत ज्यांना मुळीच कारण नाही, अशा कांही स्मृती, या जन्मामध्ये, स्वप्नांच्या रूपाने उतरतात. चालू जन्मांत, जो मनुष्य कधीहि पाहिला नाही, अशी एखादी व्यक्ति मनुष्याला स्वप्नांत दिसूं शकेल. असें पुष्कळदां घडतें की, जीं माणसें एखाद्याला स्वप्नांत दिसतात, तीं त्याला त्याच्या पूर्वजन्मीं भेटलेलीं असतात. परंतु, तरी देखील, अशीं स्वप्नें जेव्हा सामान्य प्रकारचींच असतात, तेव्हा त्यांना आपण गतजन्मांतील स्मृती, समजूं शकत नाही. अशा स्वप्नांचा अर्थ इतकाच की, मनुष्याच्या स्वप्नांत कार्य करणाऱ्या कल्पनेवर, त्याच्या गतजन्मांतील पदार्थांचा व वस्तूंचा प्रभाव झालेला असतो. गतजन्मांची खरी स्मृति, ही वर्तमान जीवनांतील

स्मृतीप्रमाणेच स्पष्ट, स्थिर आणि अचूक असते. आणि ही स्मृति जेव्हा मनुष्यास येते, तेव्हा पूर्वीच्या कित्येक जन्मांतील स्वतःच्या व इतरांच्या अस्तित्वाबद्दल शंकाच उरत नाही. ज्याप्रमाणे हल्लीच्या जन्मांतील स्वतःच्या गत जीवनाबद्दल, तो शंका घेऊं शकत नाही, त्याचप्रमाणे, गत जन्मांतील जीवनाबद्दलहि त्याला संशय उरत नाही.

पूर्वीच्या जन्मांची स्मृति असलेले लोक फारच थोडे असतात. बहुसंख्य लोक, स्थूल जगताशीं इतके पूर्णपणें बद्ध झालेले असतात, की त्यांना, अतींद्रिय तत्त्वांच्या अस्तित्वाबद्दल, शंका देखील येत नाही. पूर्व जन्मांच्या आठवणी येण्यामध्ये, मेंदू हा एक मोठाच सीमाकारक अडथळा असतो. जोंवर, स्थूल शरीर आणि मेंदूचे व्यापार यांच्याशीं जाणीव संबद्ध झालेली असते, तोंवरच हा अडथळा असतो. परंतु, मेंदूने आलेल्या मर्यादितेंतून, जेव्हा जाणीव विमुक्त होते, तेव्हा, मनोदेहांत असलेल्या गत-जन्मांच्या स्मृती परत मिळवून, ती त्या स्मृतींचें पुन:संस्थापन करूं शकते. परंतु, यासाठी, कांही अंशांत, ज्ञान व अनासक्ति, यांची आवश्यकता असते; आणि केवळ प्रगत अशा आध्यात्मिक लोकांतच हे गुण आढळतात. पूर्णतेप्रत जे अद्याप पोचलेले नाहीत, आणि ज्यांचा आंतरिक भूमिकांतील प्रवास सुरूच आहे, अशांना देखील, गतजन्मांची पूर्ण स्मृति स्पष्टपणाने आणि बिनचूक येऊं शकते.

पूर्वीच्या जन्मांतील आठवणी येणे.

कांही अपवादात्मक आणि विरळ उदाहरणें सोडून, मनुष्याची आध्यात्मिक दृष्टीने पुरेशी प्रगती झालेली असल्याखेरीज, त्याला पूर्व-

जन्मांच्या स्मृती येत नाहीत. जीवनाच्या या सोइस्कर नियमामुळे, जीवात्म्याची आध्यात्मिक प्रगति निर्विघ्नपणे होऊं शकते. प्रथम–दर्शनीं, पूर्वजन्मांची विस्मृति, म्हणजे केवळ तोटाच आहे, असें वाटेल. परंतु, वस्तुस्थिति उलट आहे.

गतजन्मांची स्मृति लोप पावल्यामुळे, आध्यात्मिक प्रगतीवर परिणाम होत नाहीं.

**बहुतेक बाबतींत, पूर्वजन्मांचें ज्ञान, हें आध्यात्मिक विकासाच्या अग्रगतीचें मार्गदर्शन करण्याकरता, मुळीच आवश्यक नसतें. जीवनाला भूतकालाने निर्दिष्ट होऊं देण्यांत आध्यात्मिक प्रगति नसते. तर, अंतःप्रज्ञेस पटलेल्या सर्वश्रेष्ठ मूल्यांच्या प्रकाशामध्ये जीवनाचें मार्गदर्शन करणें, म्हणजेच आध्यात्मिक प्रगति होय.** कित्येक वेळां, चालू जन्मांतील स्मृति देखील, जीवनाच्या बदलत्या परिस्थितीशीं स्वतःचे आध्यात्मिक दृष्टीने व्यवस्थापन करण्यामध्ये विघ्न आणते. एका दृष्टीने, मुक्तीचा प्रश्न म्हणजे अतीता ( past ) पासून विमुक्त होण्याचा प्रश्न आहे, असें म्हणतां येईल. जन्ममृत्यूच्या चक्रांत बद्ध असलेल्या जीवांच्या चालू जीवनाची रूपरेषा भूतकालानेच अपरिहार्यपणें नियत होत असते.

ज्याची कांही आध्यात्मिक प्रगति झालेली नाही, अशा मनुष्यावर जर गतजन्मांच्या जाणीवयुक्त स्मृतींचें ओझें पडलें, तर त्याचें जीवन अपरिमितपणे गुंतागुंतीचें होईल. त्याच्या पूर्वस्मृतींच्या प्रकाशांत, त्याला लोक निरानिराळ्या विविध पार्श्वभूमीमध्ये दिसल्यामुळे, तो घाबरून आणि गोंधळून जाईल. परंतु, असल्या घोटाळ्यास त्याला सम्मुख व्हावें लागत नाही; कारण, गत जन्मांच्या आठवणी जागृत झालेल्या नसल्यामुळे, तो सुरक्षित

गुंतागुंत टाळणारी योजना.

असतो. वस्तूंना आणि व्यक्तींना तो मर्यादित व निश्चित पार्श्वभूमी (Context and setting) मध्येच पाहात असल्यामुळे, त्याला आपल्या क्रिया व संबंध, चालू जन्मांतील ज्ञानाच्याच साहाय्याने ठरविणें सोपें जातें. परंतु, त्याच्या क्रिया आणि त्याचे संबंध, हे त्याच्या चालू जन्मांतील ज्ञानानेच पूर्णपणें निश्चित होतात, असा कांही याचा अर्थ नाही. पूर्व जन्मामध्ये जें जें घडलें असेल, त्याचा नकळत परंतु निश्चित परिणाम होतोच. परंतु, जन्मांच्या घटनांचा प्रत्यक्ष परिणाम होत असला, तरी हेंहि तितकेंच खरें आहे की, गत जन्मांच्या जाणीवपूर्वक स्मृतींच्या पुनरुद्भवापासून, त्याचें रक्षण केलें जात असल्यामुळे, त्याच्या मनांत गोंधळ होत नाही. स्वतःच्या क्रिया व संबंध ठरविण्यासाठी, ज्या गोष्टींचा मनुष्याला विचार करावा लागतो, त्यांत गतजन्मांची जाणीवयुक्त स्मृतीहि असती, तर तो फार गोंधळून गेला असता.

स्मृति येण्याकरिता सुरक्षिततेच्या अटी.

मनुष्य जेव्हा निरिच्छ बनला असेल, आणि त्याची 'मी–तूं' पणाची भावना पूर्णपणे विरली असेल, तरच त्याला गतजन्मांच्या स्मृतींच्या पुनरुद्भवास, उद्भ्रांत न होतां व तोल न जाऊं देतां तोंड देतां येतें. त्याला एकदा जे आप्त म्हणून वाटत होते, ते हल्लीच्या जन्मांत कदाचित् दुसऱ्यांचे झालेले दिसतील. आणि प्राचीन संबंध व स्वतःच्या आसक्ती, किंवा कल्पित हक्क, हे जर तो चालू जन्मांत आणूं पाहील, तर तो स्वतःसाठीं आणि इतरांसाठी अनिर्वचनीय गुंतागुंत, घोटाळा आणि दुःख निर्माण करील. पूर्व जन्मांच्या स्मृतींच्या क्षोभकारक प्रभावाचा सामना करण्याची आध्या-

त्मिक तयारी करावयाची असेल, तर साधकाला सर्व प्रकारची ग्रहणशीलता ( possessiveness ) मनांतून काढून टाकली पाहिजे.

आध्यात्मिक तयारी.

जेव्हा मनुष्याची आध्यात्मिक तयारी होते, तेव्हा तो पूर्ण निरिच्छ बनतो; आणि तो व्यक्तिनिरपेक्ष व तत्त्वपर ( impersonal ) प्रेमाने परिपूर्ण होतो. तो आपले जुने मित्र आणि शत्रू, यांच्याकडे समभावाने पाहूं शकतो; आपली मर्यादिता टाकून, तो इतक्या उच्च पातळीवर जातो, कीं तो पूर्वीच्या व हल्लीच्या जन्मांतील आप्त आणि परके, या सर्वांशीं सारखाच वागतो. आपले दुसऱ्यावर आणि दुसऱ्यांचे आपल्यावर आग्रहशील हक्क आणि प्रतिहक्क असण्याची कल्पनाहि त्याला शिवत नाही; कारण, त्याला सर्व जीवनाच्या एकतेच्या व सांसारिक घटनाच्या भ्रामकतेच्या गंभीरतर सत्याची साक्ष पटली असते.

अशी आध्यात्मिक तयारी झालेली असेल, तरच मनुष्याच्या मनावर गतजन्माच्या स्मृतीचा प्रभाव होऊं शकत नाही; आणि अशी स्थिति असेल, तेव्हाच त्या स्मृती त्याला मिळणें इष्ट असतें. कारण, तेव्हा पूर्वीच्या जन्मजन्मांतरांतील पुनरुद्भूत स्मृतींतून मिळविलेल्या नवीन ज्ञानाचा योग्य आणि विवेकशील उपयोग करण्यास लागणारी विवेकपूर्ण आणि अचुक निर्णयात्मकता व त्याकरता आवश्यक असलेलें कधींहि भ्रष्ट न होणारें विमल प्रेम, हे त्याला प्राप्त झालेले असतात. या नवीन ज्ञानामुळे, त्याला स्वतःच्या व त्याच्याशीं संबंध असलेल्या इतरांच्या पूर्व जन्मांविषयी पुष्कळशी माहिती मिळते; आणि कर्मसंबंधीं ज्ञानयुक्त व्यवस्थापन करून,

अध्यात्मपथावर स्वत: प्रगत होण्याकरता, त्याला त्या माहितीचा उपयोग तर होतोच, परंतु, इतरांच्या गतजन्मांना अनुसरून, त्यांचेंहि मार्गदर्शन करण्यासाठी, त्याला त्या माहितीचा उपयोग होतो.

स्मृति-प्राप्तीचे फायदे.

पूर्वजन्मस्मृतींची नैसर्गिकपणे प्राप्ति झाली, म्हणजे अध्यात्म-मार्गातील प्रगति अधिक त्वरित होते. सांसारिक बंधनांचा विकास व इतिहास, यांचें ज्ञान झाल्यामुळे, त्यांच्यापासून स्वतःची सुटका करून घेणें सुलभ होतें. ज्या विकासक्रमामध्ये आतापर्यंत सीमित करणाऱ्या भूतकालाचें ज्ञान नव्हतें, त्यामध्ये आता तें ज्ञान येतें. भूतकालाने उत्पन्न केलेल्या संधी आणि अडथळे, जाणिवेच्या आटोक्यांत येतात; आणि त्यांचा आता काळजीपूर्वक आणि बुद्धिपूर्वक उपयोग करतां येतो. प्रदत्त अनुभवावर विचाराचें कार्य होऊन, आतापर्यंत अस्पष्ट (inarticulate) असलेल्या अंत:प्रज्ञेला पूर्ति मिळाल्यामुळे, कृतीमध्ये चूक होण्याची शक्यता कमी होऊन, इच्छित गोष्टी घडवून आणण्याचें सामर्थ्य वाढतें.

पूर्वजन्मांच्या ज्ञानामुळे जवळचा मार्ग सापडतो.

आध्यात्मिक पूर्णतेस प्राप्त झालेल्या प्रज्ञासंपन्न सद्गुरूंना, पूर्वी होऊन गेलेल्या जन्मांमध्ये, कांही खास असें स्वारस्य वाटत नसतें. त्यांच्या दृष्टीने, भौतिक अस्तित्वांतील अनेक बिनमहत्त्वाच्या गोष्टींपैकीच, गतजन्म हेहि महत्त्वशून्यच असतात. जर त्यांनी एखाद्याच्या गतजन्मांच्या ज्ञानाचा उपयोग केलाच, तर तो केवळ त्याला शाश्वत सत्याच्या पथावर मदत करण्यासाठीच असतो. पूर्व-जन्मांच्या ज्ञानामुळे, ते साधकास आवश्यक असणारेंच असें मार्गदर्शन

देऊं शकतात. (१) पूर्वजन्मांतील घटना, (२) पूर्वजन्मीं, ज्या पद्धतीने साधकाने सर्वश्रेष्ठ सत्याचा शोध केला असेल ती पद्धति, आणि (३) आपल्या गतजन्मांतील क्रियांनी त्याने स्वतःसाठी निर्माण केलेल्या संधी व विघ्नें, अशा तीन गोष्टींनी अध्यात्मपथांतील स्वरूपविशेष निश्चित होत असतात. साधकाला अज्ञात असलेल्या या सर्व गोष्टी सद्‌गुरूच्या निरभ्र दृष्टीस खुल्या असतात; आणि तो त्याच्या ज्ञानाचा उपयोग सत्याची उपासना करणाऱ्या साधकाच्या आध्यात्मिक विकासाला गति देण्याकरिता करतो. अनेक जन्मांच्या अनुसंधानाने व प्रयोगशीलतेने साधक ज्या ठिकाणीं आलेला असतो, त्या स्थानापासून, सद्‌गुरु साधकाचें पुढील मार्गदर्शन करीत असतो. भौतिक गोष्टींप्रमाणेच, आध्यात्मिक गोष्टींतहि विशालतर व अधिक अचुक ज्ञान असेल, तर शक्ति व वेळ यांची बचत होते.



# २४ : : जन्मपरंपरा आणि कर्म

## भाग ४ था

## जन्माच्या परिस्थितिविशेषांना निश्चित करणाऱ्या घटना

जीवात्म्याचा प्रारंभ आणि उगम परमेश्वराच्या अनंत, निराकार, स्त्रीपुरुषभेदशून्य आणि अविभाज्य रूपामध्ये आहे; आणि त्याचें तें स्वरूप बिकासाच्या आणि द्वैताच्या सर्व प्रकारांच्या पलीकडे आहे. जीवात्म्याच्या प्रारंभाबरोबरच द्वैत आणि विकासाचाहि प्रारंभ होतो; मात्र स्त्रीपुरुषभेदावर अधिष्ठित असलेलें भेदजनक व आकर्षणात्मक विशिष्ट द्वैत, हें विकासक्रमाच्या बऱ्याच पुढच्या अवस्थेमध्ये दृष्टोत्पत्तीस येतें. कर्ता आणि विषय, किंवा जाणिवेचें केंद्र ( मग तें कितीहि अस्पष्ट असो ) आणि त्याची परिस्थिति, हे अस्तित्वांत आले, कीं त्याबरोबरच द्वैतहि आलेंच. परंतु, कामुकता ( sex ) हें एक विशिष्ट शारीरिक आकर्षण आहे; आणि त्याकरता, बाह्य रूपांचा

स्त्रीपुरुषभेद हे द्वैताचे विशिष्ट रूप आहे.

भेद, त्या भेदाशीं विशिष्ट तऱ्हेने झालेली मानसिक गुंतागुंत आणि जीवन व शक्ति यांची विशिष्ट अभिव्यक्ति,—ही लागतात.

खनिज आणि वनस्पति यांमधील लिंगभेद.

खनिज पदार्थांमध्ये लिंगभेद नाही. वनस्पति आणि वृक्षयोनीमध्ये, लिंगभेद व तद्विशिष्ट शारीरिक व्यापार अस्तित्वांत येतात. परंतु, वनस्पति आणि वृक्ष, यांमधील जाणीव अगदीच प्राथमिक अवस्थेंत असल्यामुळे, आणि त्या जाणिवेच्या अभिव्यक्तीवर शारीरिक वैधर्म्याचा परिणाम होत नसल्यामुळे, वनस्पति आणि वृक्षयोनी, यांमध्ये लैंगिक भाव ( sex-consciousness ) उत्पन्न होत नाही. त्यांच्यातील नर आणि मादी, यांचा संबंध ( ते जमीनींत रुजलेले असल्यामुळे ) प्रत्यक्ष नसून, केवळ वारा, मधमाशा इत्यादि सारख्या माध्यमांकरवीच, म्हणजे केवळ अप्रत्यक्ष असतो. म्हणून, देहांच्या विकासाच्या दृष्टीने, लिंगभेद हा वनस्पति आणि वृक्षांच्या योनींतच सुरूं होत असला, तरी त्या अवस्थेंत, त्यांच्या स्वतःच्या जाणिवेच्या दृष्टीने, त्यांना कांही लैंगिक भावना असते, असें म्हणतां येत नाही. त्यांची द्वैताची जाणीव लैंगिक भावनेने रंगलेली असत नाही.

पक्षी आणि प्राणी यांमधील लैंगिक भाव.

लैंगिक द्वैता ( sex-duality ) च्या बाबतींत, वृक्ष आणि वनस्पति यांचें स्थान, लैंगिक भाव मुळीच नसलेले खनिज पदार्थ व लैंगिक भाव पूर्णपणे विकसित असलेले पक्षी आणि प्राणी, या दोहोंच्यामध्ये आहे. मानवीरूपांत देह घेण्यापूर्वी, आत्मा प्राणिरूपांत पूर्ण जाणीव आणि शक्ति यांनी युक्त होतो; आणि नंतर, प्राणीदेहाचा त्याग करून तो

मानवीदेह धारण करतो. मानवीदेह घेण्यापूर्वी, जीवात्मा-उपमानव (sub-human) योनींतून संक्रमण करीत आलेला असतो.

प्राणियोनींत, तद्विशिष्ठ लैंगिक भावाची अभिव्यक्ति केवळ शरीरभेद आणि क्रिया, यांमधूनच होत नसून, त्याचा सखोल परिणाम जाणिवेवरहि होतो. मानवांना, शरीर आणि जाणीव, या दोहोंचाहि वारसा अधिक विकसित अशा वानर योनीसारख्या प्राण्यांकडून मिळत असल्यामुळे, तेहि लिंगभेदात्मक द्वंद्वांत सापडतात. मानवामध्ये लैंगिक भावना इतकी पूर्णपणे वाढलेली असते, कीं ती केवळ एक शारीरिक बाब राहत नाही, तर तिच्यामुळे अंत:करण देखील प्रभावित होऊन, तें लिंगभेदास अनुसरून, देहद्वारा, ( स्त्रीदेह अगर पुरुषदेह असेल त्याप्रमाणे ) अभिव्यक्त होतें.

लिंगभेदामुळे अंत:करण (Psyche) प्रभावित होतें.

एकदा मानवदेह धारण केल्यानंतर, नियमानुसार आत्म्याची बहुधा उपमानव योनींत अधोगति होत नाही; आणि खालील योनींत झालेली अपक्रान्ति (retrogression), ही अगदीच क्वचित् घडणाऱ्या खास अपवादांत मोडते. आत्म्याचा सर्वसाधारण प्रवासक्रम, म्हणजे असा असतो, कीं एकदा मानवपदवीप्रत पोंचल्यानंतर, तो आध्यात्मिक आवश्यकतेनुसार, कांही वेळां स्त्रीजन्म, तर कांही वेळां पुरुषजन्म घेतो. परंतु, तो पुन्हा पुन्हा मानवी देहच घेत राहतो.

स्त्री-पुरुष जन्म.

स्त्री-रूपास एक विशिष्ट अधिकार आहे. आणि तो म्हणजे

सद्‌गुरु आणि अवतारी पुरुष, यांनाहि या स्त्रियांच्या गर्भातच जन्म घ्यावा लागतो. परंतु, पुरुषदेहाचा विशिष्ट अधिकार, म्हणजे बहुतेक सद्‌गुरु पुरुषदेहच धारण करतात. स्त्रिया संत आणि सद्‌गुरु होऊं शकतात; परंतु अवतार नेहमी पुरुषरूपांतच व्यक्त होत असतो.

स्त्रीरूपांचे व पुरुषरूपांचे विशिष्ट हक्क.

कोणत्याहि जन्मामध्ये मिळणारे फायदे आणि तोटे, हे जीवात्म्याने गतकालांत गोळा केलेल्या संस्कारांनीच निश्चित होतात. आत्म्याच्या पुढील प्रगतीस काय आवश्यक आहे, हें त्याच्या संग्रहित संस्कारांवर अवलंबून असतें; आणि म्हणून, आत्मा पौर्वात्य देशांत जन्म घेतो, कीं पाश्चिमात्य देशांत घेतो, किंवा पुरुषरूपांत जन्म घेतो, कीं स्त्रीरूपांत घेतो, आणि सृष्टीच्या एका युगचक्रांत घेतो, कीं दुसऱ्या युगचक्रांत घेतो, हें त्याच्या संस्कारांवर अवलंबून असतें. एखाद्या विशिष्ट जन्मांत मिळणारे फायदे, तो जन्म केवळ स्त्रीदेहांत आहे किंवा पुरुषदेहांत आहे, यावरच अवलंबून नसून, तो एका सृष्टिचक्रांत आहे कीं दुसऱ्या सृष्टिचक्रांत आहे, त्याचप्रमाणे, त्याचें भौतिक जीवन पूर्वगोलार्धांत व्यतीत होणार आहे कीं पश्चिम गोलार्धांत व्यतीत होणार आहे—यांवरहि अवलंबून असतात.

संचित संस्कारामुळे विशिष्ट जन्मांतील फायदे आणि तोटे निश्चित होतात.

ठोकळ मानाने पाहतां, आज पौर्वात्य देशांनी भौतिक विषयांपेक्षा आध्यात्मिक विषयांमध्ये अधिक प्रगति केली आहे; आणि म्हणून, पौर्वात्य मनाला ईश्वरविषयक आकांक्षा सहजस्फूर्त असते.

आणि पश्चिमात्य देशांनी, आध्यात्मिक विषयांपेक्षा भौतिक विषयांत अधिक प्रगति केलेली असल्यामुळे, पाश्चिमात्य मनाची बौद्धिक आणि कलात्मक गोष्टीकडे अधिक प्रवृत्ति आहे. प्राच्य देशांतील जन्मामध्ये, पाश्चात्य देशांतील जन्मापेक्षा, आध्यात्मिक जीवनाकडे अधिक अभिजात प्रवृत्ति असते; आणि पाश्चात्य देशांतील जन्मामध्ये, पौर्वात्य देशांतील जन्मापेक्षा, भौतिक जीवनाकडे अधिक अभिजात प्रवृत्ति असते. परंतु, आत्म्याला विभक्त आणि द्वंद्वमय जीवनाच्या शृंखलांमधून मुक्त होण्यापूर्वी, जीवनाच्या भौतिक आणि आध्यात्मिक, या दोन्ही बाजूंचा अनुभव घ्यावा लागतो. आणि म्हणून, आत्म्याला पौर्वात्य व त्याचप्रमाणे पाश्चात्य देशांतहि जन्म घ्यावा लागतो.

पूर्व आणि पश्चिम.

एखाद्या आत्म्याला जर लागोपाठचे बरेचसे जन्म प्राच्य देशांत घ्यावे लागले, आणि नंतर त्याने पाश्चात्य देशांत जन्म घेतला, तर तो स्वतःबरोबर पौर्वात्य जीवनांतील संस्कार नेतो; आणि तो पाश्चिमात्य देशांत राहत असला, तरी पौर्वात्य पद्धतीचें जीवन व्यतीत करतो. याउलट, आत्म्याला जर पाश्चात्य देशांत लागोपाठ जन्म घ्यावे लागले, आणि नंतर त्याला पौर्वात्य देशांत जन्म मिळाला, तर त्याच्या पाश्चात्य जीवनाचे संस्कार बरोबर ठेऊन, तो पाश्चात्य पद्धतीचें जीवन व्यतीत करतो. म्हणून, कधी युरोपीय आत्मा हिंदी देहामध्ये, तर कधी हिंदी आत्मा युरोपीय देहामध्ये असतो. परंतु, हें लक्षांत ठेवलें पाहिजे, की हा सारा भेद केवळ पूर्वीचे जन्म आणि संस्कार यांच्याशीं सापेक्ष असतो; आणि आत्मा हा स्वत: असल्या सर्व भेदांच्या पलीकडेच असतो.

स्त्रीजन्म आणि पुरुषजन्म, यांमुळे मिळणाऱ्या सोयी व फायदे

अगदी अपरिवर्तनशील नसतात. सृष्टीच्या युगचक्राप्रमाणे, किंवा जन्म प्राच्य देशांत किंवा पाश्चात्य देशांत असेल त्याप्रमाणे, ते फायदेहि बदलतात. एखाद्या युगकालांत, स्त्रियांपेक्षा पुरुष अधिक क्रियाशील, उत्साही आणि पार्थिव प्रवृत्तीचे असतात; तर एखाद्या युगकालांत, याउलट परिस्थिति असते. पूर्वीच्या काळांत, पौर्वात्य भारतीय स्त्रिया वीर आणि बुद्धिवान होत्या. पतीचें सुख आणि कल्याण साधण्याकरता, त्या कोणताहि त्याग फार मोठा मानीत नसत. आणि त्यांची आध्यात्मिक नम्रता आपल्या पतीस प्रत्यक्ष परमेश्वर समजण्यापर्यंत पोंचली होती. परंतु, हल्लीं पूर्वगोलार्धांत, सामान्यत:, सर्वसाधारण स्त्रीपेक्षा सर्वसाधारण पुरुषाची अध्यात्माकडे अधिक प्रवृत्ति असते; तर पश्चिम गोलार्धांत, सर्वसाधारण पुरुषापेक्षा सर्वसाधारण स्त्रीची अध्यात्माकडे अधिक प्रवृत्ति असते. पौर्वात्य मनुष्यापेक्षा पाश्चात्य मनुष्य निराळा असतो. पाश्चात्य स्त्रीपेक्षा पौर्वात्य स्त्री वेगळी असते. आणि गंमत ही, कीं स्त्रीची पुरुषाशीं व पुरुषाची स्त्रीशीं तुलना केल्यास, एकच आत्मा आध्यात्मिक आणि भौतिक बाबींमध्ये, जन्माच्या सृष्टिचक्रानुसार, लिंगभेदानुसार, आणि पार्थिव क्षेत्रानुसार, कमी अधिक अंशाने, श्रेष्ठता, कनिष्ठता किंवा समानता व्यक्त करतो.

सृष्टीचीं युगचक्रें.



# २५ : : जन्मपरंपरा आणि कर्म

## भाग ५ वा

## स्त्री आणि पुरुषजन्मांची आवश्यकता

स्त्रीदेहाचे व पुरुषदेहाचे विशिष्ट फायदे.

स्त्रीपुरुषांना लिंगभेदानुसार मिळणारे फायदे युगानुसार व स्थलानुसार परिवर्तनशील असले, तरी ही गोष्टहि खरीच आहे, कीं स्त्रीविशिष्ट व पुरुषविशिष्ट फायदे, हे दोन्हीहि, अनुभवाचा विकास कांही विशिष्ट दिशांनी होण्याकरता आवश्यक असतात. जें ज्ञान पुरुषजन्मामध्ये सहजसाध्य असतें, तें स्त्रीजन्मामध्ये कष्टसाध्य असूं शकेल; तद्वतच स्त्रीजन्मांत जें ज्ञान सहजसाध्य असेल, तें पुरुषजन्मांत कष्टसाध्य असूं शकेल. सामान्यतः, बुद्धि आणि इच्छाशक्ति, या गुणांमध्ये पुरुष श्रेष्ठ असतात. अचूक निर्णय आणि निश्चल संकल्प करण्याची शक्ति त्यांच्यांत वसूं शकते. याउलट, सामान्यतः, हृदयाच्या गुणविशेषांमध्ये स्त्रिया अधिक श्रेष्ठ असतात; आणि आत्यंतिक प्रेम करणें त्यांना शक्य असल्याने

आपल्या प्रिय व्यक्तीसाठी कोणताहि त्याग त्यांना जड वाटत नाही. स्त्रियांच्या या गुणामुळेच, भक्त जेव्हा भजनगीतें गातात, तेव्हा स्त्रीचें नांव प्रथम घेतलें जातें—उदा. राधाकृष्ण, सीताराम. हृदयाच्या गुणांत, बहुधा स्त्रिया पुरुषांहून श्रेष्ठच असतात. आणि इच्छाशक्ति आणि बुद्धिमत्ता, या गुणांत, बहुधा पुरुष स्त्रियांहून श्रेष्ठ असतात. यांतील मौज ही, कीं एकच आत्मा जेव्हा स्त्रीचा अगर पुरुषाचा जन्म घेतो, तेव्हा तो हृदयाच्या गुणांमध्ये किंवा बुद्धिमत्ता आणि निश्चय, या गुणांमध्ये अधिक श्रेष्ठ होऊं शकतो. कधी स्त्रियांच्या तर कधी पुरुषांच्या रूपांच्या द्वारां आलटून पालटून होणारा विशिष्ट आध्यात्मिक गुणांचा विकासक्रम, तो विकास सर्वांगीण दृष्टीने पूर्ण होईपर्यंत, चालूच राहतो.

ज्याअर्थी, आत्मज्ञानासाठी स्त्री आणि पुरुषजन्म, हे दोन्हीहि सारखेच आवश्यक आहेत, त्याअर्थी, एक दुसऱ्याहून अधिक महत्त्वाचा आहे, असें मानणें बरोबर नाही. त्या दोहोंपासून मिळणाऱ्या फायद्यांच्या प्रकारांमध्ये जरी फरक असला, तरी ते दोन्हीहि अत्यावश्यक आणि अपरिहार्यच आहेत. आत्मा लिंगभेदात्मक द्वैताच्या व वस्तुतः सर्वच प्रकारच्या द्वैतांच्या पलीकडे आहे. हें ज्ञान मिळविण्यासाठी लागणारा संपन्न आणि विशाल अनुभव येण्याकरता, आत्म्याला स्त्रीचे आणि पुरुषाचे, असे दोन्ही प्रकारचे जन्म घेणें जरूर असते.

स्त्रीजन्माची व पुरुषजन्माची आवश्यकता सारखीच आहे.

सर्व संस्कारांतून मुक्त होण्यापूर्वी, आत्म्याला असंख्य स्त्रीजन्म आणि असंख्य पुरुषजन्म घ्यावे लागतात. आत्म्याने जर केवळ स्त्रीजन्मच घेतले असते, किंवा केवळ पुरुषजन्मच घेतले असते, तर

अनुभव एकांगी आणि अपूर्ण राहता. ज्ञानानेच अनुभवांतील द्वंद्वांच्या पलकिडे जातां येतें; आणि जोंवर द्वंद्वपक्षांतील एकाच पक्षामध्ये, अनुभवांचें ज्ञान सीमित असतें, तोंवर तें एकांगीच असतें.

स्त्रीजन्म आणि पुरुषजन्म हे परस्पर-पूरक आहेत.

अनुभव न घेतां उरलेला असा कोणताहि भाग जोंवर अनुभवाच्या विषयांत असतो, तोंवर अनुभवाचा विषय आणि अनुभव घेणारा, यांच्यामध्ये कधीहि एकता होऊं शकत नाही. स्त्रीपुरुषद्वंद्वा ( sex-duality ) ला तर हा नियम विशेषत: लागू आहे.

आत्म्याच्या मन:क्षेत्रांत, स्त्रीजन्मांचे आणि पुरुषजन्मांचे, दोहोंचेहि संस्कार संग्रहीत असतात. आत्मा शरीराशीं तादात्म्य पावत असल्यामुळे, त्या देहाच्या लैंगिक प्रकारभेदा ( sex ) स ज्या मानसिक प्रवृत्ती अनुरूप असतात, त्या व्यक्त होण्यास योग्य असें देहरूपी माध्यम मिळालेलें असतें. आणि त्याच्या विरुद्ध असलेल्या लैंगिक प्रकारभेदां ( opposite sex ) त सापडणाऱ्या प्रवृत्ती, मन:क्षेत्राच्या सुप्त ( unconscious ) भागांत दबून राहतात; कारण, त्या प्रवृत्ती त्या देहप्रकाराला सुसंवादी नसल्यामुळे, त्यांना तें देहरूपी माध्यम, अभिव्यक्तीचें अनुकूल साधन न बनतां, अडथळाच होत असतें. जेव्हा आत्मा स्त्रीदेह धारण करतो, तेव्हा पुरुषदेहविशिष्ट प्रवृत्ती अंतर्मनामध्ये राहतात; आणि केवळ स्त्रीदेहविशिष्ट प्रवृत्तीच अभिव्यक्तीसाठी विमुक्त होतात; आणि जेव्हा आत्मा पुरुषदेह धारण करतो, तेव्हा स्त्रीदेहविशिष्ट प्रवृत्ती अंतर्मनामध्ये राहून, पुरुषदेहविशिष्ट प्रवृत्ती, अभिव्यक्तीसाठी विमुक्त होतात.

मन:क्षेत्रा (psyche) ची विभागणी.

शरीराशीं तादात्म्य झालें, म्हणजे शरीराच्या लैंगिक प्रकारा ( sex of the body ) शींहि तादात्म्य होतेंच. म्हणून, देहाच्या लैंगिक प्रकारा (sex) शीं संवादी असलेल्या मनःक्षेत्राच्या भागास मात्र मोकळेपणाने अभिव्यक्त होण्यास सापडतें; आणि मनःक्षेत्राचा दुसरा भाग अचेतन मना (unconscious) मध्ये सुप्त आणि दबलेला राहिल्यामुळे, चेतन मनात अपूर्णतेची भावना उत्पन्न होते. ही अपूर्णतेची किंवा न्यूनतेची भावना, विरुद्ध लिंगप्रकारा (opposite sex) च्या व्यक्तीवरील आसक्तीच्या द्वारा भरून काढण्याकडे प्रवृत्ति होते. विरुद्ध लिंगप्रकाराच्या व्यक्तीशीं आकर्षणाने संबद्ध होऊन, स्वतःच्या देहरूपाशीं संवादी नसणारा मनःक्षेत्राचा भाग, दुसऱ्याच्या द्वारां, एका प्रकारे, अभिव्यक्त होऊं पहतो. या दृष्टीने पाहतां, लैंगिक आकर्षण म्हणजे मनाचा स्वतःच्याच अचेतन भागाशीं संयुक्त होण्याच्या प्रयत्नाचा परिणाम होय.

लैंगिक आकर्षणा ( sex-attraction ) चा उगम

शरीराच्या लिंगप्रकारा (sex) शीं तादात्म्य पावल्यामुळे, मानसिक आंशिकते (fragmentariness) ची परिपूर्ति करण्याचा सचेतन मन जो अज्ञानमूलक प्रयत्न करीत असतें, त्याची अभिव्यक्ति म्हणजेच लैंगिक आकर्षण होय. परंतु आंशिकतेच्या न्यूनतापूर्तीचा हा प्रयत्न विफल होणार, हें ठरलेलेंच असतें. कारण, तो प्रयत्न देहाशीं तादात्म्य पावण्यावर अधिष्ठित झालेला असतो. एवढेंच नव्हे, तर विरुद्ध लिंगप्रकाराच्या शरीराशीं भिन्नभाव प्रतिष्ठापित

स्वतःसच विफल करणारी न्यूनतापूर्ति ( compensation )

करून, त्याच्याशीं आसक्ति आणि ग्रहणशीलता, यांच्या द्वारां गुंतून गेल्यामुळे, देहात्मभाव अधिकच बलवत्तर होतो.

जेव्हा आत्मा कामवासनेचा त्याग करून, अनासक्तीच्या द्वारां, लिंग–भेदमूलक द्वैताच्या पलीकडे जाऊं पाहतो, तेव्हा तो विरुद्ध लिंगप्रकाराच्या देहाशीं संबद्ध असलेल्या आंतरिक अनुभवाचें ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करीत असतो. म्हणजे, एखादा पुरुष स्त्रीला आपल्या पुरुषी दृष्टींतून पाहून समजून घेण्याचा प्रयत्न करीत नाही; तर, स्त्री स्वत:च्याच वैयक्तिक दृष्टीने, स्वत:बद्दल कोणत्या प्रकारचा आंतरिक अनुभव घेते, हें समजून घेण्याचा तो प्रयत्न करतो. म्हणून विरोधाभास झाला, तरी ही गोष्ट खरीच आहे, कीं विरुद्ध लिंगप्रकारा (opposite sex) च्या देहावर आसक्ति ठेवल्यास, तद्विशिष्ट आंतरिक अनुभवाचें ज्ञान करून घेणें कठिण होऊन बसतें; आणि विरुद्ध लिंगप्रकाराच्या देहावर अनासक्ति ठेवल्यास, तद्विशिष्ट आंतरिक अनुभवाचें ज्ञान करून घेणें सुलभ होतें, कारण अनासक्तीच्या द्वारां लिंगविमूढ ( sex-ridden ) विकृत व दृढ कल्पनांमुळे बनलेला अडथळा दूर होतो.

अनासक्तीच्या द्वारां ज्ञान

जेव्हा मनुष्य लैंगिक द्वैताच्या पलीकडे जाऊन, विरुद्ध लिंग–प्रकाराच्या देहांतील अनुभवाचें ज्ञान करून घेण्याचा यत्न करतो, तेव्हा तो कित्येक वेळां, विरुद्ध विशिष्ट मानसिक प्रवृत्तीहि प्रत्यक्षपणे व्यक्त करतो. उदाहरणार्थ, कांही पुरुष साधक, एका अवस्थेमध्ये, स्त्रियांचा पोषाख प्रत्यक्षपणे घालतात, व त्यांच्यासारखीच भाषा बोलतात; एवढेंच नव्हे, तर त्यांच्या भावना, मानसिक प्रवृत्ती

लिंग-विमूढ कल्पनां-पासून मुक्ति.

आणि सवयी देखील स्त्रियांच्यासारख्याच असतात. परंतु, ही स्थिति चिरकाल टिकणारी नसते. समर्पक अनुभवाचें आंतरिक ज्ञान पूर्ण झालें, म्हणजे त्या व्यक्तींना आपण केवळ स्त्री आहोंत, अगर केवळ पुरुष आहोंत, असें न वाटतां, आपण **स्त्रीपुरुषभावातीत किंवा लिंगभेदातीत** आहोंत, असा अनुभव येतो. जो साधक लिंगभेदाच्या पलीकडे गेला आहे, त्याला स्त्रीविषयक व त्याचप्रमाणे पुरुषविषयक, अशा दोन्ही प्रकारच्या अनुभवांचें ज्ञान होऊं शकतें. **ज्ञानाच्या-द्वारां, लिंगविमूढ कल्पनेच्या विकृत मर्यादितेपासून स्वतःस मुक्त करून घेतल्यामुळे, तो साधक लिंग-भेद-भाव-जनित सीमाबद्धतेने प्रभावित होत नाही.**

सचेतन आणि अचेतन मनांचा संधि (reconciliation)

ज्या पूर्णतेचा मन शोध करीत असतें, ती देहरूपांशीं तादात्म्य पावून, अगर त्यांबद्दल आसक्ति ठेवून मिळत नाही; तर मनाची हरपलेली एकता पुन्हा मिळवून, त्या पूर्णतेस **स्वतःमध्ये** शोधावें लागतें. **सचेतन आणि अचेतन मनाचें समीकरण ( reconciliaton ) लैंगिक आकर्षणा-मुळे किंवा ग्रहणशीलतेच्या इतर कोणत्याहि प्रकारा-मुळे शक्य होत नसून, शरीर आणि त्याचा लिंगप्रकार ( sex ), यांच्यापासून स्वतःची भिन्नता जाणल्यानेच शक्य होतें.** आत्म्याच्या मनःक्षेत्रा ( psyche ) मध्ये संग्रहित केलेल्या अनुभवांची एकरूपता व सुसंबद्धता होण्याच्या मार्गांतील एक मोठा अडथळा, स्वतःस देहाहून भिन्न जाणल्याने नाहीसा होतो. देहात्म-भाव दृढ करणारा लिंगभेद आणि तद्विशिष्ट द्वंद्व, यांच्या पलीकडे जाऊनच, आंतरिक पूर्णतेचा शोध करावयास पाहिजे.

विरुद्ध लिंगप्रकारा ( opposite sex ) च्या व्यक्तीबद्दलच्या आसक्तीपासून मुक्त होणें, म्हणजे आत्म्याने ज्या देहांत जन्म घेतला असेल, त्या देहाच्या लिंगप्रकाराच्या आक्रमक आधिपत्यापासून विमुक्त होणें होय. आणि देहाच्या लैंगिक पारतंत्र्यातून विमुक्त होणे, म्हणजे आत्म्यास देहाशी तादात्म्य पावण्यास भाग पाडणाऱ्या संस्कारांपैकीं बऱ्याच संस्कारांचा नाश करणें होय. लैंगिक द्वैत पार करणें, म्हणजे सर्व द्वैत पार करणें नव्हे; पण त्यामुळे, सर्व द्वैतांच्या पूर्णपणे पलीकडे जाण्याचा मार्ग निश्चितपणे सुलभ होतो. उलटपक्षीं हेहि खरेंच आहे कीं, **लैंगिक द्वैताची समस्या, ही एकंदरींत सर्व द्वैताच्या समस्येचा एक भाग आहे. जेव्हा दिव्य प्रेमामध्ये, ' मी ' किंवा ' तूं ', ' स्त्री ' किंवा ' पुरुष, ' हे भेद नाहीसे होऊन, सर्व प्रकारचे द्वैत लयास जातें. तेव्हाच लैंगिक द्वैताची समस्या देखील पूर्णपणे सोडविली जाते.** विकासाचा जो उद्दिष्ट हेतु आहे, तोच स्त्रीपुरुषजन्माचाहि आहे: आणि तो हेतु, म्हणजे मनुष्याला आपल्या अभंग आणि अविभाज्य अस्तित्वाप्रत पोचण्यास मदत करणे !

ईश्वरी प्रेम



## २६ : : जन्मपरंपरा आणि कर्म

### भाग ६ वा

### लागोपाठच्या जन्मजन्मांतरांमधून कर्माची क्रियाशीलता

जीवात्मा लागोपाठ जे जन्म घेतो, त्यांत सातत्या (continuity) चें आणि एकते ( identity ) चें सूत्र असतें; व तें प्रगत आत्म्याच्या बाबतींत होणाऱ्या स्मृतींच्या पुनर्जागरणामध्ये व्यक्त होतें. या जन्मजन्मांतरांतील एकसूत्रीपणाबरोबरच, त्यांच्यामध्ये कार्यकारणनियमानुसार, कर्म व कर्मनियति अबाधितपणें चालू असते. लागोपाठ येणारे जन्म, त्यांच्या बारीकसारीक विशेषांसुद्धा, अगदी सूक्ष्मतेने आणि अचूकतेने, एका विवेकसम्मत (rational) नियमाने निश्चित आणि बद्ध असतात. आणि म्हणूनच, जीवात्म्यास समंजसपणाच्या आणि ज्ञानयुक्त क्रियेने, आपला भविष्यकाल पाहिजे तसा बनविणें शक्य असतें. गतजन्मांच्या क्रियांमुळे, वर्तमान जन्मांतील गोष्टी आणि परिस्थिति निश्चित होतात; आणि वर्तमान

लागोपाठचे जन्म कर्मनियमांनी नियत असतात.

जन्मांतील क्रिया पुढच्या जन्मांतील गोष्टी आणि परिस्थिति निश्चित करण्यामध्ये भाग घेतात. **कर्मनियम कसा चालूं राहतो, हें समजलें म्हणजेच जीवात्म्याच्या लागोपाठच्या जन्मांचें खरें रहस्य पूर्णपणें दृग्गोचर होतें.**

स्थूल जगतांत, मधूनमधून होणारे पुनर्जन्म, केवळ बाह्यदृष्ट्या अलग अलग किंवा एकमेकांपासून तुटलेले असल्यासारखे वाटतात.

मनोदेहाच्या द्वारां कर्माचें सातत्य.

**अविनाशी व सतत टिकणाऱ्या मनोदेहाच्या द्वारां कर्मानेच जीवात्म्याच्या सर्व जन्मांमध्ये एकसूत्रीपणा व नियति उत्पन्न होतात.** स्थूल जगत् आणि पार्थिव शरीर, यांनाच अस्तित्व असून तेच केवळ सत्य आहेत, असें जोपर्यंत मानलें जातें, तोंपर्यंत कर्मनियम आणि त्याचा अंमल, याचें पूर्ण ज्ञान होणें शक्य होत नाही. सूक्ष्म व कारण देह आणि जगतें, यांच्या अस्तित्वामुळेच कर्म-नियति शक्य होते.

भौतिक चेतना जेथे असूं शकेल, अशी भूमिका ( plane ) म्हणजे स्थूल जग होय. ज्या भूमिकांवर इच्छांची जाणीव होते, त्या भूमिका सूक्ष्म जगामध्ये समाविष्ट होतात. ज्या भूमिकेवर मान-

मनोदेह आणि सूक्ष्मदेह.

सिक जाणीव ( mental consciousness ) असूं शकते, ती भूमिका म्हणजेच कारण जग होय. वासनेचा उगम हा कारणजगतांत असणाऱ्या मनांत असतो. या ठिकाणीं, वासना मनाशीं बीजरूपांत संलग्न असते. ज्याप्रमाणे, बीजामध्ये वृक्ष सुप्त आणि गुप्त रूपांत

वास करीत असतो, त्याप्रमाणे मनोदेहांत वासना सुप्त आणि गुप्त रूपांत वसत असते. मनाचें अधिष्ठानस्थान असणाऱ्या मनोदेहा-(mental body) ला कित्येकवेळां 'कारणशरीर' म्हणतात. कारण, तें स्वतःमध्ये सर्व वासनांचीं कारणें अगर बीजें साठवून ठेवीत असतें. मनांत सर्व संस्कार व प्रवृत्ती प्रसुप्तरूपांत साठविलेल्या असतात. सीमित 'मी' किंवा 'अहंभाव', हा या संग्रहित संस्कारांचा व प्रवृत्तींचाच बनलेला असतो. तथापि, निरनिराळ्या मानसिक प्रक्रियांच्या रूपांत होणारी संस्कारांची प्रत्यक्ष जाणिवेमधील अभिव्यक्ति मात्र सूक्ष्म देहाच्याच द्वारां होते.

अहं-मना (ego-mind)चें सृजन आणि सातत्य.

वास्तविक एकच आणि अविभक्त असलेला आत्मा, हा अहं-मना (ego-mind) चें अधिष्ठान असलेल्या मनोदेहा (mental body)-ने निर्माण झालेल्या मर्यादितेमुळे, व्यष्टीभूत (individualised) झाल्यासारखा भासतो. पूर्वीचे संग्रहित अनुभव व भूतपूर्व कर्मे यांनी उत्पन्न झालेल्या संस्कारांनीच अहं-मनाची रचना होते. आणि पुनर्जन्म घेणाऱ्या जीवात्म्याच्या अस्तित्वाचा गाभा म्हणजे हें अहंचित्तच होय. सुप्त संस्कारांचें संग्रहालय असलेलें अहं-मन मनोदेहविशिष्ट स्थिति अनुभवतें; जेव्हां अहंमन अभिव्यक्त आणि क्रियाशील संस्कारांचा अनुभव घेतें, तेव्हा ती सूक्ष्मदेह-विशिष्ट स्थिति असते; आणि निर्मितिक्षम क्रियेसाठी, जेव्हा अहंमन स्थूलजगतामध्ये उतरतें, तेव्हा ती भूतलावरील जन्माची स्थूल-देहविशिष्ट स्थिति असते. याप्रकारे, पृथग्भाव असलेल्या व्यक्ती-(separate individual.) च्या सर्व अवस्था, ह्या मनोदेह-स्थित अहं-मनाच्याच निरनिराळ्या अवस्था आहेत.

मनोदेहांतील अहंमन, स्वतःमध्ये संग्रहित असलेल्या संस्कारास अनुसरून, खालचे देह धारण करतें. एखाद्या व्यक्तीस तरुणपणीं मृत्यू येईल कीं वृद्धपणीं येईल, ती निरोगी होईल की रोगी, कीं तिला दोहोंचा अनुभव राहील, ती सुंदर असेल कीं कुरूप असेल, त्या व्यक्तीमध्ये, अंधपणासारखें शारीरिक व्यंग असेल कीं ती एकंदरीत आरोग्यसंपन्न राहील, त्या व्यक्तीची बुद्धि तीक्ष्ण असेल कीं जड असेल, तिचें अन्तःकरण शुद्ध असेल कीं अशुद्ध असेल, संकल्पशक्ति दृढ असेल की चंचल असेल, आणि ती व्यक्ति भौतिक वैभव मिळविण्यांतच आपलें जीवन घालवील कीं आत्म्याच्या आंतरिक प्रकाशाचा शोध करील,—हें सर्व मनोदेहस्थित संस्कारांनीच नियत होतें.

अहंमनांतील संस्कारांमुळेच जन्माची विशिष्ट परिस्थिति निश्चित होत असते.

स्वतः अहंमन देखील, कर्मांनी (कर्मामध्ये, केवळ स्थूल आणि भौतिक क्रियांचाच समावेश होत नसून, विचार आणि भावना यांचाहि होतो) मागे ठेवलेल्या संस्कारांनी रूपांतरित होतें. आणि अहंमनांतील घटक व त्याच्या गरजा जशा असतील, त्यांना अनुसरूनच प्रत्येक जन्माची परिस्थिति जमून येते. अशा रीतीने, मनुष्याने एका जन्मांत जर कांही विशेष शक्तींचा किंवा प्रवृत्तींचा विकास केला असेल, तर त्या शक्ती व प्रवृत्ती त्याच्याबरोबर पुढील जन्मांतहि येतात; आणि एका जन्मांत ज्या गोष्टी अपूर्ण राहतात, त्या तदनंतरच्या जन्मांत पूर्ण होऊं शकतात. संस्कारांच्या सातत्यामुळे, एकेका जन्मांत हळूहळू वाढत जाणारे कर्मजन्य परस्परांचे संबंध (karmic links)

द्वैतांतील खेळ.

तदनंतरच्या जन्मांत चालूंच राहातात; व त्यांच्यामुळे, चांगल्या-साठी किंवा वाईटासाठी, ज्यांचा ज्यांचा परस्परांशीं संबंध आलेला असतो, त्यांच्या पुन्हा पुन्हा भेटी होण्याची प्रवृत्ति उत्पन्न होते. अशा रीतीने, द्वैतांतील खेळ चालू राहून, त्याच्या द्वारा आत्म्याचा विरुद्ध द्वंद्वांचा अनुभव पूर्ण व परिपक्व झाला, म्हणजे तो अहंमनाचा त्याग करून, स्वतःस परमात्मरूप असल्याचें जाणण्याकरता अंतर्मुख होतो.

जर काही लोकांत देवाण–घेवाण झालेली असेल, तर त्यांच्यां-मधील कार्मिक आणि संस्कारांचीं बंधने हळूहळू वाढून, त्यांच्यामध्ये हक्क आणि प्रतिहक्क उत्पन्न होतात. आणि ह्या हक्कांची आणि प्रतिहक्कांची परिपूर्ति करण्याकरता, आणि त्याकरता नवीन व्यवहार पुढे चालविण्याकरता, त्यांना पुन्हा एकत्र यावें लागतें. स्वार्थपर हेतूने दिलेल्या गोष्टी-मुळे, जसें देणाऱ्याला बंधन उत्पन्न होतें, तसेंच बंधन देणाऱ्याहून आपण निराळें आहोंत, या भावनेने घेतलेल्या गोष्टींमुळे घेणाऱ्यालाहि होतें. ज्यामुळे असें बंधन उत्पन्न होतें, अशी देवाण–घेवाण, (वस्तू, पैसा अगर कांही भौतिक क्रिया, याप्रमाणे) पार्थिव स्वरूपाचीच असावयास पाहिजे असें नव्हे; ती देवाण–घेवाण भावनांची अगर दृष्टिकोणविषयक कल्पनांचीहि असूं शकेल.

देवाण आणि घेवाण, यामुळे उत्पन्न होणारे हक्क आणि प्रतिहक्क.

एखादा मनुष्य, उच्च भूमिकेवरील संताबद्दल, नमस्कार करून आदर व्यक्त करील, तर त्या संतावर त्याचा हक्क उत्पन्न होतो; आणि

म्हणून, स्वतः तो संत अध्यात्ममार्ग आक्रमण करीत, अंतस्थ भूमिका उल्लंघून जाण्यांत व्यग्र झालेला असला, तरी स्वतःची अग्रगति थोपवून, त्याला त्या आदर व्यक्त करणाऱ्या माणसाला स्वतःच्या भूमिके-पर्यंत घेऊन जावें लागतें. म्हणून, संतांविषयी आदर ठेवण्याचें कर्म हें त्याच्या प्रगतींत हस्तक्षेप करणारें कर्म आहे. याप्रकारें, आदर हा स्वीकरणीय असला, तरी त्यामुळे, आदर व्यक्त करणाऱ्या व्यक्ती-साठी, संताला स्वतःला अध्यात्मपथावर थांबावें लागतें.

अडथळा उत्पन्न करणारें कर्म.

द्वेषापासून द्वेष, कामवासनेपासून कामवासना, आणि प्रीतिपासून प्रीति उत्पन्न होते, ह्या नियमाच्या द्वारां, आत्म्यांची शीघ्र आणि अचूक प्रत्युत्तरक्षमता (responsiveness) दिसून येते. हा नियम केवळ एकाच जन्मांत चालत नसून, अनेक जन्मांमध्ये चालूच राहतो. चालू जन्मांत दृश्य कारण नसलें, तरी पूर्वजन्मांतील शत्रूबद्दल भीति बाळगून, त्याचा द्वेष करण्याची मनुष्याची प्रवृत्ति असते. त्याचप्रमाणे, त्याच्यामध्ये, वर्तमान जन्मीं प्रत्यक्ष दृश्य कारण कांही नसलें, तरी पूर्वजन्मींच्या मित्रावर प्रेम करून त्यास मदत करण्याचीहि प्रवृत्ति असते. बऱ्या-चशा बाबतींत, माणसाला या अकारण प्रवृत्तींच्या कारणांचें ज्ञान असत नाही. परंतु, याचा अर्थ त्या प्रवृत्तींच्या मुळांशीं, खरोखरच कारणें नसतात, असा नाही. वरून वरून पाहिल्यास, ज्या गोष्टींचें स्पष्टीकरण अशक्यसें वाटतें, त्यांचीं खरीं कारणें, गतजन्मांतील कर्मसंबंधांच्या प्रकाशांत विचार केल्यास, समजूं लागतात.

आत्म्यांचें प्रतियोगित्व किंवा प्रत्युत्तरक्षमता (responsiveness)

या एकाच जगांत अनेक जीवात्मे स्वतःला अभिव्यक्ति देण्याचा प्रयत्न करीत असतात; व कर्माचा नियम हा सतत बदलणाऱ्या त्यांच्या परस्परसंबंधींच्या जुळवाजुळवीच्या व व्यवस्थापनाच्या द्वारां, व्यक्त होत असून, तो परस्परसंबंधींच्या प्रत्युत्तरक्षमते ( responsiveness ) चा किंवा प्रतियोगित्वाचा परिणाम आहे. ज्या स्वरलहरी ( rhythm ) वर, दोन आत्म्यांचे संबंध सुरू होतात, ती विवेकशील कर्मांच्या योगाने बदलून उच्च प्रकारची न केल्यास, न बदलतां आहे तशीच कायम राहते.

कर्माचा नियम, हा क्रिया आणि प्रतिक्रिया, यांचा नियम आहे.

सामान्यतः, कृतकर्मांमध्ये स्वतःचीच अशी एक प्रकारची जडता ( inertia ) असतें. कांही विशेष कारण असल्याखेरीज, त्याच्या गतिमत्तेमध्ये बदल होत नाही. कर्म उत्पन्न होण्यापूर्वी, तें कसें असावें, याची निवड करण्याचें मनुष्याला एक प्रकारचें स्वातंत्र्य असतें. परन्तु, एकदां कर्म घडलें, म्हणजे त्याकडे दुर्लक्ष करतां येत नाही; तर त्यापासून होणारे परिणाम भोगून, तें संपवावें लागतें; किंवा नवीन आणि योग्य कर्मांच्या द्वारां, त्याचें निराकरण करावें लागतें.

कर्मविषयक स्वातंत्र्य.

पृथ्वीवरील जीवनांतील यश आणि अपयश, सुख आणि दुःख, त्याचप्रमाणे त्यांतील विघ्नें आणि लाभ, आणि जीवनांत उत्पन्न होणारे शत्रू आणि मित्र, हीं सारीं कर्मानेच निश्चित होत असतात. कर्माच्या नियतीसच साधारणतः नशीब म्हणतात. तथापि नशीब म्हणजे कांही अगदी परकें आणि

नशीब.

जुलमी तत्त्व नाही. पूर्वजन्मांतून मनुष्याच्या पाठीमागे लागत असणारें त्याचें स्वतःचें कर्म म्हणजेच नशीब होय. ज्याप्रमाणे नशीब पूर्वकर्मांच्या द्वारां बनविलें जातें, त्याचप्रमाणे, वर्तमान जन्मांतील कर्मांच्या योगाने त्यांत बदल होऊं शकतो, किंवा त्याचें पूर्ण निराकरणहि होऊं शकतें.

पृथ्वीवरील जीवनामध्ये केलेल्या कर्माचे स्वरूप अहंमनातील संचित संस्कारांनी निश्चित होतें. व या उलट, भौतिक जीवनातील कर्मांच्या प्रकारविशेषामुळेच अहंमनांतील संस्कार निश्चित होतात.

उत्पादक कर्म केवळ पार्थिव शरीरातच शक्य आहे.

अहंचित्तांतील संस्कार आणि कर्मांचा प्रकारविशेष, हे परस्परावलंबी आहेत. विविध अहंचित्तांतील संस्कार बनविण्यांत, व त्यांची पुनर्घटना करण्यांत आणि त्यांना गति देण्यात, पृथ्वीवर केलेल्या कर्मांचा महत्त्वाचा भाग असतो. कारण, कर्मांमुळे अहंमनाला जी गति मिळते, तिच्यामुळेच मनुष्याचें भावि नशीब बनत असतें. उत्पादक आणि फलदायी कर्म, केवळ पृथ्वीवरील जीवनाच्या क्षेत्रांतच घडूं शकतें; व तेंहि जडदेहाच्या द्वारांच घडूं शकतें.

कर्म-नियमांचें योग्य ज्ञान आणि त्याचा उपयोग, यांच्या योगाने विवेकयुक्त आणि ज्ञानयुक्त क्रियेच्या द्वारां, मनुष्यास स्वतःचा भाग्यविधाता (master of the destiny) बनतां येतें. मनुष्य

भाग्यविधाता बनणें.

ज्या प्रकारचा असतो, त्याप्रकारचा तो असण्याचें कारण, म्हणजे त्याची स्वतःचीच पूर्वकर्में होत. आणि स्वतःच्याच क्रियांच्या योगाने, जन्ममरणांमध्ये त्याचें नियंत्रण करणाऱ्या कर्मनियतींतून त्याला कायमचें मुक्त होतां येतें; व त्याला आपल्या इच्छेप्रमाणे स्वतःचें जीवन बनवितां येतें.

टोकळ मानाने पाहतां, कर्म दोन प्रकारचें आहे—बंधनकारक होणारें, आणि आत्म-ज्ञान आणि मुक्ति मिळविण्यास मदत करणारें. जोंवर कर्मांची उत्पत्ति अहं-चित्तांतून होऊन, त्याला पुष्ट करते, तोंवर वाईट कर्मांप्रमाणेच चांगलीं कर्मेंहि बंधनकारकच असतात. परंतु, जेव्हा योग्य ज्ञानांतून कर्मांची उत्पत्ति होते, तेव्हा तें कर्म मुक्तीसाठी उपयुक्त अशी शक्ति बनते. कर्म-नियमांनी उत्पन्न झालेली गुंतागुंत, आत्म्याचा स्वभावविशेष व त्याची खरी पूर्ण भवितव्यता ज्ञानपूर्वक जाणणारे सद्गुरूच या बाबतींत योग्य ज्ञान देऊं शकतात.

विमोचक कर्म.

चांगलें आणि वाईट, यातील भेदाचें ज्ञान मनुष्याला झालें, म्हणजेच ज्याला काही महत्त्व आहे, असें कर्म अस्तित्वांत येतें. बालपणाच्या पहिल्या सात वर्षांत जे संस्कार अभिव्यक्त होतात, ते फार हलके असतात; आणि त्या हलक्या संस्कारांनी प्राप्त होणाऱ्या जाणिवेच्या ठिकाणीं, जगांतील भेदाभेदाविषयीं सापेक्षतेने कमी प्रत्युत्तरक्षमता (responsiveness) असते. म्हणून सातवर्षांखालील बालकांच्या क्रियांमुळे, अहंचित्तावर तितकेसें प्रबल आणि परिणामकारक संस्कार उमटत नाहीत; आणि त्या बालकांचें भवितव्य बनविण्यांत, ते फार महत्त्वाचा भागही घेऊं शकत नाहीत. जेव्हा, आत्म्याच्या ठिकाणीं, जबाबदारीची जाणीव उत्पन्न होते, तेव्हाच अहं-मन आणि त्याचें भवितव्य बनविणाऱ्या परिणामकारक आणि खऱ्या कर्माला प्रारंभ होतो. जबाबदारीची जाणीव

चांगले व वाईट, यातील भेद समजूं लागल्यावर कर्माचा प्रारंभ होतो.

चांगलें आणि वाईट यांतील भेदाभेदाच्या ज्ञानावरच अवलंबून असते. व आत्म्याने बाल्याचीं कांही वर्षे घालविल्यानंतरच, ह्या जबाबदारीच्या जाणिवेचा उदय होतो.

मूल्यांच्या जगता (world of values) मधील कर्म-नियम, हा स्थूल जगतांतील कार्यकारणभावा (law of cause & effect) चें प्रतिरूप (counterpart) आहे.

कार्यकारणभावाच्या नियमाशीं तुलना.

पार्थिव जगतांत जर कार्यकारणाचा नियम नसेल, तर मोठा गोंधळ उडेल; आणि कोणत्या गोष्टीनंतर कोणत्या गोष्टीची अपेक्षा करावयाची, हें लोकांना समजणार नाही. त्याचप्रमाणे, कर्म-नियम नसेल, तर मनुष्याला प्रिय असलेल्या मूल्यांच्या जगतांतील सर्व परिणाम पूर्णपणें अनिश्चित होतील. स्थूल घटनांच्या विश्वांत शक्तीच्या सुरक्षे (conservation of energy) चा एक नियम आहे; आणि या नियमानुसार, कोणतीहि शक्ति कधीहि नष्ट होत नाही. तसाच मूल्यांच्या जगतांत, असा नियम आहे कीं, एकदा कर्म अस्तित्वात आलें, म्हणजे ते त्याचें नैसर्गिक परिणाम घडवून न आणतां, गुपचुप नाहीसें होत नाही; तर तें कर्म त्याचें नैसर्गिक फल येईपर्यंत, किंवा प्रतिकर्मा (counter-karma) ने त्याचें निराकरण होईपर्यंत अनवरतपणें कायम राहतें. चांगल्या क्रियांचे परिणाम चांगले होतात; आणि वाईट क्रियांचे परिणाम वाईट होतात.

मूल्यांच्या जगतामध्ये कार्य व कारण यांच्यांत असणाऱ्या व्यवस्थित संबंधामुळेच, विश्वांतील नैतिक व्यवस्था

( moral order ) टिकली आहे. कर्म-नियमांत जर ढिलाई, अपवाद किंवा उलथापालथ, यांना जागा असती, आणि जर मूल्य-जगतांत कर्म-नियमांची कडक अंमलबजावणी झाली नसती, तर विश्वामध्ये नैतिक व्यवस्था टिकली नसती; आणि जर विश्वांत नैतिक व्यवस्थाच नसती, तर मूल्य-संपादनाच्या दृष्टीने मानवी जीवन धोक्याचें व संदेहग्रस्त होऊन गेलें असतें. ज्या जगांत नैतिक व्यवस्था नाही, त्या जगांत मानवी प्रयत्नांमध्ये संशय आणि अनिश्चितता यांची भीति सतत वाटत राहिली असती. जर कर्म-नियमास धाब्यावर बसवितां आलें, आणि जर साध्य आणि साधनें, यांच्यामध्ये कांही निश्चित संबंध राहिला नाही, तर खऱ्या मूल्यांच्या प्राप्तीसाठी आस्थापूर्वक प्रयत्नच होऊं शकणार नाही. कर्म-नियमाचा कडक अंमल असणें, ही एक महत्त्वपूर्ण क्रियेची अट आहे; कर्म-नियमाची उपेक्षा किंवा उल्लंघन करणें सुरक्षितपणें शक्य झालें, तर मानवाला महत्त्वपूर्ण क्रिया करणें अगदी अशक्य होईल.

विश्वांतील नैतिक व्यवस्था कर्मनियमामुळे टिकते

निसर्गाच्या इतर नियमांप्रमाणेच, कर्मनियम हाहि अनुल्लंघनीय आहे. तथापि, कर्मनियमाच्या अंमलबजावणीची कठोरता म्हणजे एखाद्या बाह्य आणि अंध शक्तीचा अत्याचार आहे, असें आत्म्याला वाटत नाही. तर ती कठोरता जीवनाच्या योजनेच्या विवेकशीलते ( rationality ) ची आवश्यक अशी गोष्ट आहे, असें त्याला पटते. कर्मनियति ही खऱ्या जबाबदारीची अट आहे. अनुभवरूपाने मनुष्याला

कर्म आणि जबाबदारी (responsibility.)

जें जें प्राप्त होतें, त्या सर्वांचा त्याच्या कर्मांशीं निश्चित संबंध असतोच.

जर मनुष्याने एखाद्याचे कांही वाईट केलें, तर त्याला त्याबद्दल शिक्षा भोगावीच लागते. आणि म्हणून, आपल्यावरच उलटणाऱ्या वाईटाचें त्याने खुषीने स्वागत केलें पाहिजे. आणि जर त्याने दुसऱ्याचें कांही चांगले केले, तर त्याचें पारितोषकहि त्याला मिळालेंच पाहिजे; आणि म्हणून, त्यानें त्या स्वतःकडे परतून येणाऱ्या चांगल्याचाहि उपभोग घेतलाच पाहिजे. तो जें दुसऱ्याकरता करतो, तें त्याने स्वतःकरताहि केल्यासारखें होतें. मात्र कित्येकदां हें खात्रीने असेंच आहे, हें समजण्यास त्याला वेळ लागण्याचा संभव असतो. कर्म-नियम, म्हणजे द्वैताच्या साम्राज्यांत होणारी न्यायाची अभिव्यक्ति आहे, किंवा त्यांच्यांत पडणारे जीवनाच्या एकतेचें प्रतिबिंब आहे, असें म्हणतां येईल.

कर्म-नियम ही न्यायाची अभिव्यक्ति आहे.



# २७ : : जन्मपरंपरा आणि कर्म

## भाग ७ वा

## जन्मांतरांचा अनुभव घेणाऱ्या जीवात्म्याची भवितव्यता

**कर्मनियतिमुळे** आत्म्यास घ्याव्या लागणाऱ्या जन्मांची जी एक परंपरा सुरूं होते, तिची प्रवृत्ति सीमारहित होण्याकडे असते..

कार्मिक देणें आणि घेणें.

असंख्य जन्मांमध्ये साधकाचा असंख्य लोकांशीं संबंध येतो; आणि त्याने त्यांच्याशीं घेण्यादेण्याचे अनेक प्रकारचें व्यवहार केलेले असतात. तो आपलें कर्ज देऊन टाकण्याच्या आणि घेणें वसूल करण्याच्या जाळ्यांत अटकून गेलेला असतो. कर्मनियमाप्रमाणे त्याला घेणें अगर देणें टाळतां येत नाहीं; कारण, ते दोन्हीहि वासना-प्रेरित कर्मांचेच परिणाम असतात. आपलें कर्ज देण्यासाठी आणि घेणें वसूल करण्यासाठी, जीवात्मा एकसारखे जन्मच घेत राहतो; आणि हिशेब पुरा करण्याची त्याची इच्छा असली, तरी त्याला तें अनेक वेळां शक्य होत नाही.

एखाद्या मनुष्याचे ज्यांच्याशीं कार्मिक संबंध असतात, ते सर्व त्याने पुनर्जन्म घेतलेला असतांना जडदेहधारी असतीलच असें नाही; किंवा स्वतःची शक्ति आणि परिस्थिति मर्यादित असल्यामुळे, त्या वेळची कार्मिक गुंतागुंत सोडविणें, त्याला कदाचित शक्यहि नसेल. ज्यांच्याशी पूर्वसंबंध असतील, त्यांच्याबद्दलचे हिशेब पुरे करण्याच्या प्रयत्नामध्येच, त्यांच्याविषयी पुन्हा नवीन हक्क आणि प्रतिहक्क उत्पन्न झाल्याशिवाय राहात नाहीत; आणि इतर नवीन लोकांच्याबरोबर देखील, निरनिराळ्या आकारप्रकारांची देणीं-घेणीं होऊन, त्यांच्यामध्ये तो गुंतून जातो. मनुष्याचें देणें-घेणें सारखें वाढतच जाण्याचा परिणाम असा होतो की, त्यमची घोटाळ्याची कार्मिक गुंतागुंत अधिकाधिक होत जाऊन, तिच्यांतून त्याची सुटका होत नाही.

देणे घेणें चुकतें करण्यातील अडचणी.

सद्गुरूच्या द्वारां, कार्मिक जटिलतेतून मुक्तता करून घेता येण्याची सोय नसती, तर कार्मिक देण्याघेण्याचा धागा अखंडपणें आणि सतत चालूच राहिला असता. सद्गुरु साधकास केवळ विमोचक क्रिया करण्याची सर्वोत्तम कलाच शिकवीत नाही; तर तो त्याला त्याच्या कार्मिक गुंतागुंतीपासून प्रत्यक्षपणें मुक्तहि करूं शकतो. ज्याच्या जागतिक आणि विश्वव्यापी जीवनांत सर्व जीवांचा समावेश होतो, त्या परमेश्वराशीं सद्गुरूचें ऐक्य झालेलें असतें; आणि सर्व जीवनाशीं एकरूप झाल्यामुळे, आपल्या प्रातिनिधिक अधिकारांत, साधकाने अनेक जन्मांमध्ये

सद्गुरु कार्मिक देण्याघेण्याचा हिशेब चुकता करण्याचे माध्यम होऊ शकतो.

असंख्य लोकांशी केलेल्या विविध व्यवहारांमुळे उत्पन्न होणारी त्यांच्या विषयीची सर्व देणींघेणीं चुकतीं करण्याकरिता, तो स्वतः माध्यम बनून, मदत करूं शकतो. एखाद्याला जर कोणाशीं संबद्ध व्हावयाचेंच असेल, व कोणाबद्दल आसक्ति ठेवावयाचीच असेल, तर त्याने ईश्वराशीं अगर सद्गुरूशीं संबद्ध व्हावें, हें उत्तम. कारण, या संबंधामुळे, इतर कार्मिक बंधनांपासून मुक्त होणें सोपें जातें.

जेव्हा गतजन्मांच्या सत्कर्मांमुळे मनुष्यास सद्गुरुप्राप्तीचें सौभाग्य लाभतें, तेव्हा त्याने करण्यासारखी सर्वोत्तम गोष्ट हीच, की आपल्या सद्गुरूस शरण जाऊन, त्याने त्याची सेवा करावी. शरणागतीमुळे साधक आपल्या कर्मांचें ओझें गुरूवर टाकतो; आणि त्या कर्मांपासून साधकाला मुक्त करण्याचे मार्ग सद्गुरूस शोधावे लागतात. तसेंच सद्गुरूच्या सेवेमुळे साधकाला कार्मिक गुंतागुंतींतून मुक्त होण्याची संधि मिळते. गुरुशिष्यांचे संबंध, हे एका जन्मांतून दुसऱ्या जन्मांत, व असे अनेक जन्मपर्यंत चालू राहातात. एका शिष्यसंघाला जर सद्गुरूने कांही मार्गदर्शन व साहाय्य केलें असेल, तर सद्गुरु जेव्हा आपल्या कार्यासाठी जन्म घेतो, तेव्हा तो बहुधा त्यांना पुढील पथप्रकाशन करण्यासाठी, आपल्या बरोबर घेऊन येतो. पूर्वजन्मांमध्ये ज्यांचा त्याच्याशीं संबंध आलेला असेल, ते त्याच्याकडे न कळत, चुंबकाकडे आकर्षित झाल्याप्रमाणे, ओढले जातात; मात्र या आकर्षणाचे कारण त्यांना समजत नाही. सद्गुरूबद्दल वाटणाऱ्या या अकारण भक्तीला बहुधा बराच लांब इतिहास असतो; आणि पूर्वजन्मीं शिष्य जेथे थांबला असेल, त्या जागेपासूनच तो बहुधा पुढील जन्मीं प्रारंभ करीत असतो.

गुरुशिष्यांचे संबंध अनेक जन्मपर्यंत चालू राहातात.

शिष्य जेव्हा सद्‌गुरूची कृपा आणि लक्ष आपल्याकडे वेधून घेतो, तेव्हा तें कांही अकारण नसतें. कधीकधी, शिष्यांनी कांही त्याग किंवा प्रयत्न न करतांहि, गुरु त्यांना अध्यात्मदृष्ट्या कांही देतो असें वाटतें; परंतु, अशा बाबतींत, शिष्यांनी या कृपेचा हक्क पूर्व जन्मीचे संबंध आणि प्रयत्न यांच्या योगानें मिळविलेला असतो. सद्‌गुरूबद्दल जें प्रेम आणि भक्ति शिष्याने अनुभवलेली असते, त्यामुळे गुरुशिष्यां मध्ये दृढ संबंध उत्पन्न होतो; आणि म्हणून, शिष्यामधील आध्यात्मिक आकांक्षेच्या जागृतीला अनुसरून, सद्‌गुरूकडून शिष्याकडे कृपा आणि साहाय्य प्रवाहित होत असतें. ज्याप्रमाणे स्वतःच्या बंधनकारक कर्मांच्या योगाने, तो जीवनांतील सुखदुःख किंवा बरें-वाईट याचा अनुभव आपल्यावर ओढवून घेतो, त्याचप्रमाणे आपल्या विमोचक कर्मांच्या योगाने, तो स्वतःवर गुरुकृपेला आमंत्रित करतो.

गुरुकृपा आमंत्रित करणें.

सामान्यतः, अध्यात्ममार्गात ज्याचा प्रवेश होतो, त्याची ध्येयप्राप्ती होईपर्यंत, मार्गावर हळूहळू प्रगति होतच असते, असा नियम आहे; परंतु, अध्यात्ममार्गावर ज्याचा खात्रीपूर्वक प्रवेश झालेला नाही, अगर मार्गदर्शन करावयाला ज्यांना सद्‌गुरु नाही, त्यांना हा नियम लागू नाही. पुष्कळ लोक आपल्या अस्ताव्यस्त प्रयत्नाच्या योगाने, बंधनकारक संस्कारांच्या राशी रचून, आपल्या लक्ष्यापासून दूर जाण्याचा फार संभव असतो. म्हणून, आध्यात्मिक उन्नति, ही साधकाच्या सक्रिय प्रयत्नाशिवाय, किंवा आपोआप होणारी आहे, असें म्हणतां येत नाही.

आध्यात्मिक उन्नतीसाठी सक्रिय उद्योगाची आवश्यकता.

कधी ना कधी, लवकर किंवा उशीरा, पूर्वीच्या अनेक जन्मांत संग्रहित केलेला अनुभवजन्य विचार ( the logic of experience ) प्रत्येकास सर्वश्रेष्ठ ध्येयाचा शोध करण्यास व अध्यात्ममार्गांत प्रविष्ट होण्यास भाग पाडतोच; आणि एकदा साधकाचा अध्यात्मपथांत प्रवेश झाला, म्हणजे त्याची बहुधा स्थिर प्रगति होत राहाते. त्याची जसजशी प्रगति होत जाते, तसतशा त्याच्या कांहीं सुप्त शक्ति जागृत होत जातात; आणि त्यामुळे त्याला सूक्ष्म आणि मनोजगताचा जाणीवपूर्वक आंतरिक अनुभव घेतां येतो. एवढेंच नव्हे, तर तो उच्च भूमिकावर प्राप्त होऊं शकणाऱ्या शक्तींचेंहि संचालन आणि शासन करूं शकतो. पहिल्या दोन भूमिका अनुभविण्यास वाईट आहेत; कोणत्या ना कोणत्या जन्मामध्ये या भूमिकांचा अनुभव घेतलेले लोक पुष्कळ असतात. परंतु, **पहिल्या कांहीं भूमिकांचें उल्लंघन झालें, म्हणजे पुढची प्रगति स्थिर आणि खात्रीपूर्वक होईलच,** असें नाहीं. अध्यात्ममार्गावर पुष्कळ खांचखळगे असतात; आणि अशावेळीं, सद्‌गुरूचें मार्गदर्शन नसेल, तर साधकाची अधोगति होण्याचें भय असतें.

अधोगतीचें संकट.

पहिल्या कांहीं भूमिकांवरून साधकाचें असें कांहीं अधःपतन होऊं शकतें कीं, तो ईश्वराकडे पुढे जाण्याऐवजीं, त्याची अवनतीच होऊं लागते. कांहीं अपवादात्मक बाबतींत, साधक उच्च भूमिकांवरील चुकीच्या कर्मामुळे, आपल्यावर अवनतीची आपत्ति ओढवून घेतो; आणि नंतर, त्याला पूर्वस्थलीं येण्याकरता, युगेंच्या युगें घालवावीं लागतात. ज्या साधकाचें अशा तऱ्हेचें अधःपतन झालें असेल, तो **योग-भ्रष्ट** समजला

योगभ्रष्ट.

जातो. कर्मनियम हा अनुल्लंघनीय असून, तो कोणतेहि अपवाद, सवलती, किंवा पक्षपात जाणत नाही. योगीदेखील या नियमास अपवाद नाहीत. पूर्ण सद्गुरूच्या मार्गदर्शनाचा फायदा ज्यांना मिळत असेल, त्याचाच अध्यात्मप्रवास स्थिर आणि सुरक्षित रीत्या होऊं शकतो; आणि असें असेल, तरच अधःपतनाची किंवा पुच्छगतीची शक्यता टळते. सद्गुरूच्या अभावीं, ज्या चुकीच्या कर्मामध्ये, साधक गुंतून गेला असता, अशा चुकीच्या कर्मापासून, सद्गुरु त्याचें रक्षण करतो.

ध्येयसिद्धि होण्यापूर्वी, अनेक जन्मपर्यंत साधकाचें अध्यात्मपथाचें आक्रमण चालूच असतें. परमेश्वराच्या अंतिम ज्ञानासाठीं, साधकाची अध्यात्मदृष्ट्या तयारी व्हावयाची असेल, तर शेंकडो वर्षे व सतत, त्याग, सेवा, आत्मशुद्धि यातना आणि सत्याचें दृढ अनुसंधान, हीं सर्व करीत राहावें लागतें. जन्मपरंपरेंतून जाणाऱ्या आत्म्याचें ध्येय असणारी ईश्वरानुभूति केवळ एकाच जन्मांत कधीहि प्राप्त होऊं शकत नाही. ईश्वरानुभूति, ही असंख्य जन्मांत सतत करीत राहिलेल्या प्रयत्नांचें 'फळ असतें. अनेक जन्मांतील अज्ञानयुक्त कर्मानें जीवात्म्यास बंधन उत्पन्न होतें; आणि तें बंधन नाहीसें करण्याकरता, जें विवेकयुक्त आणि मोचक कर्म आवश्यक असतें, तेंहि चिकाटीने अनेक जन्मपर्यंत करीत राहावें लागतें.

जीवाला जन्ममरणाच्या चक्रांशीं जखडून टाकणारी शक्ति म्हणजे अलग अस्तित्वा ( separate existence ) ची तृष्णा होय; आणि तीमुळेच द्वैताच्या विश्वांतील विषय आणि अनुभव,

यासंबंधींच्या इतर सर्व अनंत वासना उत्पन्न होतात. **या वासनांच्या तृप्तीसाठीच अहंचित्त पुनःपुनः जन्म घेत राहतें.** जेव्हा सर्व प्रकारची तृष्णा नाहीशी होते, तेव्हा अहंचित्त निर्माण करणारे व नंतर त्याला पुष्ट करणारे संस्कारहि नाहीसे होतात. हे संस्कार नष्ट होतांच, अहंचित्ताचाहि त्याग केला जातो; आणि याचा परिणाम असा होतो, कीं तेव्हा अंतिम सत्य, व अपरिवर्तनीय आणि शाश्वत, अशा परमात्म्याची अनुभूतीच मात्र तेथे उरते.

पुनर्जन्माची प्रेरकशक्ति म्हणजे तृष्णा.

**ईश्वरानुभूति हा अहंचित्ताच्या जन्मांचा अंत आहे, कारण त्याच्या अस्तित्वाचाच तो अंत आहे.** जोंपर्यंत, कोणत्या ना कोणत्या रूपात अहंचित्त कायम असतें, तोंपर्यंत पुनर्जन्मासाठी अपरिहार्य आणि दुर्दम प्रेरणाहि असतेच. **जेव्हा अहंमनाचा अंत होतो, तेव्हा पुनःपुनः जन्म घेणेंहि थांबतें; व आत्मानुभूतीमध्ये अंतिम परिपूर्णतेचा लाभ होतो.**

पुनर्जन्म घेणाऱ्या व्यक्तीच्या जीवनामध्ये पुष्कळ घटना व अवस्था असतात. जीवनाचें चक्र त्या व्यक्तीला कधी उच्चस्थानीं नेतें, तर कधी त्या स्थानावरून अधोगतीस नेतें; व याप्रकारें तें अखंड फेरे करीतच असतें. अशा रीतीने जीवनचक्र अनुभवांच्या समृद्धिपूर्णतेचा परिपोष करण्यास मदत करतें. एका जन्मात प्राप्त न झालेल्या ध्येयाच्या प्राप्तीसाठी, दुसऱ्या जन्मांत प्रयत्न केला जातो; अपुऱ्या राहिलेल्या गोष्टी संपविल्या जातात; अपूर्ण प्रयत्नांत उत्पन्न झालेले खांचखळगे भरून काढले जातात; घडून गेलेल्या चुकांची भरपाई होऊन, त्या सुधारल्या जातात. व्यक्तीव्यक्तींमधील देण्याघेण्याचा हिशेब कार्मिक

पुनर्जन्मांची इतिकर्तव्यता.

देवघेवींच्या द्वारां पुनः व्यवस्थापित होतो. अखेरीस, अनुभवाच्या परिपक्वतेमध्ये, अहंचित्त छिन्नमूल झाल्यामुळे, आत्मा दैवी जीवनाच्या एकमात्र अभंगतेमध्ये प्रविष्ट होतो. या दैवी जीवनांत देण्याचें बंधन नसतें; व घेण्याचेंहि बंधन नसतें. कारण, आत्मा हा निराळेपणाच्या किंवा द्वैताच्या जाणीवेच्या पार गेलेला असतो.

नाटकाचें सादृश्य.

जीवात्म्याच्या सतत चालू असलेल्या जीवनरूपी नाटकाचे पुष्कळ अंक असतात. आत्म्याच्या पृथ्वीवरील अस्तित्वाच्या दृष्टीने, प्रत्येक अंकानंतर त्याच्या जीवनावर पडदा ओढला जातो, असें म्हणतां येईल. परंतु, प्रत्येक अंक स्वयंपरिपूर्ण आहे, असें मानले, तर त्याचें खरें महत्त्व लक्षांत येणार नाही. झालेले अंक आणि होणारे अंक यांमधील दुवा, या संदर्भातच प्रत्येक अंकाचा विचार करावयास पाहिजे; व ज्या संपूर्ण नाटकाचा तो अंक एक भाग आहे, त्या नाटकांतील प्रतिपादित विषयाशीं, त्या अंकाचा रहस्यपूर्ण अर्थ संबद्ध असतो. अंकाचा शेवट हा कांही त्या नाटकांतील विकासशील प्रतिपाद्य विषयाचा अंत नव्हे. पृथ्वीच्या रंगभूमीवरून नट जे अदृश्य होतात, ते परत तेथे येऊन नव्या दमाने व नव्या भूमिका रंगविण्यासाठीच.

नट हे आपापल्या भूमिकांमध्ये इतके रंगून जातात, कीं त्या भूमिकां-(roles)नाच ते साऱ्या अस्तित्वाचा आदि आणि अंत समजतात; आणि असंख्य जन्मे चालणाऱ्या अखंड जीवनाच्या बहुतांश भागामध्ये, त्यांना या परमगुह्य सत्याचें मुळींच ज्ञान नसतें, की या नाटकाचा

कर्ता, आपल्या कल्पनारचित नाट्यकृतीमध्ये स्वतःच्या निर्मिति-

लपंडावाचा खेळ.

क्षम अनंतत्वाचा जाणीवपूर्वक आणि पूर्णत्वाने अनुभव घेण्याकरता, स्वतःच सर्व नटांचीं रूपें घेऊन, लपाछपीचा खेळ खेळत आहे. स्वतःचें अनंतत्व समजून घेण्यासाठी, अनंततेला सान्ततेच्या भ्रमांतून जावें लागतें, आणि सृष्टीच्या युगचक्रांतून अभिव्यक्त होत असणाऱ्या महान व रहस्यपूर्ण कथेचा कर्ता, स्वयमेव आपणच आहों, हें जाणण्याकरिता, त्या नाटककर्त्याला स्वतःच नानाविध नटांच्या विभिन्न अवस्थांचा अनुभव घ्यावा लागतो.



## २८ : मला प्राप्त करण्याचे बारा मार्ग

१. तळमळ:—सहाराच्या वाळवंटांत सूर्याच्या प्रखर उष्णतेने कित्येक दिवसपर्यंत पीडित असलेला मनुष्य पाण्याकरता तडफडतो. तशी तळमळ जर मला प्राप्त करण्याकरता तुमच्या अंतःकरणांत असेल, तर तुम्ही मला प्राप्त कराल.

२. चित्तशांतिः— गारठून बर्फरूप झालेल्या तलावाची शांति जर तुमच्यांत असेल, तर तुम्ही मला प्राप्त कराल.

३. नम्रताः—कोणताहि आकार धारण करूं शकणाऱ्या मातीची नम्रता तुमच्यांत असेल, तर तुम्ही मला प्राप्त कराल.

४. नैराश्ययुक्त विव्हलताः—आत्महत्या करून घेण्यास उद्युक्त झालेल्या माणसांतील तीव्र नैराश्ययुक्त विव्हलतेने जर तुम्ही माझ्या दर्शनाची इच्छा कराल, व जर मला पाहिल्याशिवाय जिवंत राहणेंहि तुम्हांला अशक्यप्राय होईल, तर तुम्ही मला प्राप्त कराल.

५. श्रद्धाः—गुरुवाक्यावर विश्वास ठेऊन, दिवसासहि रात्र मानण्यास तयार असणाऱ्या कल्याण स्वामींची जशी स्वतःच्या गुरू-मध्ये श्रद्धा होती, तशी पूर्ण श्रद्धा जर तुम्ही माझ्यामधे ठेवाल, तर तुम्ही मला प्राप्त कराल.

६. निष्ठाः—तुम्हांला न कळत, ज्या निष्ठेने तुमच्या बरोबर श्वास आमरण राहतो, व तुमच्याविरूद्ध न उलटतां, सुखांत व दुःखांत तुमचा साथीच राहतो, ती निष्ठा जर तुमच्यात असेल, तर तुम्ही मला जाणाल.

७. प्रेमजनित संयमः—मजवरील तुमचें प्रेम जेव्हा तुमची इंद्रियविषयक तृष्णा पूर्णपणें नाहींसे करील, तेव्हा तुम्ही मला प्राप्त कराल.

८. निःस्वार्थ सेवाः—सूर्य जसा सर्व सृष्टीला—शेतांतील गवत, हवेंतील पक्षी, रानांतील श्वापदें व त्याचप्रमाणे अखिल मानव जातींतील पापी व सत्पुरुष, श्रीमंत व गरीब या सर्वांना—त्यांच्या-पासून मिळणाऱ्या मोबदल्याचा विचार न करतां, प्रकाश देतो, तशी निरपेक्ष सेवावृत्ति अंगीं बाणल्यावर, तुम्ही मला प्राप्त कराल.

९. त्यागः—जेव्हा तुम्ही माझ्याकरता आधिभौतिक, मानसिक व आध्यात्मिक—सर्व वस्तूंचा त्याग कराल, तेव्हा मी तुमचाच आहे.

१०. आज्ञाधारकपणाः—ज्याप्रमाणे डोळ्यांना प्रकाश, व नाकाला वास स्वाभाविक असतो, त्याप्रमाणे सहज, स्वाभाविक व

पूर्ण जर तुमचा आज्ञाधारकपणा असेल, तर तुम्ही मला येऊन मिळाल.

११. शरणागतिः—कित्येक दिवसपर्यंत निद्रारहित असलेला मनुष्य, नाहींसे होण्याची भीति न बाळगतां, एकदम निद्रेच्या आधीन होतो; त्या एकनिष्ठतेने जर तुम्ही मला शरण याल, तर मी तुमचाच आहें.

१२. प्रेमः—महापुरुष सेंट फ्रान्सिस याचें जीझस ख्राइस्टवर जसें प्रेम होतें, तसें जर तुमचें माझ्यावर असेल, तर तुम्ही मला प्राप्त तर करालच, परंतु मला संतोषहि द्याल.



## २९ : : : : : : मंडल

अनेक जन्माचा शोध, आत्मशुद्धि, सेवा, व स्वार्थत्याग असला, म्हणजे आत्म्याला ईश्वरप्राप्त सद्‌गुरूची भेट होते; व त्याचा त्याच्याशीं संबंध येतो. आणि त्याला सद्‌गुरूशीं अनेक जन्मात निकट संबंध मिळून त्याची प्रेमपूर्वक सेवा घडली, म्हणजे तो त्याच्या मंडला(circle)मध्ये प्रवेश करतो. सद्‌गुरु जेव्हा अवतार धारण करतो, तेव्हा तो नेहमी त्याच्या मंडलामध्ये असणाऱ्या सर्वांनाहि आपल्याबरोबर घेऊन येतोच. सद्‌गुरूच्या मंडलामधील आत्म्यांना, त्यांच्या प्रयत्नामुळे, ईश्वरप्राप्तीचा अधिकार मिळालेला असतो; व अनुभूतींची वेळ येतांक्षणींच, सद्‌गुरुकृपेने त्यांना ईश्वरानुभूति मिळते.

सद्‌गुरूच्या मंडला-(circle)मध्ये प्रवेश.

•

द्वैतसृष्टीमधील सर्व क्रिया द्वैताच्या संस्कारांनीच प्रेरित होतात द्वैताची जाणीव होण्याकरता, द्वैताच्या संस्कारांची क्रियाशीलता आवश्यक आहे. ह्या द्वैतसंस्कारांमुळे, प्रथम चेतनेचा विकास होऊन

ती सीमित होते; व नंतर त्यांच्याच मुळे, ती चेतना विमुक्त होऊन, आत्मज्ञान किंवा ईश्वरानुभूति मिळण्यास साहाय्य होतें. जोंवर आत्मा द्वैताच्या अनुभवांतून जात नाही, तोंवर त्याला स्वतःच्या एकतेची जाणीव होऊं शकत नाही. व ह्या द्वैताच्या अनुभवांकरता, द्वैताच्या संस्कारांची आवश्यकता असते.

द्वैताच्या संस्कारांचें कार्य.

आरंभापासून शेवटपर्यंत, जीवात्मा हा संस्काराच्या आवेगास आधीन असतो; व संस्कारांमुळेच त्याची भवितव्यता निश्चित होते. ह्यांना प्रारब्धसंस्कार म्हणतात. प्रारब्धसंस्कार, हे नेहमी अनुभवांतील परस्परविरुद्ध द्वंद्वांशीं संबद्ध असतात; उदाहरणार्थ, लोभाचे संस्कार व तद्विरुद्ध संस्कार, कामाचे संस्कार व तद्विरुद्ध संस्कार, क्रोधाचे संस्कार व तद्विरुद्ध संस्कार, वाईट विचार, शब्द व कृति, यांचे संस्कार व तद्विरुद्ध संस्कार.

प्रारब्धसंस्कार.

परमाणूच्या अवस्थेपासून तों ईश्वरानुभूतीच्या अवस्थेपर्यंत, जीवात्मा द्वैतसंस्कारानी सीमित असतो; व त्याला जें काही होतें, तें सर्व या संस्कारांनीच नियत होते. ईश्वरानुभूतीनंतर आत्म्याचे सर्व संस्कार नष्ट होतात. जर तो द्वैतसृष्टीच्या साधारण जाणिवेमध्यें परत न उतरतां, ईश्वरत्वाच्या अनुभवांतच निमग्न राहिला, तर तो सर्व प्रकारच्या संस्कारांच्या पलीकडे राहतो. त्याच्यांत कोणतेहि संस्कार उत्पन्न होत नाहीत, व होऊं शकत नाहीत.

संस्काराचा लोप.

ईश्वरप्राप्त आत्मा द्वैतसृष्टीच्या जाणिवेंत उतरलाच, तर त्याला

विश्वव्यापी समष्टिमन ( universal mind ) मिळतें; व या नवीन मिळालेल्या सार्वलौकिक मनाबरोबरच, त्याला अधर बसणारे व न बांधणारे, असे योगायोगसंस्कार प्राप्त होतात. परात्पर स्थितीमध्ये,

विश्वव्यापी समष्टिमना (universal mind) मधील योगायोगसंस्कार.

सद्गुरु हा सर्व संस्कारांपासून मुक्त असतो; आणि योगायोगसंस्कार देखील त्याच्या विश्वमनांवर अधरपणे आरूढ झालेले असल्यामुळे, सृष्टीविषयी सचेतन राहून, तिच्यांत कार्य करीतच असतांना देखील, तो या योगायोगसंस्कारानीहि बाधला जात नाही. योगायोग संस्कार त्याच्या जागतिक कार्यांच्या प्रवाहास कालव्याप्रमाणे असतात; ते त्याच्या जाणिवेला शृंखलाबद्ध करीत नाहीत.

योगायोगसंस्कारांची क्रिया यंत्रतुल्य व स्वतःगतिशील ( automatic ) असते. ज्या कांही संसर्गांना किंवा संबंधांना ईश्वरप्राप्त पुरुष क्रियाशील उत्तर देतो, ते सर्व या योगायोगसंस्कारांवर अवलंबून असतात. ह्या योगायोगसंस्कारांमुळे, सार्वलौकिक समष्टिमनावर आवरण पडत नाही; किंवा त्यांच्यामुळे अज्ञानमेघ जमत नाहीत. ते केवळ सुनिश्चित क्रियाशीलतेच्या विमोचनाकरता आवश्यक असलेल्या साच्याचेंच कार्य करतात.

योगायोग संस्कारांची क्रिया.

ईश्वराची जागतिक इच्छा, या योगायोगसंस्कारांच्या द्वारां, विशिष्ट रूपात अभिव्यक्त होते. देशकालांतर्गत सृष्टींतील कोणतीहि कृति एखाद्या सुनिश्चित विशिष्ट परिस्थितीशीं किंवा घटनाराशींच्या वातावरणाशीं संबद्ध असते. तसेच दुसऱ्या परिस्थिति सोडून, एका परिस्थितसिच क्रियाशील प्रत्युत्तर देण्यांत येतें, व तेंहि दुसरे सर्व

प्रकार सोडून, एका विशिष्ट रीतीनेच देण्यांत येतें, याला कांहीतरी कारण असतेंच. बद्ध जीवाची क्रियाशीलता, ही त्याच्या बंधनकारक प्रारब्धसंस्कारांनी निश्चित व सीमित होते; व आध्यात्मिक स्वतंत्रतेस प्राप्त झालेल्या आत्म्याची क्रियाशीलता, ही त्याच्या न बांधणाऱ्या योगायोगसंस्कारांनी निश्चित व सीमित होते.

साधारण जाणीवेमध्ये उतरत असतांना, ईश्वरपुरुषाला हे योगायोगसंस्कार मिळाले नसते, तर त्याला कोणतेंहि निश्चित स्वरूपाचें कार्य करतां आलें नसतें. ईश्वरपुरुषाला स्वतःमधून दैवी इच्छेस विशिष्ट रूपाने अभिव्यक्त करण्यास, व स्वतःची इतिकर्तव्यता (mission) सिद्धीस नेण्याकरिता योगायोगसंस्कारांची मदत होते.

सद्गुरूच्या कार्यालाहि सृष्टीचे नियम लागूच आहेत.

सद्गुरु हा अस्तित्व, जाणीव, ज्ञान, आनंद, प्रेम व शक्ति, या सर्वांच्या बाबतींत अनंत असतो, व तसे तो स्वतःला जाणतो; आणि परात्पर स्थितीमध्ये, तो नेहमी अंतरहितच राहतो. परंतु त्याने केलेल्या सृष्टींतील कार्याला सृष्टीचे नियम लागूच असतात; व त्यामुळे त्याचें कार्य एका अर्थाने सीमित असतें. प्रत्येकामध्ये प्रच्छन्न असलेली अनंतता व दिव्यता अनावृत करण्याचा जो सृष्टीचा हेतु आहे, तो सिद्ध करण्याचेंच त्याचें कार्य असल्यामुळे, त्याचें महात्म्य असीम आहे. परंतु, केवळ परिणामांच्या दृष्टीनेच त्याची मोजमाप केली, तर, जगांत शक्य असलेल्या इतर कार्याप्रमाणेंच सद्गुरूचें कार्यहि इतकें किंवा तितकेंच व त्याहून अधिक नाही, असें सीमित असतें.

परंतु, ईश्वरपुरुषा (God-man) चें कार्य केवळ परिणामांच्या

दृष्टीने मोजलें, तरी संसारासक्त लोकांच्या कार्यांचीं फलें, ईश्वर-पुरुषाच्या कार्यांच्या फलांहून, विस्ताराच्या दृष्टीने, किती तरी कमी व तुच्छ असतात. बद्धजीवांतील थोरांतथोर आत्मादेखील ईश्वरपुरुषास शक्य असलेल्या परिणामां-एवढे परिणाम, केवळ विशालतेच्या दृष्टीनेहि घडवून आणूं शकत नाही. ईश्वरपुरुषाच्या कार्यांच्या मागे ईश्वराची अनंत शक्ति असते; व संसारासक्त मनुष्य, स्वत:च्या अहंमनां( ego-mind )तून मिळणाऱ्या सीमित शक्तीनेच कार्य करीत असतो. परंतु केव्हा केव्हा, ईश्वरपुरुष देखील, एखादें नेमलेलें मर्यादित कार्य आटोपून, आपलें देहधारित्व संपुष्टांत आणतो. आणि ह्याचें कारण त्याची शक्ति सीमित असते, हें नसून, त्याचें योगायोगसंस्कारांनी नियत झालेलें कार्य नेमकें तितकेंच असतें, व त्याहून अधिक नसतें, हें होय. योगायोगसंस्कारांनी नियत झालेलें त्याचें कार्य संपविल्यावर, तो पुन्हा अनंततेच्या अव्यक्त स्वरूपांत विलीन होण्यास तयार होतो. तो ह्या मिथ्या व द्वैतपर जगतामध्ये, योगायोगसंस्कारांस अनुसरून आवश्यक असलेल्या कालावधीपेक्षा, एक क्षणहि अधिक थांबत नाही.

सद्गुरूच्या कार्यक्षेत्राचा विस्तार योगायोगसंस्कारांनी नियत होतो.

पूर्ण सद्गुरूप्रमाणेच अवतारालाहि मंडल (circle) असतें. ज़ेव्हा अवतार देह धारण करतो, तेव्हा त्याच्यासमोर कांही अत्यंत स्पष्टपणें निश्चित असलेलें कार्य असतें; व तें योजनेप्रमाणे चालू होतें. ही योजना काल-प्रवाहास अनुलक्षून व्यवस्थित केली असते. अवताराची जन्म घेण्याची क्रिया अद्वितीय असते. स्थूल देह धारण करून द्वैतसृष्टीमध्ये उतरण्यापूर्वी,

अवतार व त्यांचें मंडल.

तो स्वत:ला व स्वत:च्या मंडलामधील व्यक्तींना, विज्ञानी संस्कार, म्हणून विशेष प्रकारचे संस्कार देतो. अवताराच्या मंडलांत नेहमी एकशेवीस व्यक्ति असतात; व अवतार जेव्हा देह धारण करतो, तेव्हा, या सर्वांनाहि जन्म घ्यावा लागतो. स्थूल देह धारण करण्या: पूर्वी विज्ञानी संस्कारांना ग्रहण करणें, म्हणजे स्वतःवर व स्वतःच्या मंडलावर आवरण टाकण्यासारखें असतें. जन्म घेतल्यावर, स्वतःने नियोजित केलेली वेळ येईपर्यंत, अवतार या विज्ञानी संस्कारांच्या आवरणाने आच्छादित राहतो. परंतु, नेमलेली वेळ आल्याबरोबर, त्याला स्वत:च्या मूळ ईश्वरत्वाचा अनुभव येऊन, तो विज्ञानी संस्कारांच्या द्वारां, कार्य करण्यास सुरवात करतो. परंतु, कार्याच्या प्रारंभापूर्वीच, त्याच्या विज्ञानी संस्कारांचें समष्टिमनांतील योगायोगसंस्कारांमध्ये परिवर्तन होतें.

विज्ञानी संस्काराचे स्वरूप.

व्यावहारिक दृष्टीने पाहतां, विज्ञानी संस्कार, हे साधारण द्वैत-मूलक संस्कारांप्रमाणेच असले, तरी त्या दोहोंमध्ये महत्त्वपूर्ण फरक आहे. साधारण संस्कार ज्या कृतींना व अनुभवांना आमंत्रित करतात, त्यांचीच प्रेरणा विज्ञानी संस्कारांनीहि होते. साधारण संस्कारांनी प्रेरित झालेल्या कृतीमुळे व अनुभवांमुळे, भ्रमात्मक द्वैताची पकड अधिक दृढ होत जाते; तर विज्ञानी संस्कारांनी प्रेरित झालेल्या कृतीमुळे व अनुभवांमुळे, ती पकड व्यवस्थितपणे सैल होत जाते. विज्ञानी संस्कारांच्या अभिव्यक्तीची अर्थपूर्ण नियति ही सत्ताविस्ताराच्या एकतेचा अनुभव आमंत्रित करते; आणि म्हणून, विज्ञानी संस्कारांना, ‘एकतेच्या प्रवेशद्वाराचा उंबरठा’ म्हणतात.

मंडलांतील व्यक्ति, अवताराने ईश्वरानुभूतीकरिता ठरविलेली वेळ येईपर्यंत, विज्ञानी संस्कारांच्या आवरणांत आच्छादित राहतात. आणि त्यांना अवताराकडून अनुभूति मिळाली, म्हणजे त्यांनी बरोबर आणलेल्या विज्ञानी संस्कारांचें आवरण न बनता, त्यांचे योगायोगसंस्कारांमध्ये रूपांतर होतें. आणि हे योगायोगसंस्कार पृथ्वीवरील ईश्वरी योजनेच्या परिपूर्तीकरिता साधन बनतात.

ईश्वरानुभूतीची ठरलेली वेळ.

विज्ञानी संस्कार व योगायोगसंस्कार, या दोहोंमध्ये एक महत्त्वाचा भेद आहे. विज्ञानी संस्कारांमुळे, अखेरीस एकत्वाची अनुभूति मिळत असली, तरी अनुभूति येईपर्यंत, त्यांच्या द्वारां, सीमित असण्याचाच अनुभव मिळतो. परंतु, अनुभूतीनंतर प्राप्त होणाऱ्या योगायोगसंस्कारांमुळे, द्वैतातीत अनंततेच्या अनुभवामध्ये, किंचित्‌हि विघ्न न येतां, द्वैतपर सृष्टीमधील प्रत्युत्तरात्मक क्रिया नियत होतात. विज्ञानी संस्कारांच्या परिणती (working out) मुळे, स्वतःला अनुभूति मिळते; तर योगायोगसंस्कारांच्या परिणतीमुळे, अद्यापपावेतो बंधनांतच असलेल्या, इतरांना अनुभूति मिळण्यास मदत होते.

विज्ञानी संस्कार व योगायोग संस्कार या दोहोंमधील भेद.

परात्पर अवस्थेमध्ये देशकालाला व अखिल भासमान विश्वाला मुळी अस्तित्वच नसतें. भासमान द्वैतपर सृष्टीमध्येच, देशकालाला व कार्यकारणनियमाला अस्तित्व आहे. म्हणून, सद्‌गुरु जेव्हा मानवतेच्या उद्धाराकरिता, द्वैताच्या क्षेत्रांत कार्य करतो, तेव्हा तो देखील देशकाल व कार्यकारणभाव यांच्या नियमांत येतो. आणि वस्तुतः, तो परात्पर स्थितीं (beyond

परात्पर स्थिति.

state) तील एकतेचा व अनंततेचा अनुभव नेहमीच घेत असला, तरी त्याच्या बाहेरील कार्याच्या दृष्टीने पाहिल्यास, तो, कधीकधी, सीमित असल्याचें भासतें. तो स्वत: कालातीत असला, तरी तो जेव्हा द्वैतांत असलेल्या इतरांच्याकरिता क्रियाशील बनतो, तेव्हा कालाला महत्त्व असतें.

साधारणतः, श्रेष्ठतर देहांमधून, मानवतेबद्दलचें सद्गुरूचे जागतिक कार्य अविश्रान्त चाललेलेंच असतें. परंतु, जेव्हा तो स्वतःच्या मंडलांतील व्यक्तींकरिता कार्य करतो, तेव्हा तो अतिशय काळजीपूर्वक व दक्षतेने वेळेची निवड करतो; कारण त्याच्या ह्या क्रियेने, त्यांच्या संस्कारांच्या यंत्रतुल्य परिणतीमध्ये निश्चयात्मक व विवक्षित स्वरूपाचा हस्तक्षेप ( intervention ) होत असतो. मंडलाकरिता, तो ठराविक वेळीं कार्य करतो; म्हणून, गुरूच्या सूचना अमलांत आणतांना, जे त्यानें सांगितलेली वेळ पाळतात, त्यांना त्याच्या खास क्रियाशीलतेचा फायदा मिळतो. सद्गुरूने स्वतःसमोर जें विशिष्ट कार्य ठेवलेलें असतें, त्याच्या दृष्टीने, वेळ ही एक अतिशय महत्त्वाची बाब असते. मंडलांतील व्यक्तींकरता, सद्गुरु जें खास कार्य करतो, त्याचा संपर्क व प्रभाव केवळ त्या व्यक्तींवरच पडत नसून, त्या व्यक्तींशीं संबद्ध असलेल्या इतर लोकांवरहि पडतो.

मंडलाबद्दलचें विशेष कार्य.

मानवतेसंबंधीच्या आपल्या आध्यात्मिक कर्तव्याचें व्यवस्थापन करण्यामध्ये, ज्या विशिष्ट गोष्टींचा सद्गुरु उपयोग करतो, त्या सर्वांमध्ये, त्याचें मंडल ही अत्यंत महत्त्वाची बाब आहे. पूर्वीचे अत्यंत निकट सहवास व संबंध, यांच्यामुळे हें मंडल अस्तित्वांत

आलेलें असतें. प्रत्येक सद्गुरूला अशा प्रकारचें निकट शिष्यांचें मंडल असतेंच; परंतु त्या मंडलामुळे, त्याच्या आंतरिक चेतनेला कोणत्याहि प्रकारची सीमा उत्पन्न होत नाही. ईश्वरावस्थेमध्ये, सद्गुरु हा स्वतःस अखिल विश्वाच्या व त्याचप्रमाणे सर्व वस्तुजातीच्या केन्द्रामध्येच असल्याचे पाहतो; व त्यामुळे त्याला परिघांत बद्ध करणारे, असें कोणतेंहि वर्तुळ असत नाही. द्वैतरहित अनंततेमध्ये आवडनिवड नसते. भासमान सृष्टीमध्ये, जें एक कर्तव्य व कार्य सद्गुरूने हातीं घेतलें असतें, त्याच्याच दृष्टीने मंडलाला अस्तित्व असतें. मात्र भासमान सृष्टीमधील ह्या आध्यात्मिक कार्याच्या दृष्टीने, मंडल हें हिमालयाइतकेंच खरें असतें.

मंडलाच्या परिघाने सद्गुरु सीमाबद्ध होत नाही.



# ३० : : : : : माया

## भाग १ ला.

## ( मिथ्या मूल्यें )

प्रत्येक माणसाला अंतिम सत्य ( truth ) जाणण्याची व अनुभवण्याची इच्छा असतेच; परंतु जोंवर अज्ञान हें अज्ञान म्हणून ओळखलें जात नाही, तोंवर सत्य हें सत्य म्हणून जाणतां किंवा अनुभवतां येत नाही. याकरिताच अज्ञानाच्या बुडाशीं असणारें मूलतत्त्व जी माया, तिचें यथार्थ स्वरूप जाणणें अत्यंत आवश्यक व महत्त्वाचें बनतें. मायेबद्दल लोक पुष्कळ वाचतात किंवा ऐकतात; परंतु फारच थोड्या लोकांना मायेचें यथार्थ स्वरूप समजत असतें. माया वास्तविक जशी आहे, तशी समजून घेणें आवश्यक आहे; तिचें केवळ वरपांगी ज्ञान करून घेण्याने भागत नाही. **अज्ञानाचें मूलतत्त्व असणारी माया जाणली, की विश्वाचें अर्धे तत्त्व समजल्यासारखें आहे.** आत्म्याला स्वानुभवाची स्थिति

मायेची विविध असत्यें समजून घेण्याची आवश्यकता.

प्राप्त होण्याकरता, त्याचें सर्व प्रकारचें अज्ञान नाहीसें झालें पाहिजे; म्हणून, मिथ्या वस्तु व त्यांचें मिथ्यात्व जाणून घेण्याची व त्यांच्या मिथ्यात्वाच्या ज्ञानानें मिथ्यात्वाचा निरास करण्याची फार आवश्यकता आहे.

मिथ्यात्वाचें सार.

मिथ्यात्वा (falsehood) चें मूळ स्वरूप तत्त्वतः काय आहे? सत्याला सत्य म्हणून जाणणें किंवा खोट्याला खोटें म्हणून जाणणें, हा एक ज्ञानाचा प्रकार आहे; त्यांत मिथ्यात्व नाही. खऱ्याला खोटें व खोट्याला खरें समजण्यांत—म्हणजे कोणतीहि वस्तु जशी नसते, तशी ती मानण्यामध्येच मिथ्यात्व ( falsehood ) सांठवलेलें आहे. सारांश, कोणत्याहि गोष्टीचें यथार्थ स्वरूप समजण्यामध्ये चूक झाली, म्हणजे मिथ्यात्व किंवा खोटेपणा उत्पन्न होतो.

ज्ञानाचे दोन प्रकार

स्थूल मानानें बोलावयाचें, म्हणजे ज्ञानाचे दोन प्रकार आहेत:— (१) अस्तित्वांत असलेल्या वस्तूंविषयी केवळ बुद्धिजन्य निर्णय (judgments of fact) व (२) वस्तूंच्या महत्त्वाबद्दल सारासार-विवेचनात्मक मूल्यमापन करणारे निर्णय (judgments of valuation). केवळ बुद्धिजन्य निर्णयांचा अर्थपूर्ण मूल्यां (values) शीं कांही संबंध असेल, तरच त्यांना महत्त्व येतें; परंतु अर्थपूर्ण मूल्यांशीं असणारा त्यांचा संबंध तुटला, तर त्यांना स्वतःचें असें फारच कमी महत्त्व असतें. उदाहरणार्थ, एखाद्या विशिष्ट वृक्षामध्ये नक्की किती पानें आहेत, या बाबतींत सहसा कोणीहि लक्ष घालीत नाही. सैद्धांतिक दृष्टीनें, ही माहिती ज्ञानाच्या कोटींतच

येते. परंतु, अशा माहितीचा किंवा ज्ञानाचा सारभूत मूल्यांशीं जिव्हाळ्याचा संबंध नसतो; व म्हणून त्या ज्ञानाला मुळीच महत्त्व दिलें जात नाही. जर (१) बुद्धिजन्य ज्ञानामुळे, सारभूत मूल्यें प्राप्त होणाऱ्या साधनावर ताबा मिळून, त्यांची प्राप्ति होणार असेल, किंवा (२) जर बुद्धिजन्य ज्ञान मूल्यमापनामध्येच शिरून, गृहीत मूल्यांचें स्वरूप बदलून टाकीत असेल, तरच त्याला महत्त्व असतें.

मूल्यमापनाचे बाबतीत आढळून येणाऱ्या तीन चुका.

ज्याप्रमाणे ज्ञानाचे दोन प्रकार आहेत, त्याप्रमाणे अज्ञानाचेहि दोन प्रकार होतात. (१) ज्या गोष्टी वास्तविकपणें खऱ्या नाहीत, त्यांना खरें समजण्याची चूक करणें, हें एक प्रकारचें अज्ञान आहे, (२) मूल्यमापनाचे बाबतींत चूक करणें, हें दुसऱ्या प्रकारचें अज्ञान आहे. मूल्यमापनाच्या बाबतींत तीन प्रकारच्या चुका होऊं शकतात. (१) जें बिनमहत्त्वाचें आहे, त्याला महत्त्व देणें; (२) जें महत्त्वाचें आहे, त्याला बिनमहत्त्वाचें मानणें; व (३) ज्या गोष्टीला जें वास्तविक महत्त्व असतें, त्याहून निराळेंच असें दुसरें महत्त्व त्या वस्तूवर लादणें. हे सर्व मिथ्यात्वाचे प्रकार मायेमुळेच निर्माण होतात.

मूल्यमापनामधील चुकांचे घोर दुष्परिणाम.

आध्यात्मिक दृष्ट्या, मायेमध्ये सर्वच मिथ्यात्वाचा किंवा भ्रमांचा समावेश होत असला, तरी कांही भ्रमांना फार महत्त्व असतें; व कांहींना नसतें. एखाद्याला सिंहासनाची उंची आहे त्यापेक्षा जास्त वाटली, तर तो एक भ्रमच आहे; परंतु, त्या भ्रमाला फारसें महत्त्व नाही. उलटपक्षीं, एखाद्याला सिंहासन मिळविणें, हेंच

जीवनाचें एकमेव ध्येय व सार वाटेल, तर तोहि भ्रमच आहे; पण ह्या भ्रमामुळे, त्याच्या अखिल जीवनसरितेचा प्रवाह बदलून, त्याची महत्ताहि पूर्णपणे प्रभावित होते. एकंदरींत पाहतां, वस्तुमात्रांच्या गुणधर्मांच्या बाबतींतील केवळ बुद्धिजन्य निर्णयामध्ये घडलेल्या चुकांपेक्षा, मूल्यमापनामध्यें घडलेल्या चुकांमुळे, जीवन अधिक ध्येयच्युत, दूषित किंवा संकुचित होतें.

मनांतील वासनांच्या प्रभावामुळे खोटीं मूल्यें निर्माण होतात.

मनांतील वासना व इच्छा यांच्या प्रभावामुळेंच मूल्यमापनाच्या बाबतींत चुका घडतात. खरीं व सारभूत मूल्यें हीं वस्तुगत, (intrinsic) अंतस्थ व स्वयंसिद्ध असतात; म्हणजे सारपूर्णता हा त्या वस्तूचा स्वतःसिद्ध स्वभाव असतो. यथार्थ मूल्यें वस्तुगत असल्यामुळे, चिरस्थायी व अनुपाधिक ( absolute ) असतात; तीं वेळोवेळीं किंवा माणसापरत बदलत नाहीत. परंतु, खोटीं मूल्यें वासनानिर्मित असून, तीं मानसिक अंतःसृष्टी (subjective background) वर अवलंबून असतात; व तीं मूल्यें मनोगत घटकांवर आश्रित असल्यामुळे, सापेक्ष, ( relative ) नश्वर व वेळोवेळीं प्रत्येक माणसापरत बदलणारीं असतात.

उदाहरणें.

उदाहरणार्थ, सहारा वाळवंटांतील तृषित मनुष्याला कोणतीहि वस्तु पाण्याहून अधिक मोलाची वाटत नाही; पण ज्याला तहान लागलेली नाही, व शिवाय ज्याच्याजवळ पाण्याचा विपुल संचय आहे, तो पाण्याला तेंच महत्त्व देत नाही. त्याचप्रमाणे क्षुधित माणसाला अन्नाचें फार महत्त्व असतें; पण नुकतेंच भोजन केलेला माणूस पुन्हा भूक

लागेपर्यंत बहुधा अन्नाचा विचारहि करत नाही. हेंच इतर तृष्णा व वासना, यांनाहि लागूं पडतें. इतर तृष्णा व वासनांमुळेंहि, त्या तृष्णांची व वासनांची पूर्ति करणाऱ्या विषयांवर कल्पित व सापेक्ष मूल्यांचा आरोप होतो.

या तृष्णांच्या व वासनांच्या कमीअधिक तीव्रतेप्रमाणे व निकडी-प्रमाणे, इंद्रियांचे विषयहि कमीअधिक महत्त्व पावतात. जर ह्या तृष्णा व वासना अधिक तीव्र व निक-डीच्या झाल्या, तर तद्विशिष्ट इंद्रियांच्या विषयांचें महत्त्व वाढतें; व जर ह्या तृष्णा व वासना क्षीण झाल्या, तर त्या इंद्रियविषयांचेंहि महत्त्व बरेचसें घटतें. व जर ह्या तृष्णा व वासना मधून मधून व्यक्त होत असतील, तर त्या सुप्त असतांना, इंद्रियविषयांना संभाव्य मूल्य (possible value) असतें; व त्या व्यक्त होत असतांना, त्या विषयांना प्रत्यक्ष भासमान मूल्य (actual value) असतें. परंतु, हीं सर्व मूल्यें मिथ्या किंवा भ्रममूलच असतात, कारण तीं प्रत्यक्ष वस्तूमध्ये नसतात. खऱ्या ज्ञानाच्या प्रकाशांत, जेव्हा सर्व वासनांचा व तृष्णांचा पूर्ण लोप होतो, तेव्हा ह्या वासना व तृष्णांमुळें जें विषयांना उसनें महत्त्व आलेलें असतें, तें सर्व एकदम नाहीसें होतें; व इंद्रियांचे सर्व विषय असार, महत्त्वशून्य व तुच्छ असल्याचें प्रत्ययास येतें.

खोटीं मूल्यें अन्याश्रित व सापेक्ष असतात.

ज्याप्रमाणे चालू नसलेलें एखादें नाणें एका अर्थी अस्ति-त्वांत असलें, तरी खोटेंच समजलें जातें, त्याप्रमाणे इंद्रियविषय सारशून्य व तुच्छ असल्याचें प्रत्ययास आल्यावर, त्यांना एक प्रकारचें भासमान अस्तित्व राहिलें, तरी खोटेच गणले जातात. एका अर्थानें, ते सर्व इंद्रियविषय तेथें

इंद्रियांच्या पदार्थांची निस्सारता.

असतातच; परंतु त्यांना पूर्वीचा अर्थ ( meaning ) राहत नाही. त्यांना पूर्वीचें महत्त्व नसतें; ते रिक्त ( empty ) बनतात. वासनामुळे व तृष्णांमुळे दूषित झालेल्या कल्पनेसमोर, ते तृप्तीचे खोटें आश्वासन ( false promise of fulfilment ) मांडतात; पण शांत व स्थिर दृष्टीने पाहिल्यास, त्यांना आत्म्याहून अलग असें किंचितहि महत्त्व राहत नाही.

बिनमहत्त्वाच्या गोष्टींना महत्त्व देणे.

आपली प्रिय व्यक्ति मरण पावल्यास, दुःख, सुनेपणा व एकटेपणा अनुभवास येतात; पण पूर्वी नेहमीच्या पाहण्यांत असलेल्या मनुष्याचे बाबतींत चुकल्यासारखे ( missing ) वाटावयास लावणाऱ्या हुरहुरीच्या बुडाशीं, आत्म्याहून व्यतिरिक्त घेतलेल्या त्याच्या रूपा ( form ) वरील आसक्तीच असते. परंतु आत्मा नष्ट न होता, त्याचा केवळ रूपमय आकारच नष्ट झालेला असतो. आत्मा मरण पावत नाही; व स्वतःच्या खऱ्या स्वरूपांत तर तो सर्वव्यापी असल्यामुळे, इतरत्र गेलेलाहि नसतो. परंतु, देहावरील आसक्तीमुळे, देहच महत्त्वाचा समजला जातो; व सर्व इच्छा, व विचार त्या देहाभोवतीच केंद्रित झालेल्या असतात. म्हणून, देह नष्ट झाल्यावर, त्यामुळे उत्पन्न होणारी उणीव ( vacuum ) विगत व्यक्तीसंबंधी भासणाऱ्या सुनेपणाच्या द्वारां व्यक्त होते. जर केवळ देहावरच खोट्या महत्त्वपूर्णतेचा आरोप केला गेला नसता, तर गेलेल्या व्यक्तीबद्दल शोक झाला नसता. एकटेपणाचा किंवा सुनेपणाचा (loneliness) भाव, प्रिय व्यक्तीची मागे उरून चटका लावणारी स्मृति, ती व्यक्ति आज हयात असती, तर बरें झालें असतें, ही लालसा, विरहाचे अश्रु व वियोगदुःखाचे निःश्वास—हे सर्व मिथ्या मूल्यनिरूपणा-

(false valuation) मुळे उत्पन्न होतात. ही सर्व मायेची करणी आहे. क्षुल्लक व तुच्छ वस्तूला नसतें महत्त्व देणें, हा एक मायेच्या कार्याचा प्रकार आहे. आध्यात्मिक दृष्ट्या, तो एक अज्ञानाचा प्रकार आहे.

सारभूत वस्तूला तुच्छ लेखणें.

ह्याउलट, मायेच्या करणीमुळे, वास्तविकपणें सारभूत असलेली वस्तु बिनमहत्त्वाची भासूं शकते. आध्यात्मिक दृष्ट्या, खरें महत्त्व फक्त परमात्म्यालाच आहे. पण केवळ ईश्वराकरिताच ईश्वर, अशी त्याबद्दलची अभिरुचि फारच थोड्या लोकांमध्ये आढळून येते. संसारासक्त लोक जर ईश्वराकडे वळलेच, तर त्याच्या बुडाशीं त्यांचे ऐहिक व स्वार्थपर हेतु असतात. कल्पित परमेश्वराच्या द्वारां, ते स्वतःच्या आशा, लालसा किंवा सूडाची इच्छा तृप्त करून घेण्याचा प्रयत्न करतात. सत्यस्वरूप परमात्म्याची त्यांना ओढ नसते. सत्य सोडून, बाकी सर्व गोष्टी त्यांना हव्या असतात; फक्त सत्याचीच त्यांना आवड नसते. हेंहि दृष्टीवरील आवरण मायानिर्मितच असतें. परमात्मा सोडून, इतर सर्व वस्तूंच्या द्वारां, लोक आनंदाचा पाठलाग करीत राहतात; परंतु, परमात्मा ह्याच एकमेव शाश्वत आनंदाचा कधीहि न आटणारा झरा आहे.

वस्तूंना भलतेंच महत्त्व देणें.

एखाद्या वस्तूला तिच्या यथार्थ महत्त्वाव्यतिरिक्त भलतेंच व दुसरेंच महत्त्व देण्यास मनाला प्रवृत्त करणें, हीहि मायेचीच करणी आहे. जेव्हा विधि, समारंभ व धर्माचे बाह्य आचार, यांना स्वतःलाच साध्य समजण्यांत येते, तेव्हा असें होत असतें. जीवनाचे वाहक व अभिव्यक्तीचें माध्यम असल्यामुळे, त्यांना साधन म्हणून महत्त्व असतेंच; परंतु, स्वतः त्यांनाच जेव्हा स्वयंसिद्ध महत्त्व देण्यांत येतें,

तेव्हा त्यांच्यावर नसतें महत्त्व लादलें जातें. व जेव्हा ते स्वतःच सारमय समजले जातात, तेव्हा त्यांच्या द्वारां, जीवन अभिव्यक्त होण्याऐवजी, बंधनांत मात्र पडतें. जेव्हा बिनमहत्त्वाच्या गोष्टीला महत्त्वाच्या गोष्टीहून अधिक प्राधान्य दिलें जातें, तेव्हा मायाजन्य अज्ञानाचा तिसरा प्रकार उत्पन्न होतो. हीहि मायेचीच करणी आहे.



## ३१ : : : : : माया

### भाग २ रा.

# मिथ्या विश्वास

मूल्यनिश्चितीसंबंधी भ्रमात्मक कल्पना किंवा खोटीं मूल्यें (false values), ह्याच आत्म्याला अध्यात्मदृष्टीने बंधनांत टाकणाऱ्या शृंखला आहेत. परंतु, कांही मिथ्या विश्वास (false beliefs) रूपी भ्रम देखील आत्म्याच्या आध्यात्मिक बंधनांत महत्त्वाचा भाग घेतात. मिथ्या विश्वासांच्या द्वारां, मिथ्या मूल्यें प्रबळ होतात; परंतु, त्याबरोबरच आत्म्यावर आरूढ होणाऱ्या मिथ्या मूल्यांच्या भ्रमामुळे, मिथ्या विश्वासहि स्वतः अधिक पुष्ट होतात. मिथ्या मूल्याप्रमाणेच, मिथ्या विश्वास देखील मायानिर्मितच असतात. मिथ्या विश्वास व मिथ्या मूल्यें, हे दोन्हीहि आत्म्याला अज्ञानांत पकडून ठेवणारे मायेचे प्रमुख पंजे आहेत.

मिथ्या मूल्यें व मिथ्या विश्वास, हे मायेचे पंजे आहेत.

मानवी बुद्धि ज्ञानाचें आसन आहे; व माया त्या आसनावरच ताबा करून अजेय बनते. बुद्धि ही मायेच्या आधीन झाल्यामुळे, मिथ्या विश्वास व अनेक भ्रम यांची रचना करते; व म्हणून, मायेस जिंकणें फार दुष्कर होतें. मिथ्या विश्वासांचेंच सतत पोषण व समर्थन करून, माया सत्यानुभूतीला अवरोध करते. जी बुद्धि अनिर्बंध व स्वतंत्रपणें विचार करते, ती सत्यप्राप्तीचा मार्ग तयार करते; व जी बुद्धि मायेच्या आधीन होऊन व्यापार करते, ती यथार्थ बोधामध्ये अडथळे आणते.

बुद्धि ही मायेच्या आधीन असते.

मायानिर्मित मिथ्या विश्वास इतके पक्के व दृढमूल असतात, की ते, स्वयंसिद्धच असल्यासारखे भासतात. ते प्रत्यक्ष सत्याचाच वेष धारण करतात; व त्यांचा निःशंकपणे स्वीकार केला जातो. उदाहरणार्थ, मनुष्य समजतो, की तो म्हणजे त्याचा जड देहच आहे; व साधारणतः आपण देहाहून काही निराळे असूं, हें त्याच्या स्वप्नींहि येत नाही. कोणतेंहि प्रमाण न मागतां, तो देहात्मभाव स्वभावतःच ग्रहण करतो; व हा विश्वास विवेकसम्मत प्रमाणांनी निश्चित झालेला नसल्यामुळे, मनुष्य त्याला अधिकच दृढपणें धरून बसतो.

मिथ्या विश्वास स्वयंसिद्ध असल्यासारखे भासूं शकतात.

मनुष्याचें जीवन जडदेह व त्याच्या वासना, यांच्याभोंवती व्यवस्थित झालेलें असतें. 'मी जडदेह आहें' हा विश्वास टाकून देणें, म्हणजे जड देहाच्या सर्व वासना व त्यावर अवलंबून असणारीं सर्व मूल्यें टाकून देणें. स्वतःला जडदेहच मानणें, हें मनुष्याची जडाविषयीची आसक्ति

जडदेहभाव.

व वासना, यांना पोषक असतें; परंतु, 'मी जडदेहाहून अन्य आहे' हा विश्वास त्याने स्वीकारलेल्या आसक्तींना व वासनांना विरोध-कारक बनतो. म्हणून, 'मी जडदेह आहें', हा विश्वास 'नैस-र्गिक' असून, ग्रहण करण्यास सोपा, पण टाकून देण्यास कठिण आहे. ह्या उलट, 'मी जडदेहाहून अन्य आहे', हा विश्वास खात्रीलायक प्रमाणांवाचून ग्राह्य होत नाही; तो ग्रहण करण्यास कठीण असून, त्याचा प्रतिकार करणें सोपें असतें. परंतु असें असू-नहि, जेव्हा मनावरील सर्व जडासक्ति व जडवासना, यांचा भार हलका होतो, तेव्हा स्वतः जडदेह असल्याचा त्याचा विश्वास खोटा ठरतो; व स्वतः जडदेहाहून अन्य असल्याचा त्याचा विश्वास सत्य असल्याचें दिसून येतें.

स्वतः जड देह असल्याचा मिथ्या विश्वास टाकून देण्यांत मनुष्याला यश मिळालें, तरी स्वतः सूक्ष्मदेह असल्याच्या मिथ्या विश्वासास तो बळी पडतो. त्याचें जीवन सूक्ष्मदेह व त्याच्या वासना, यांच्याभोंवती व्यवस्थित होतें.

सूक्ष्मदेहाशीं तादात्म्य.

स्वतः सूक्ष्म देह असल्याचा मिथ्या विश्वास टाकून देणें, म्हणजे सूक्ष्म देहाच्या सर्व वासना व त्यावर आधारलेली सर्व मूल्यें टाकून देणें. म्हणून, आता मनुष्याला 'मी सूक्ष्मदेह आहें' हा विश्वास नैसर्गिक बनून, 'मी सूक्ष्मदेहाहून अन्य आहें', ह्या विश्वासाला खात्रीलायक प्रमाणाची जरूरी भासते. परंतु, मनावरील सूक्ष्मदेहविषयक आसक्ति व वासना, यांचा भार हलका झाला, म्हणजे जडदेहभावाप्रमाणेच, 'मी सूक्ष्म देह आहें,' या मिथ्या विश्वासाचाहि तो परित्याग करतो.

पण हा कांही मिथ्या विश्वासाचा अंत नव्हे. सूक्ष्मदेह असल्याचा

मिथ्या विश्वास सुटला, तरी मनुष्य यापुढे देहभावापासून मुक्त होत नाही; तर आता तो 'मी मनोदेह किंवा अहंनिष्ठ मन आहें', या भ्रमांत फसतो. मिथ्या विश्वासांत मनुष्य रममाण होतो; व म्हणूनच तो त्यांत फसतो. व्यष्टीभूत आत्मा स्वतःच्या दीर्घकालीन जीवनामध्ये, आरंभापासून स्वतःच्या पृथक् अस्तित्वाच्या भ्रमाला तीव्र आसक्तीने बिलगला असतो. त्याचे सर्व विचार, भावना व क्रिया — यांनी निराळ्या 'मी' च्या अस्तित्वाचें विधान सारखें गृहीत धरून दृढ केलें असतें. स्वतः अहंनिष्ठ मन असल्याचा मिथ्या विश्वास टाकणें, म्हणजे आतापर्यंत त्याला प्रतीत होत असलेल्या स्वत्वाचें सत्तासर्वस्व विसर्जन करणें होय.

अहंनिष्ठ मनोदेहाशीं तादात्म्य.

स्वतः जडदेह व सूक्ष्मदेह असल्याचा मिथ्या भ्रम टाकून देण्यास, माणसाला नानाप्रकारची आसक्ति व वासना, यांचा त्याग करावा लागतो; यात स्वतःजवळ दीर्घकाल बाळगलेल्या गोष्टीचा त्याग होतो. परंतु, स्वतः अहंनिष्ठ मन असल्याचा मिथ्या विश्वास टाकून देण्यांत, त्याला त्याचें स्वतःस आजपर्यंत भासमान होत आलेलें अस्तित्वच मूलतः विसर्जन करावें लागतें. हा मिथ्यात्वाचा अंतिम अवशेष टाकून देणें अत्यंत काठिण असतें. पूर्वीच्या निःसंशयपणें खरेंच भासणाऱ्या मिथ्या विश्वासांप्रमाणेच, हा भ्रमहि अनित्य असतो. त्याचाहि अंत होतोच; व जेव्हा आत्मा स्वतःच्या निराळ्या अस्तित्वाबद्दलची तृष्णा टाकून देतो, तेव्हाच त्याच्या ह्या भ्रमाचा निरास होतो.

अंतिम मिथ्यात्वाचा त्याग.

जेव्हा आत्मा स्वतःला जडसूक्ष्म देहांहून व मनाहून भिन्न अस-

त्याचें जाणतो, तेव्हा तो स्वतःला अनंत असल्याचें जाणतो. पण आत्मा या नात्याने तो कांहीहि करत नाही; तो फक्त आहेच.

आत्मा हा विचार व क्रिया, यांच्या पलीकडे आहे.

जेव्हा आत्म्याशीं मनाचा योग होतो, तेव्हा तो विचार करीत असल्यासारखें दिसतें; जेव्हा त्याचा मनासह सूक्ष्म देहाशीं योग होतो, तेव्हा तो इच्छा करीत असल्यासारखें दिसतें; व जेव्हा त्याचा या दोहोंसह जडदेहाशीं योग होतो, तेव्हा तो क्रियाशील असल्यासारखें दिसतें. आत्मा कांही तरी करतो, हा विश्वास भ्रमात्मक आहे. आत्मा खुर्चीवर बसला आहे, हा भ्रम तो जडदेहाशीं तादात्म्य पावल्यामुळे उत्पन्न होतो. त्याचप्रमाणे, मनुष्याला वाटते की तो विचार करीत आहे; पण वास्तविक मनच विचार करीत असतें. मन विचार करतें; व देह बसतो. परंतु, आत्मा विचारहि करत नाही; व तो कोणती शारीरिक क्रियाहि करत नाही.

ही गोष्ट अर्थात् खरी आहे, की केवळ मनच विचार करूं शकत नाही; व त्याचप्रमाणे केवळ शरीरच कार्य करूं शकत नाही. कारण, केवळ मन व केवळ शरीर, ह्यांना निराळें अस्तित्वच नाही.

आत्मा क्रियांचा कर्ता आहे, हा विश्वास मिथ्या आहे.

आत्म्याचा भ्रम, हेंच त्यांचें स्वरूप आहे; व जेव्हा आत्मा त्यांच्याशीं तादात्म्य पावतो, तेव्हाच विचार व क्रिया, यांचा उद्‌भव होतो. आत्मा, मन व देह हे सर्व एकत्र घेतले, म्हणजे सीमित 'मी' किंवा क्रियांचा कर्ता बनतो. परंतु, स्वतःच्या यथार्थ स्वरूपांत, आत्मा विचारांबद्दल किंवा क्रियां-बद्दल जबाबदार नाही. आत्मा, मन किंवा देह असल्याचा भ्रम, किंवा तो विचारांचा व क्रियांचा कर्ता असल्याचा भ्रम मायारूपी अज्ञानामुळे उत्पन्न होतो.

त्याचप्रमाणे, आत्मा जीवनांतील सुखदुःखांचा किंवा इतर द्वंद्वांचा अनुभव घेतो, ही कल्पनाहि खोटी आहे. आत्मा जीवनांतील द्वंद्वांच्या पलीकडे आहे. परंतु, तो स्वतःला द्वंद्वांतीत असल्याचें जाणत नाही; व मनाशीं व देहाशीं युक्त पावून, द्वंद्वमय अनुभव स्वतःवर ओढवून घेतो. मनाशीं व देहाशीं तादात्म्य पावणारा आत्माच सुखदुःखांचें ग्रहण करतो; म्हणून आत्म्याच्या अनुभवास येणारीं सर्व सुखदुःखें अज्ञानमूलक आहेत. जेव्हा मनुष्य स्वतःला सर्व जगांत अधिक दुःखी समजतो, तेव्हा तो त्याचा मायारूपी अज्ञानाने निर्माण केलेला भ्रम असतो. तो स्वत: वस्तुतः दुःखी नसतो. पण मन व देहाशीं सम्मिश्रित झाल्यामुळे, स्वतःला दुःखी मानतो. आत्म्याला सोडून, केवळ मनच किंवा केवळ देहच द्वंद्वमय अनुभव घेऊं शकत नाहीत, हें तर खरेंच आहे. आत्मा, मन व देहद्वय सर्व एकत्रित झाले, म्हणजे द्वंद्वमय अनुभवाचें अधिष्ठान उत्पन्न होतें. परंतु स्वतःच्या यथार्थ स्वरूपामध्ये, आत्मा अनुभवांतील द्वंद्वांच्या पलीकडे असतो.

आत्मा हा द्वंद्वमय अनुभवाने बाधित आहे, हा विभ्रम मिथ्या आहे.

याप्रकारे, मन व देहद्वय, हे क्रियांचा कर्ता व अनुभवद्वंद्वांचा भोक्ता बनतात; परंतु, ते स्वतंत्रपणें ही भूमिका घेण्यास असमर्थ असतात.

मन व देह, यामधील आत्म्याच्या 'प्रवेशा'चें स्वरूप

जेव्हा आत्मा मनांत व देहांत प्रविष्ट होतो, तेव्हाच (ensouls), त्यांच्याकडे कर्तृत्व व भोक्तृत्व येऊं शकतें. परंतु, आत्म्याचा हा 'प्रवेश', म्हणजे मिथ्या तदात्मकता आहे. स्वस्वरूपांत, आत्मा हा सदैव निर्गुण, निर्विकार व अनंत आहे; व मायेच्या करणीमुळे किंवा अज्ञानामुळेच, तो सगुण, सविकार व सान्त भासतो.

---

## भाग ३ रा.

## मायाजनित भ्रमांच्या पार जाणें

मायाग्रस्त मनुष्य अज्ञानमोहामुळे ज्या नाना मिथ्या भ्रमांमध्यें फसतो, ते भ्रम असंख्य आहेत. परंतु, प्रारंभीपासूनच सर्व भ्रमांवर अपुरेपणा (insufficiency) व सारहीनता (bankruptcy) यांचा शिक्का असतो; व कधी ना कधी त्यांचा खोटेपणा ओळखल्या जातो. येथे असा प्रश्न उद्भवतो, की 'कोणताहि भ्रम हा भ्रमच आहे, हें आपणास निश्चितपणें कसें समजूं शकतें ?' भ्रमांतून सुटण्याकरिता, त्या भ्रमाला भ्रम म्हणून जाणण्याशिवाय दुसरा मार्गच नाही. परंतु, जर भ्रमाच्या खोटेपणाचें ज्ञान कधी काळीं व्हावयाचें असेल, तर तें ज्ञान त्या भ्रमांतच प्रारंभीपासून सुप्त स्थितीमध्ये असावयास पाहिजे.

मिथ्यात्व ओळखणें.

भ्रमाचा स्वीकार हा नेहमीच तात्पुरता व अस्थिर असा पर्यंकारूढ समेट ('bed-ridden compromise) असतो. अज्ञान

कितीहि गहन असले, तरी आत्मा भ्रमाला प्रश्नांकित आव्हान ( challenge ) देतच असतो; व प्रारंभिक अवस्थेमध्ये, हें आव्हान कितीहि कमजोर किंवा अस्पष्ट दिसलें, तरी त्यातच सर्व भ्रमांचा व अज्ञानाचा अंत करण्यास समर्थ होणाऱ्या सत्याच्या शोधाचा उगम असतो. भ्रमाचा स्वीकार करण्यामध्ये, सतत वर्धनशील अस्थिरता, घोर संदेह व अस्पष्ट भीति असते. उदाहरणार्थ, जेव्हा मनुष्य स्वतःला किंवा इतरांना स्थूल देहच मानतो, तेव्हा तो हा विश्वास पूर्णपणे ग्रहण करूं शकत नाही. ह्या भ्रमाचा स्वीकार करण्यामध्ये, मृत्यूचें भय व इतर लोक स्वतःपासून दुरावण्याची भीति, ह्यांचा समावेश होतो. रूपमय सृष्टीवर ग्रहणशील अधिकार संपादन करण्यावरच भिस्त ठेऊन, जेव्हा मनुष्य सुखाचा प्रयत्न करीत असतो, तेव्हा त्याला त्याबरोबरच अंतर्यामीं हेंहि ठाऊकच असतें, की तो अस्थिर वालुकामय प्रदेशावर किल्ल्यांची रचना करीत असून, त्याचा तो मार्ग शाश्वत आनंदाप्रत पोहोचविणारा तर खात्रीने नाहीच, पण ज्या आधारास तो इतक्या विकलतेने चिकटला आहे, तो कधी दगा देईल, याचाहि नेमच नाही.

भ्रमामध्ये शंका व भय असतात.

स्वतः असुरक्षित असल्याच्या जाणिवेने मनुष्य अस्वस्थ होत असतो. आपलें कोठे तरी व कांही तरी चुकलें असून, आपण खोट्या आशेवर भिस्त ठेवीत आहोंत, हें तो जाणतो. भ्रम हा धोका देणारा व अविश्वसनीय असतो. मनुष्य भ्रमाचा स्वीकार चिरकालपर्यंत कदापि करूं शकत नाही. असें करणें, म्हणजे विषारी नागाला हार समजून गळ्यांत धारण करण्याप्रमाणें, किंवा थोड्याच कालाकरिता निद्रिस्त झालेल्या

भ्रमाचा भोपळा.

ज्वालामुखीच्या मुखाशीं स्वस्थपणें झोंप घेण्याप्रमाणे आहे. भ्रमावर अपूर्णता व असंतोष, तात्पुरतेपणा व नश्वरता, यांचा छाप स्पष्टपणें अंकित असतो. भ्रमामध्ये स्वतःहून निराळें, असें दुसरें कांहीतरी अभिप्रेत असतेंच; व प्राथमिक बाह्यदर्शनीं, भ्रमामध्ये जी सत्ता भासमान होते, तिच्याहून कितीतरी अधिक विशाल व महान् सत्ता भ्रमाच्या मागे लपविल्या गेली आहे, असें मनुष्यास प्रतीत होत असतें. भ्रमाचा भोपळा हा फुटतोच; व अखेरीस मनुष्य सत्य जाणण्यास प्रवृत्त होतो.

दोन प्रकारचे मिथ्या विश्वास.

भ्रमात्मक विश्वास दोन प्रकारचे असतातः—(१) अव्यवस्थित व शिथिल विचारामुळे उत्पन्न होणारे मिथ्या विश्वास, व (२) दूषित विचारामुळे उत्पन्न होणारे मिथ्या विश्वास. दूषित विचारामुळे उत्पन्न होणाऱ्या मिथ्या विश्वासापेक्षा, अव्यवस्थित व शिथिल विचारामुळे उत्पन्न होणारे मिथ्या विश्वास कमी हानिकारक असतात. बुद्धि चालविण्यांत चूक झाली, म्हणजे केवळ बुद्धिनिष्ठ (purely intellectual) असत्यें उत्पन्न होतात; परंतु, मनुष्यास अंध बनविणाऱ्या व अविवेकशील वासनांच्या व्यापारामुळे बुद्धि भ्रष्ट व विकृत झाल्यास, अध्यात्मदृष्ट्या घातक असणारे भ्रम निर्माण होतात.

ह्या दोन प्रकारच्या भ्रमांतील फरक शरीरव्यापारविषयक दृष्टान्ताने स्पष्ट होईल. शरीराच्या महत्त्वाच्या अवयवांच्या बाबतींतल्या कांही व्याधी व्यापारविषयक ( functional ) असतात; व कांही व्याधी अंगरचनाविषयक (structural) असतात. शरीराचा

महत्त्वाचा अवयव अव्यवस्थितपणें कार्य करीत असला, म्हणजे व्यापारविषयक व्याधी उत्पन्न होतात;

अंगरचनाविषयक व अंग-व्यापारविषयक व्याधी

अशा सर्व बाबतींत, अवयवाच्या अंगरचनेमध्ये कोणताहि फारसा बिघाड झालेला नसतो. परंतु, तो अवयव केवळ मंद किंवा अनियमित बनला असतो; व त्याला निर्दोष कार्य करण्याकरता किंचित् उत्तेजन किंवा थोडीशी दुरुस्ती, यांचीच फक्त आवश्यकता असते. अंगरचना-विषयक व्याधींत, महत्त्वाच्या अवयवाच्या घटनेमध्ये किंवा रचनेमध्ये विकृति झाल्यामुळे रोग होतो. अशा सर्व बाबतींत, अवयवाचा दोष बराच अधिक गंभीर असतो. एक तर त्या अवयवास इजा झाली असते; किंवा एकादा विशिष्ट बाह्य घटक त्या अवयवांत आल्यामुळे, तो बेकाम झाला असतो. प्लीहा मंदावली, तर तो रोग व्यापारविषयक असतो; पण प्लीहेमध्ये खडा (stone) झाल्यास, तो रोग अंगरचनाविषयक असतो. दोनहि प्रकारांच्या रोगावर इलाज असतात; परंतु, अंगरचनात्मक व्याधींपेक्षा, अंगव्यापारविषयक व्याधि कितीतरी अधिक सुलभतेने दुरुस्त होऊं शकतात.

बुद्धीचा उपयोग अव्यवस्थितपणे केला गेल्यामुळे उत्पन्न होणारे भ्रम, हे अंगव्यापारविषयक व्याधींप्रमाणे असतात; आणि बुद्धि भ्रष्ट व विकृत झाल्यामुळे उत्पन्न होणारे

बुद्धीच्या शुद्धीकरणाचे महत्त्व.

भ्रम अंगरचनाविषयक व्याधींप्रमाणे असतात. ज्याप्रमाणे, अंगव्यापारविषयक रोग अंगरचना-विषयक रोगांपेक्षा अधिक सुलभतेने दुरुस्त करतां येतात, त्याचप्रमाणे बुद्धीच्या व्यापारांतील अनियमतेमुळे निर्माण

होणारे भ्रम, बुद्धिभ्रंशामुळे निर्माण होणाऱ्या भ्रमांहून अधिक सुलभतेने दुरुस्त होऊं शकतात. स्त्रीदेहाचे व्यापारविषयक रोग दुरुस्त होण्याकरता, तिला अधिक जोम व आरोग्यच प्रदान करण्याची आवश्यकता आहे. परंतु स्त्रीदेहमध्ये खडा होऊन रचनाविषयक विकार झाल्यास, कित्येक वेळीं शस्त्रक्रियेची आवश्यकता असते. त्याचप्रमाणे, बुद्धीच्या व्यापारांमध्ये कांही चूक झाल्यामुळे जे भ्रम उत्पन्न होतात, त्यांचा निरास केवळ बुद्धीच्या अधिक दक्ष उपयोगाने होऊं शकतो. परंतु, बुद्धिभ्रंशाने उत्पन्न होणाऱ्या भ्रमाकरता, बुद्धि शुद्ध करण्याची आवश्यकता असते. बुद्धीला शुद्ध करावयाची असेल, तर बुद्धिभ्रंश करणाऱ्या सर्व वासनांचा व आसक्तींचा कष्टप्रद उच्छेद करावा लागतो.

मायेचे दुर्ग.

मूल्यनिरूपणाचे प्रारंभींच मूलभूत चुका केल्यामुळे बुद्धिभ्रंशाचे भ्रम निर्माण होतात. हे भ्रम कांही स्वीकृत मूल्यांचा पाठलाग करण्याच्या मनोव्यापाराचे पार्श्वपरिणाम (product) असतात. स्वीकृत मूल्यांना विवेकसिद्ध दर्शविण्याकरता (rationalisation) व त्यांचें समर्थन करण्याकरता, हे भ्रम उत्पन्न होत असून, मानवी मनावर असणाऱ्या त्यांच्या वर्चस्वाच्या बुडाशीं, स्वीकृत मूल्यांना त्या भ्रमांपासून मिळणारी पुष्टीच असते. ह्या भ्रमामुळे मानवी मूल्यनिर्मिती व मूल्यसाधन, यावर परिणाम झाला नसता, तर त्यांचें महत्त्व एकदम कमी झालें असतें; व त्यांचा मनावरील ताबाहि मंदावला असता. जेव्हा शोध मुक्तीचा असतो, तेव्हा मिथ्या विश्वासाचें अस्तित्व व त्यांचा जोम, यांचा परिपोष समूल

वासनामुळे होत असतो. मिथ्या विश्वासांतील चूक केवळ बौद्धिक स्वरूपाची असेल, तर ती लवकर दुरुस्त होऊं शकते. परंतु, **खोट्या शोधामुळे पुष्ट होणारे भ्रम म्हणजे मायेचे दुर्गच होत.** त्यांत केवळ बौद्धिक चुकीहून दुसरें कांही तरी जास्त असतें; व केवळ बुद्धिनिष्ठ विवेचनाचा प्रत्याघात झाल्याने त्यांना मोठासा धक्काहि बसत नाही.

अतःशुद्धीने दृष्टि स्वच्छ होते.

बुद्धिभ्रंश करणाऱ्या वासनांना व आसक्तींना छाटून टाकणें, हें मुख्यतः बुद्धिवादाचें कार्य नाही. त्याकरता सम्यक् यत्न व सम्यक् आचार, यांची आवश्यकता आहे. आराम-खुर्चीमधील केवळ विचारधारेने नव्हे, तर उत्तम कर्मांच्या द्वारांच, आध्यात्मिक सत्यें दृष्टिपथांत येतील. प्रामाणिक कृति, ही आध्यात्मिक भ्रमांच्या निरासाची पूर्वतयारी आहे. आध्यात्मिक सत्यें दृष्टिपथांत येण्याकरिता, विचार प्रबल व तीव्र पाहिजे, इतकेंच नव्हे तर तो विमल व शुद्ध (clear) पाहिजे; **व शुद्ध विचार हा पवित्र व प्रशान्त मनांतच उद्भवतो.**

खोट्या भ्रमांचें अतिक्रमण केल्यावर, सत्यस्वरूप परमात्म्याचें ज्ञान होतें.

मायानिर्मित भ्रमाचा अखेरचा लवलेश झटकला जात नाही, तोंवर सत्यस्वरूप परमात्मा ज्ञात होत नाही. **परमात्मा हाच एकमेव सत्य आहे, हें ज्ञान माया तरून गेल्याशिवाय होत नाही. फक्त परमात्मा सत्य आहे. त्याच्या व्यतिरिक्त इतर सर्व कांही सीमित व नश्वर आहे; व द्वैतामधील जें जें अस्तित्वांत आहेसें वाटतें, तें सर्व मिथ्या आहे. परमात्मा ही एक अनंत सद्वस्तु आहे; व ह्या सद्वस्तूंतील सर्व भेद वास्तविकपणे अस्तित्वांत नसून खोटे व कल्पित आहेत.**

परमात्म्याचे निरनिराळे भाग पडतात, असें जें वाटतें, तें मायेमुळे. नानात्वाची जी विविध सृष्टि आहे, तिच्यामुळे परमात्म्याचे अलग अलग तुकडे पडत नाहीत. अहंनिष्ठ मनें (Ego-minds) निरनिराळीं आहेत; देह निरनिराळे आहेत; आकार निरनिराळे आहेत. परंतु, आत्मा हा एकच आहे. एकाच आत्म्याला निरनिराळ्या अहंचित्तां-बरोबर व निरनिराळ्या देहाबरोबर पाहिलें, म्हणजे निरनिराळे व्यष्टीभूत जीव (individualised souls) दिसतात. पण त्यामुळे प्रत्यक्ष आत्म्यामध्ये नानात्व शिरत नाही. आत्मा हा नेहमीचाच अविभाज्य आहे, व राहील. नानाप्रकारचे विचार व कर्में करणाऱ्या व द्वैतपर असंख्य अनुभव घेणाऱ्या विविध व्यष्टिमनांच्या ( ego-mind ) मागे, एकमेव खंडरहित आत्म्याची पार्श्वभूमि असते. परंतु, तो एक व अभंग आत्मा सर्व विचार, क्रिया व द्वैतपर अनुभव, यांच्या पलीकडे आहे; व तो त्यांच्या पलीकडे नेहमीच राहतो.

परमात्मा हा अखंड आहे.

निरनिराळ्या प्रकारांचीं मतें व नानाविध विचार, यांच्यामुळे खंडरहित व एकरस आत्म्यामध्ये विविधता किंवा नानात्व निर्माण होत नाही. आत्म्यामध्ये कोणतींहि मतें किंवा विचार नसतात, हेंच याचें साधें कारण आहे. विचारांची सर्व क्रिया व त्यांचे निर्णय सीमित अहंचित्ता (Ego-mind) मध्येच असतात. आत्मा विचार करीत नाही; तर आत्म्याच्या पार्श्वभूमीवर अहंचित्त विचार करतें. चिंतन व चिंतनाच्या द्वारां होणारें ज्ञान, हीं दोन्हीहि सीमित अहंचित्तांच्या अपूर्ण व सदोष ज्ञानाच्या स्थितीं-

विचारामधील विविधतेमुळे आत्म्यांत भेद पडत नाहीत.

तच आढळतात. स्वतः आत्म्यामध्ये, चिंतन किंवा चिंतनाच्या द्वारां होणारें ज्ञान नसतें.

आत्मा हा अनंतप्रज्ञास्वरूप आहे.

आत्मा स्वयमेव असीम विचार व अनंत ज्ञान आहे. परंतु, ह्या विचारांत किंवा ज्ञानामध्ये, विचार करणारा, विचार व विचाराचा निर्णय, असा भेद नसतो; व त्यांत विषय व विषयी, यांचें द्वैतहि नसतें. आत्म्याची पार्श्वभूमी असलेले अहंचित्तच विचार करणारें बनूं शकतें. आत्मा स्वतः अनंतप्रज्ञास्वरूप असला, तरी त्याच्यामध्ये विचार किंवा बुद्धीचा व्यापार असत नाही. बुद्धि व तिचा सीमित विचार, हे दोन्हीहि मर्यादित अहंचित्तामध्येच संभवतात. स्वयमेव अंतरहित प्रज्ञानच असलेल्या व पुरेपुर भरलेल्या पूर्णतासंपन्न आत्म्याला, बुद्धीची किंवा बुद्धीच्या व्यापाराची किंचितहि गरज नसते.

केवळ परमात्माच सत्य आहे.

मायानिर्मित भ्रमांचा अखेरचा लवलेश झटकून टाकला, म्हणजे आत्मा स्वतःला स्थूल, सूक्ष्म व कारण शरीरांहून निराळा असल्याचें तर जाणतोच, पण केवळ एकमेव सत्य असलेला परमात्मा तो स्वतःच असल्याचेंहि तो जाणतो. मन व जडसूक्ष्म शरीरें स्वतःच्याच कल्पनेची सृष्टि असून, ती वास्तविकपणे कधींच अस्तित्वांत नव्हती, व केवळ अज्ञानामुळेच तो स्वतःला मन, सूक्ष्मदेह किंवा जडदेह मानीत गेला, किंबहुना तो स्वतःच मन, सूक्ष्मदेह व जडदेह बनून, नंतर या सर्व स्वयंनिर्मित भ्रमांशीं तादात्म्य पावला, हें सर्व आत्म्याला प्रतीत होतें.

---

## ३३ : : : : : माया

### भाग ४ था.

### परमात्मा व माया

परमात्मा द्वैतांतील सीमित करणाऱ्या द्वंद्वांच्या पलीकडे असल्या-मुळे, अंतरहित आहे. तो चांगलें व वाईट, सान व थोर, बरोबर व चुकीचें, सद्‌गुण व दुर्गुण, सुख व दुःख, ह्या मर्यादित अवस्थांच्या पलीकडे आहे; व म्हणून तो असीम आहे. जर तो वाईट नसून चांगला असता, किंवा चांगला नसून वाईट असता, लहान नसून मोठा असता, किंवा मोठा नसून लहान असता, चुकीचा नसून बरोबर असता, किंवा बरोबर नसून चूक असता, दुर्गुणी नसून सद्‌गुणी असता, किंवा सद्‌गुणी नसून दुर्गुणी असता, दुःखी नसून सुखी असता, किंवा सुखी नसून दुःखी असता—तर तो सीमित झाला असता, व अंतरहित झाला नसता. द्वंद्वातीत असल्यामुळेच परमात्मा अंतरहित आहे.

परमात्मा द्वंद्वातीत आहे.

जें अनंत आहे, तें द्वैतातीतच पाहिजे; तें द्वैताचा एक भाग कधीहि होऊं शकत नाही. म्हणून, जे वस्तुतः अनंत आहे, त्याला सांताबरोबरचा दुसरा भाग मानतां येत नाही. अनंताला सांताचे सहवर्ती मानलें, तर तें द्वंद्वांतील एक पक्ष बनतें; व मग तें अनंत राहात नाही. अंतरहित परमात्मा द्वैताच्या सीमेंत उतरूं शकत नाही. म्हणून, द्वैतपर दृश्यमान जगताचीहि खरी सत्ता परमात्माच आहे; व सीमित जग भ्रम आहे. परमात्माच सत्य असून, तो अद्वितीय व अंतरहित आहे. सीमित जगाचें अस्तित्व केवळ भास आहे. तें मिथ्या आहे; खरे नाही.

सान अनताचा द्वितीय भाग होऊ शकत नाही.

सीमित वस्तूंचें मिथ्या जग कसें व कां उत्पन्न होतें ? तें मायेने म्हणजे अज्ञानाच्या तत्त्वाने निर्माण होतें. माया हा भ्रम नाही, तर भ्रम निर्माण करणारी आहे. माया खोटी नाही; ती खोटा आभास उत्पन्न करते. माया मिथ्या नाही; ती सत्याला असत्याप्रमाणे व असत्याला सत्याप्रमाणे भासविते. माया द्वैत नाही; ती द्वैताला उत्पन्न करते.

सीमित वस्तूचे जग मायानिर्मित आहे.

बौद्धिक स्पष्टीकरणाकरता, मायेला अनंत मानलें पाहिजे. माया मर्यादितेचा भ्रम निर्माण करते; ती स्वतः मर्यादित नाही. मायानिर्मित सर्व भ्रम सीमित आहेत; तसेंच मायेमुळे भासमान होणारें सर्व जगहि सीमित आहे. तारे असंख्य आहेत; त्यांची संख्या अगणित आहे; तरी ताऱ्यांचा सर्व समुदाय सीमित आहे. अवकाश

मायानिर्मित वस्तू सीमित आहेत.

(space) व काल अनंत असल्यासारखे भासत असले, तरी वास्तविक सांतच आहेत. सीमित व सांत असलेली प्रत्येक वस्तु भ्रममय जगाचा भाग आहे; परंतु, एका दृष्टीने पाहतां, ज्या तत्त्वामुळे हा सीमित वस्तूंचा भ्रम उत्पन्न होतो, तें तत्त्वच भ्रम समजतां येत नाही.

मायेला सीमित समजतां येत नाही. कोणतीहि वस्तु स्थानाने किंवा काला (time) ने सीमित होत असते. मायेचें अस्तित्व स्थानामध्ये नाही; व ती स्थानाने मर्यादित नाही. सर्व अंतरालच मायानिर्मित असल्यामुळे, मायेला अंतरालविषयक सीमा असूं शकत नाही. अंतराल (space) व त्यांतील सर्व वस्तू भ्रममय असून, मायाश्रित आहेत. माया ही अंतरालाच्या आश्रयाने राहात नाही. तेव्हा, अंतरालांतील सीमा मायेला मर्यादा घालून सीमित करूं शकत नाहीत.

मायेला स्थानमर्यादा नाही.

त्याचप्रमाणे, कालमर्यादेमुळे ही माया सीमित होऊं शकत नाही. तुर्यावस्थेंत माया नाहीशी होत असली, तरी तिला त्यामुळे सीमित मानण्याचें कारण नाही. मायेला कालप्रवाहामध्ये आदि किंवा अंत नाही; कारण, स्वतः कालच मायानिर्मित आहे. जे लोक मायेला कोणत्या तरी वेळीं उत्पन्न होऊन नंतर कालांतराने नाहीशी होणारी घटना मानतात, ते मायेला कालामध्ये बसवितात; कालाला मायेमध्ये बसवीत नाहीत. काल मायेंत आहे; माया कालांत नाही. कालप्रवाह व कालांतर्गत सर्व घटना मायानिर्मित आहेत. काल मायेमुळे उत्पन्न होतो; माया नाहीशी झाली, म्हणजे कालहि नाहीसा होतो. परमात्मा हा कालातीत सत्य असून, ईश्वरानुभूति व

माया कालाने सीमित नाही.

मायानिरास, ह्या समयरहित (timeless) घटना आहेत. तेव्हा माया कोणत्याहि प्रकारें कालबद्ध नाही.

त्याचप्रमाणे माया दुसऱ्या कोणत्याहि कारणाने सीमित होऊं शकत नाही. सीमित असेल, तर ती स्वतःच भ्रम होईल; व स्वतःच भ्रम झाल्यामुळे, दुसरे भ्रम निर्माण करण्याचें सामर्थ्य तिच्यामध्ये राहणार नाही. साधारणपणे ईश्वराला सत्य व अनंत मानण्यांत येतें, तसेंच मायेलाहि, बौद्धिक स्पष्टीकरणाकरता, सत्य व अनंत मानलें पाहिजे.

माया अंतरहित आहे.

सर्व संभाव्य बौद्धिक स्पष्टीकरणांमध्ये, ईश्वराप्रमाणेच मायेलाहि सत्य व अनंत मानणारें स्पष्टीकरण, मानवी बुद्धीला अधिक ग्राह्य आहे. परंतु मायेला अंतिम सत्ता नाही. जेथे द्वैत आहे, तेथे दोन्हीहि वस्तु सीमित आहेत; कारण, एका वस्तूने दुसरी वस्तु मर्यादित होते. दोन वस्तु सत्य व अनंत असूं शकत नाहीत. दोन वस्तु विशाल असूं शकतात; पण दोन वस्तूंना अनंत सत्ता असूं शकत नाही. ईश्वर व माया, हें द्वैत कायम ठेवून, दोहोंना स्वतंत्र अस्तित्व मानलें, तर ईश्वराची अनंत सत्ता द्वैताचा द्वितीय भाग होईल. म्हणून, मायेला सत्यत्व देणारें बौद्धिक स्पष्टीकरण सर्वांत अधिक बुद्धिग्राह्य असलें, तरी त्याच्यावर अंतिम ज्ञानाचा शिक्का देतां येत नाही.

मायेला अंतिम सत्ता नाही.

मायेला भ्रम मानण्यामध्ये अडचणी आहेत, त्याचप्रमाणे तिला सत्य मानण्यांतहि अडचणी आहेत. या प्रकारें, माया समजून घेण्याचे सीमित बुद्धीचे सर्व प्रयत्न कुंठित व असफल होतात.

एका बाजूने पाहतां, मायेला सीमित मानलें, तर ती स्वतःच भ्रम बनते; व तिच्या द्वारा सीमित वस्तूंच्या जगभ्रमाचें स्पष्टीकरण होऊं शकत नाही. म्हणून, मायेला सत्य व अनंत मानावें लागते. पण दुसऱ्या बाजूने पाहतां मायेला अंतिम सत्यता दिली, तरी ती ईश्वररूपी अनंत सत्तेची प्रतिद्वंद्वी सत्ता झाल्यामुळे, वस्तुतः सीमित व म्हणून भ्रमरूप बनते. तेव्हा, **सीमितवस्तुमय जगभ्रमाच्या बौद्धिक स्पष्टीकरणाकरता, मायेला सत्य मानावें लागलें, तरी तिला अंतिम सत्ता असूं शकत नाही.**

माया समजण्याच्या मार्गांतील बौद्धिक अडचणी.

सीमित बुद्धीने माया समजून घेण्याचा कोणत्याहि रीतीने प्रयत्न केला, तरी तिला मायेचे यथार्थ ज्ञान होत नाही माया ईश्वरा इतकीच अगम्य आहे व मर्यादित बुद्धि तिच्या खऱ्या स्वरूपाचे आकलन करूं शकत नाही. ईश्वराप्रमाणेच मायाहि अगम्य व अतर्क्य आहे; म्हणून, 'माया ईश्वराची छाया आहे' असें म्हणतात. मनुष्य आहे, तेथें त्याची छाया असतेच; त्याचप्रमाणे, ईश्वर आहे, तेथें ही अनिर्वचनीय माया असतेच

माया ईश्वराची छाया आहे.

द्वैतक्षेत्रांत कार्य करणाऱ्या सीमित बुद्धीला, ईश्वर व माया, दोन्हीहि अतर्क्य असले, तरी अंतिम अनुभूती( realisation ) मध्ये, त्यांच्या यथार्थ स्वरूपाचें पूर्ण ज्ञान होऊ शकतें. **अनुभूति होईपर्यंत, मायेच्या कोड्याचा पूर्ण उलगडा कधीच होऊं शकत नाही; व ईश्वरानुभूतीनंतर असें आढळून येतें, की माया ही अस्तित्वांतच नाही.**

मायेच्या कोड्याचा उलगडा अनुभूतीनंतरच होतो.

माया दोन अवस्थांमध्ये नाही. मूळच्या सद्वस्तूच्या अचेतन अवस्थेंत माया नसते; व परमात्म्याच्या आत्मचेतन व विज्ञान (superconsciousness) स्थितींतहि माया नसते. स्थूल, सूक्ष्म व मनोविशिष्ट जगताच्या चेतनावस्थेंत—म्हणजे ईश्वराला भासमान द्वैतपर सृष्टीची जाणीव असते, तेव्हाच मायेला अस्तित्व असतें. जेथे आत्म्याला स्वानुभव नसतो व जेथे त्याची चेतना द्वैतपर मिथ्या भ्रमांनी आक्रांत होऊन, कल्पनानिर्मित द्वितीया (imagined other) चीच जाणीव ठेवते, तेथेच मायेला अस्तित्व आहे.

माया दोन अवस्थांत नाही.

सान्ताच्या दृष्टीने पाहिलें, तर मायेला अस्तित्व आहे. अनेक भ्रमांची व सीमित वस्तूंची रचना करणारी माया ही भ्रमदृष्टीकरिताच सत्य आहे. अखेरच्या व एकमेव सत्याच्या अनुभूतीच्या दृष्टीने, केवळ असीम व अनंत परमात्माच सत्य आहे. तेथे सीमित वस्तूंच्या परमात्म्याहून निराळ्या भासणाऱ्या अस्तित्वाचा भ्रम नाहीसा होतो; व त्याबरोबरच, त्या भ्रमाला निर्माण करणारी मायाहि अस्तास जाते.

मायेचें अस्तित्व भ्रमदृष्टीनेच आहे.

माया पार करून चेतना आत्माभिमुख झाली, म्हणजे आत्मज्ञान होतें. त्या आत्मज्ञानांत असें प्रत्ययास येतें, कीं निरनिराळीं अहंनिष्ठ मनें (ego-minds), शरीरें, व त्याचप्रमाणे अखिल विश्व व माया, यांपैकी कशालाहि कधींच अस्तित्व नव्हतें. जी कांही पूर्ववर्ती सत्ता मायेला होती, ती आत्म्याच्या अविभाज्य सत्तेमध्येच प्रविष्ट असलेली

आत्मानुभूतीमधील ज्ञान.

दिसते. आत्मा स्वत:ला स्वयंसिद्ध व द्वैतातीत व त्याचप्रमाणे ज्ञान, आनंद, शक्ति व अस्तित्व, या सर्व बाबतींत निरंतर सीमातीत असल्याचें जाणतो; व तो हेंहि जाणतो, की तो आता आहे, असाच पूर्वीहि होता. परंतु, ही आत्मज्ञानाची सर्वश्रेष्ठ अवस्था बुद्धीच्या कक्षेबाहेर असून, अंतिम अनुभूतीचें शिखर ज्यांनी गाठलें नाही, त्यांना त्याची कल्पनाहि करतां येत नाही.

